ने। पूर्णामी।'-दा ३ ९.२०. [पूर्ण+आमी] पूर्णाभिषिक्त
पूर्णाभिषेकी-नि पूर्णाभिषेक ज्यास झाला आहे असा [स]
**पूर्णाभिषेक**-पु १ कोणी धार्मिक विधि समाप्त झाल्यावर करावें आणि यजमानावर कलशोदकानें (विधा दोहोंनी भरलेल्या घटींतील उदकानें) केलेलें सिंचन २ मंत्रोपदेश दिल्यानंतर गुरूनें शिष्यावर केलेला अभिषेक ३ (ल उप) गराचा तनुस्याच्या अर्थी कमलेल्या सर्व सद्गुण, दुर्गुण इ०चे अनेकांनी केलेले वर्णन [स] **पूर्णावतार**-पु सोळा कलांनी युक्त असा ईश्वराचा अवतार दशावतारांपैकी नरसिंह, राम आणि कृष्ण हे तीन अवतार [सं पूर्ण+अवतार]
**पूर्णावस्था**-स्त्री परिपक्वदशा, शेवटाची स्थिति [सं पूर्ण+अवस्था] **पूर्णाहंता**-स्त्री पूर्ण आत्मभाव 'तेंही ते पूर्णा हंता। की दिसवेंनि पाहुनता।'-माहा १८ ४१४ [पूर्ण+अहंता]
**पूर्णाहुति**-स्त्री १ यज्ञाच्या शेवटीं सर्व द्रव्यांनी दिलेली आहुति 'होईल मागपूर्णाहुति। मग यज्ञ आगमिथी।'-एभा १२ २ (ल) (मैत्र्याची) अखेर, शेवट, सर्व मारक होणें 'भाऊसाहेबांवर मोठ्या नाट्या भरत साधी पूर्णाहुति झाली' ३ स्वार्थत मरण, मृत्यु (एखादि व्यक्तीचा) 'त्याची पूर्णाहुति घेतली' [स पूर्ण+आहुति] **पूर्णोदर**-न (नृत्य) टाचावर उभे राहून श्वास कोंडून धरून पोट थोडें पुढें आणणें श्वास सोडणें, उदररोग दाखविणें वगैरे वेळीं हा अभिनय करितात [पूर्ण+उदर]
**पूर्णोपमा**-स्त्री (साहित्य) उपमेय उपमान, सामान्य धर्म आणि साम्य(उपमा)वाचक शब्द हीं चारही ज्या उपमेंत आहेत ती 'जो धैर्ये धरता सदृश रमा सजे तसा दुरता।' इ० श्लोक 'गजा तृणाच्छादित कूप जैसा। ज्या अमस्त्रविचार तैसा। नाशास हा कारण, जो तयास। कधी सुनीती तुडव वदास। लुप्तोपमा पहा [स पूर्ण+उपमा]

**पूर्णा, पूर्णातिथि**-स्त्री अमावास्या, पौर्णिमा, पंचमी आणि दशमी या तिथींपैकी प्रत्येक [स]

**पूर्णिमा**-स्त्री ज्या तिथीस चंद्रबिंब सोळाहि कलांनी युक्त असतें ती तिथि, पौर्णिमा [स] **पूर्णिमांत मास**-पु वद्य प्रतिपदेपासून शुद्ध पूर्णिमेपर्यंत महिना

**पूर्त**-न विहीर, तळें, देऊळ, धर्मशाळा इ० बांधणें, झाडें लावणें, अन्नदान करणें इ० रूप धर्मकृत्य 'सावरी ज्यास विषय विरक्ती। तेही इष्टापूर्ते जे करिती। योग याग त्याग साधिती। माझी भक्ति तें उपजे।'-एभा ११ १५१४ -स्त्री पूर्ति पहा -वि १ पूर्ण, पूर्ण भरलेलें, सपूर्ण, समग्र २ पूर्ण केलेला शेवटास नेलेला परिपूर्ण पहा 'पूर्त मवणी ही न वळे चरित्र। जय चाफळी केले लीळा विचित्र।'-दावि ४५६ [स]

**पर्तकाल**-पु (अप) पोर्तुगाल देश

**पूर्तगेझ**-पु पोर्तुगीज लोक 'ज्या पोर्तुगालिस पाश्चिमात्य-पून अने परकीय विशेषतामधे अवलंबा आरम्भ त'

**पूर्तता**-स्त्री परिपूर्णता पूर्ति पहा [पूर्त]

**पूर्ति-र्ती**-स्त्री १ समाप्ति, शेवट, शेवट संपूर्णता ३ तृप्ति; समाधान, सतोष 'हे दुर्दैवा यदी की पूर्ति अशें कीं न अश तुडवेचीं?'-मोसभा ५ ३१. ३ परिपूर्णता, पूर्णपणा ४ पूर्त (-न) पहा. 'पूर्ती मणादिक यांचि व त्याची कर्मे म्हणू नका हो सारी।'-केपो ३६८ [सं]

**पूर्ति-र्ती**-वि पुरती पहा. 'करी अंतरीं मात घेऊनि पूर्ति।'-राक ११४ [पुरतें]

**पूर्भ(र्भे)य्या**-पु उत्तरहिंदुस्थानी लोकांची एक जात पुरभय्या पहा. [पूर्व, पूर्विया]

**पूर्या**-पु (संगीत) एक राग. पूरिया पहा. ०धनाश्री-पु एक राग या रागांत षड्ज, कोमल ऋषभ, तीव्र गांधार, तीव्र मध्यम, पंचम, कोमल धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात जाति संपूर्ण-संपूर्ण वादी पंचम, संवादी ऋषभ गानसमय सायंकाळ

**पूर्व**-स्त्री उगवत, सूर्योदय ज्या दिशेस होतो ती दिशा 'बा पूर्वापर सरिता। भिन्न दिशांनी पाहतां। मग सिंधु मिळणीं येता। पावती दोघी।'-ज्ञा ३ ३९ 'बौद्ध धर्मांचा प्रसार काश्मीरात व काबुलांत होऊन पूर्वेकडे इराण व तुर्कस्थानापर्यंत त्याची मजल गेलेली होती...'-नीर ५८६ -वि पूर्व दिशेचा, पूर्व दिशेकडील. [स] (वाप्र) **पूर्वेचा सूर्य पश्चिमेस उगवणें**-(ल) अत्यंत अशक्य गोष्ट घडून येणें म्ह० १ राजा करील ती पूर्व (दिशा) २ नागाल ती पूर्वदिशा सामाशब्द- ०कपाल गोलार्ध-न पूर्वेकडील गोलार्ध ०दिशा-स्त्री पूर्व पहा 'पूर्व दिशे मुख धुतलें, होतसें नाश तिमिरा।'-दाला ०द्वार-न १ (शहर, राजवाडा, घर इ०चा) पूर्वेकडील किंवा पुढील दरवाजा २ (ल) तोंड, पश्चिमद्वार किंवा गुदद्वार यांच्या उलट ०पश्चिम-वि पूर्वेकडून पश्चिमेकडे ज्याची लांबी आहे असें ०समुद्र-पु पूर्व दिशेकडील समुद्र ०स्वस्तिक-न क्षितिजाचा पूर्वेकडील बिंदु **पूर्वाग्रा** स्त्री पूर्वेकडील अग्र, सूर्य व तारा ज्यें मावळतो तो क्षितिजबिंदु, पूर्वदिशा [स पूर्व+अग्र] **पूर्वास्त**-नपु (शुक्र, गुरु इ०चे) पूर्व दिशेस सूर्याजवळ गेल्यानें अदर्शन होणें **पूर्वोदय**-पु सूर्यापूर्वी बराच वेळ उदय पावू लागल्यामुळें शुक्र गुरु इ० चें दर्शन होणें

**पूर्व**-वि १ पहिला, अगोदरचा आधींचा, सुरवातीचा २ प्राचीन मागला, गतकालीन ३ पुढील किंवा मागील (भाग, बाजू इ०) 'जय पूर्वानुक्रम दिसे। चावाळत।'-ज्ञा १ २२३ ४ ज्या दान गोष्टींत आनुपूर्वीसंबंध असतो त्यांपैकीं आधींच्या वस्तूस पूर्व व नंतरच्या वस्तूस उत्तर म्हणतात 'भुतलीं पूर्व तिमिर गेलें सारें। आणीं भरलें नूतन वारें।'-विक ५ समासात पूर्वपदीं व उत्तरपदींहि

हा शब्द योजितात जसें -दृष्टपूर्व, श्रुतपूर्व, उक्तपूर्व, पूर्वदृष्ट, वयपूर्व (तरुण इ०) 'वयपूर्व सुत वाढीतयो राणी।' -रामदासी २ १५६ सह, बरोबर इ० अर्थी क प्रत्यय लागून (पूर्वक) समासांत योजितात जसें -आग्रहपूर्वक 'ईश्वराचें नाम श्रीशब्दपूर्वक घ्यावें' ०कथा-स्त्री १ संदर्भ लागावा म्हणून पूर्वी घडून आलेल्या कथेचा जो भाग पुन्हा साराशरूपानें सांगतात तो २ मागील हकीकत, इतिहास ०कर्म-न सद्य स्थितींत सुखदु खास कारणीभूत असें मागें किंवा पूर्वजन्मीं केलेलें कर्म, पूर्वीचें कृत्य म्ह० सुगीपाठीं हगावें आणि पूर्वकर्मास रडावें ०कालवाचक अव्यय-न (व्या.) मूळ धातुस उन, ऊन प्रत्यय लागून होणारें अव्यय उदा० करून, बोलून इ० ०ग्रह-पु प्रथम, पूर्वी झालेली कल्पना, मत, समज इ०, आरंभीं झालेला ग्रह (बरावाईट) ०ग्रहदूषित-वि पूर्वीच्या मताचा, ग्रहाचा परिणाम झालेला, पूर्वग्रहानें कलुषित असें (मन) (इं) प्रेजुडिस्ड ०ज-पु आपल्या अगोदरच्या पिढींतील माणूस, पुरुष, वाडवडील 'थिगजिग तें जिंग पूर्वजाची शृति असोदि हातींची गळी रे।' -दावि ४१५ -वि पूर्वी, आधीं जन्मलेला (बधु) [स पूर्व+ज (जन्मलेला) प्रत्यय] ०जन्म-नपु मागला जन्म, हल्लींच्या जन्माच्या पूर्वीचा जन्म ०जन्मार्जित-वि पूर्वजन्मीं संपादन केलेलें (पाप, पुण्य इ०) [स पूर्व+जन्म+अर्जित] ०ठेवा-पु चालू जन्मांत सुखदु खास कारणीभूत असा पूर्वजन्मांतील पापपुण्याचा संचय पूर्वकर्म पहा ०दत्त-वि (पूर्वजन्मीं दिलेलें) या जन्मीं बरे वाईट अनुभव येण्यास कारणी भूत असें पूर्वजन्मीं केलेलें दानादि कर्म; आपण जसें पूर्वजन्मीं दिलें-आचरलें असतें तसें परमेश्वर या जन्मीं आपणास देतो असा समज ०धन न वडिलार्जित पैसा 'माझें पूर्वधन। तुम्ही यावें ऋण।' -तुच १ १२० [पूर्व+धन] ०धरी-वि पूर्वापार चालत आलेला, सनातन 'राउळीची चोरी करी चोरी। तें उपसाहावा जी मुरारी। का सृष्टिकर्ता पूर्वधरी। भगभोंनियां।' -दाव ३८० ०धान्य-न पावसाळयात येणारें पीक, खरीपाचें पीक अन्न धान्य पहा ०पद-न १ हरिदासानें कथेच्या सुरवातीस घेतलेलें एखादें विधान, सूत्र, नातिवचन याचें तो निरनिराळीं उदाहरणें देऊन विवरण करतो व शवटीं पुन्हा सिद्धांत म्हणून त्याच पदा वर येतो यावरून २ समास, वाक्य कविता इ० चें पहिलें पद ३ (ल) पूर्वस्थिति पूर्वपदावर येणें-म शवटीं केलेले श्रम फुकट जाऊन पुन पूर्वीच्या वाईट मार्गाकडे वळणें ०पक्ष-१ (तर्क, न्याय) वादविवादात एका पक्षानें केलेली आपल्या मताची मांडणी; दुसरा विरुद्ध पक्ष याला उत्तर देतो पूर्वपक्षाचें खडण किंवा मडण करणें जरूर असतें एका बाजूचा उपन्यास 'पूर्वपक्ष त्यागून सिद्धांत। निरूपण करावें नेमस्त।' -दा ४ २ १८ २ (कायदा) तक्रार, फिर्यादीचें म्हणणें, वादीचें म्हणणें ३ सिद्धांत, प्रमेय ४ मनीच्याचा शुद्ध पयरवडा ५ आशाकामय स्थिति, माया 'पूर्वपक्ष म्हणिजे माया। सिद्धांतें जाये विल्या।' -दा २० ३ २० ६ पूर्वीची अविचल, अविकृत स्थिति (मनाची), मूळ चिद्रात्मय स्थिति 'तुकाराम रूपें येवोनि प्रत्यक्ष। म्हणे पूर्वपक्ष सांभाळीजे।' -ब ९५ ०पाठ-पु पूर्वापार चालत आलेली रूढी, प्रघात, रिवाज, वहिवाट ०पीठिका-स्त्री १ पहिली, मागील, पूर्वीची किंवा प्राचीन पद्धत, मार्ग, चाल, रीत इ० 'आता त्यानें साधुपणा धरिला परतु त्याची पूर्वपीठिका तर बहुत विरुद्ध आहे' २ (एखादा, वादविवाद किंवा इतर प्रसग याच्या) हकिकतीचा पहिला भाग, पूर्वीचा इत्यभूत वृत्तांत, पूर्ववृत्त, भारतींचा किंवा मूळचा भाग ३ ग्रथाचा प्रास्ताविक भाग, प्रस्तावना पू(पु)र्वपुजा-पूजा-स्त्री १ पूर्वपुण्य पहा 'साव कृपा परिपूर्ण पूर्व पुजा बहुत चांगली।' -ऐपो ३२० २ देवपूजेंत देवतास अभिषेक करण्यापूर्वी करावयाची पूजा पूर्वपुण्य, पुण्याई-नस्त्री पूर्वजन्मीं सत्कृत्यें करून मिळ विलेलें पुण्य ०पुरुष-पुअव पूर्वीचे वंशज, पूर्वज मग बोवांकिती स्वर्गस्थ। पूर्वपुरुष।' -ज्ञा १ २०३ ०प्रवाह-पु प्राचीन, पूर्वीचा मार्ग (शब्दश व ल) ०बस्ती-स्त्री वरचें पोट, आंतीच्या वरचें पोट, छातीचें मध्यपटल व बेंबी यांच्यामधील भाग, मणिपूर याच्या उलट उत्तरबस्ति ०भूमिका-स्त्री पूर्वस्थल पहा संन्यास घेतलिया जाण। पूर्वभूमिका अवलोकन।' -एभा २३ ५०२ ०मीमांसा-स्त्री. मीम सा शास्त्राचा एक भाग हा भाग जैमिनीनें केला असून त्यांत कर्म मार्गाचें प्रतिपादन आहे, कर्मकांड 'तैसीं हिंसाचि करूनि अहिंसा। निफजविजे हा ऐसा। पैं पूर्वमीमांसा। निर्णो केला।' -ज्ञा १३ २२० उत्तरमीमांसा पहा ०रात्र-स्त्री रात्रीचा पहिला भाग, सध्याकाळपासून मध्यरात्रीपर्यंतचा काळ ०रूप-न १ पूर्वसूचना (रोगाचें) पूर्वचिन्ह, पूर्वलक्षण 'कामल (कावीळ) ही पाडूचें पूर्वरूप' २ आधींचें स्वरूप, आकार, प्रथम दिसू लागणारी चिन्हें ३ कानउघाडणी, आगाऊ दिलेली सूचना ०रूप संधि-पु (व्या) ज्यात दोन स्वरांच्या जागीं प्रथम स्वर कायम होतो असा संधि ०रूपज्ञान-न १ पूर्वचिन्हावरून होणारें ज्ञान, प्रथमचीं लक्षणें, सूचना इ० वरून होणारें ज्ञान २ (वैद्यक) रोगाचा साध्यासाध्य विचार, चिकित्सा ०रेषा-खा-स्त्री कपाळावर लिहून ठेविलेल्या पुढील आयुष्यातील बऱ्यावाईट भाग्याविषयींच्या गोष्टी, दैव, नशीब, भाग्य, ललाटरेषा 'दास म्हणे पूर्व रेखा। प्राप्त न टळे ब्रह्मादिका।' -रामदासाचे अभग (नवनीत पृ १४८) ०वत्-क्रिवि पूर्वीप्रमाणें पहिल्यासारखें ०वय-न मनुष्याच्या आयुष्याचा पहिला अर्धा भाग, बाल्यपण लहानपण 'पूर्ववयीं चित्त निश्चित। तारुण्यीं तेंचि कामासक्त।' -एभा १० २७ ०वयस्क-वि आयुष्याच्या पहिल्या अर्धात असलेला लहान वयाचा, अल्पवयस्क तरुण ०वाद-पु (कायदा) आधींपासूनचा

आरंभीचा भाग, उपोद्घात [पूर्व] ०थाट-पु (संगीत) एका थाटापैकी, स्वरमालिकेचें नांव ह्याचे सात स्वर असे असतात -शुद्ध षड्ज कोमल ऋषभ शुद्ध गांधार, तीव्र मध्यम, शुद्ध पंचम, कोमल धैवत, शुद्ध निषाद

पूरु—पु नदीचें पात्र आगगाडीचा फाटा इ० ओलांडून जाण्यामाठी उचालेला बांधलेला रस्ता, दादर, सेतु; दोन उंच कांठीं किंवा ल न असणारीं टोंकें जोडण्याचें साधन [प्रा पुड]

पूलिका—स्त्री १ दिव्याची ज्योत पुलिका पहा २ स्फूर्ति, ऊर्मि 'बुद्धीची पुलिका विरे। परिमळ प्राणीं उरे।' —माज्ञा ६ २४६ [स पुलिका, म पुली ?]

पलिया—स्त्री राशी, ढीग, जमाव [स पूल्=ढीग होणें, हिं पली]

पूषा—पु सूर्य [स पूषन्]

पूस—पु १ (वार्षिक) पौष महिना २ पुष्य नक्षत्र [स पौष स पुष्य, प्रा पुस्स पुस] ०लाहूणी-स्त्री पौष महिन्यात केली जी मेजवान्या लागीजी लाणी [पूस+लाणी-का।ति]

पूस—स्त्री चौकशी तपास पुस पहा [पुसणें] ०वस-स्त्री खोल चौकशी बारीक विचारणा, तपास 'यथें आल्यावरी शत्रूस पूसखवम करून प रिपत्य करतील' —दिमरा १२९७ [पूस+अर घोरा]

पूंस—पु (महानु) पक्षी, पोपट 'वनकरासिंजा आओरी। रत्नाचे हात शुद्ध न्हीं। सोंकरितातें तुरविभावरी। पूसेयातें।' —शिशु २४५ —न पुच्छ, शपूट [स पुच्छ, प्रा पुत्त]

पृच्छक—वि प्रश्न विचारणारा चौकशी करणारा [स]

पृच्छा—स्त्री प्रश्न सवाल विचारपूस चौकशी [स]

पृतना—स्त्री १ सेना सैन्य फौज 'असता तुम्ही पति पृथा-पुत्र मथिति या स्वीय पृतनेतें। —मोभीष्म ४८ २ सैन्याचा एकतृतीयांश भाग -धार [स]

पृत्सा—स्त्री पृच्छा पहा आणिक जे तुज दुर्बाव्य असेल पृत्सा। तें करी गा तू अवश्य। —रुवादि ९१८९

पृथक्—वि भाग्य, निराळा भिन्न -क्रिवि निरनिराळें वगळेपणानें भिन्नपणानें 'तें पृथग्विधकरण। कर्मांचें इया कारण।' —ज्ञा १८ ३२० [स] पृथक्करण-न १ (शास्त्र) पदार्थांची घटकद्रव्यें निरनिराळीं करणें निराळें करणें वर्गीकरण करणें फोड, विघटन, विभजन (इ) डिकॅपोझिशन, ॲनॅलिसिस २ (न्याय) वाक्यपदच्छेद वाक्यमीमांसा ०जन-पु मूर्ख मनुष्य 'मनी म्हणे हें सतीरत्न। म्यां वर्नीं सान्निध आपण। तरी मी जाहलों पृथग्जन। यथार्थ देवा।' —कथा ११० १६० [स] पृथक्त्व-न वेगळे-पणा, निराळेपणा, भिन्नत्व 'ह जिन्सीपणा माइन महुजिन्सी पणा उत्पन्न होणें यासच पृथक्त्व म्हणतात' —गीर १७१ ०मिळकत-स्त्री (कायदा) वडिलार्जितखेरीज म्हणजे भाऊ, चुलत्या इ०कडून वारस या नात्यानें किंवा इतर रीतीनें प्राप्त झालेली मिळकत पृथगात्मिता—स्त्री प्राण्याची, जीवाची निराळी स्थिति, व्यक्तित्व स्वतंत्र अस्तित्व [पृथक्+आत्मन्] पृथग्वचन-पृथक्करण पहा —सेंपू २१ —पदाव १४ पृथग्भूत-वि विलग पृथक् झालेला, वियुक्त —पदाव ५९ पृथग्भूत किरण-नअव निवडित किरण (इ) स्पेक्ट्रम पृथग्विध-वि निरनिराळ्या प्रकारचा, बहुविध, नानाविध

पृथा—स्त्री (प्र) प्रतीति, अनुभव प्रथा पहा 'तरि नाहीं नाहीं सर्वथा। ऐमी जरी व्यवस्था। तरी नाहीं हे पृथा। कवणासी पा।' —अमृ ४ २६ (पाठभेद) [प्रथा]

पृथा—स्त्री पाहे 'पुरामाजि जाउन भिक्षा पहावें। मिळाल्या पृथा वत मुष्टीक द्यावें।' —सिंसुदाम १५ [म पृथुक]

पृथा—स्त्री कुंतीचें नांव पितामह वदे त्या प्रवळ तू पृथा नदना।' —वामन भीष्मप्रतिज्ञा ८

पृथिमी—स्त्री पृथ्वी पहा 'प्रभा पृथिमीवरी। यकायकी झाकळली वरी।' —ऐपा १२७

पृथिवी—स्त्री पृथ्वी पहा [स] ०पति-पु राजा पृथिवी पति आणिक। बहुत आगती।' —ज्ञा १ १७५ ०वर-पु राजा 'स्वस्थानें त्याच्या पृथिविवर सौख्यें हरपती।' —विवि ८ १ २०

पृथु—वि १ मोठा, जाड, स्थूल २ अवाढव्य, विस्तृत, थोर 'पृथुनितंबनितंबिनिचा वरी। कटिसूत्रचि साजरी।' —वामन [स] ०करण-न (गाप) महत्करण मोठा करणें, दासविर्णे (इ) मॅग्निफिकेशन ०तर-वि फार जाडा विस्तृत स्थूल 'एकें पृथें एकें स्थूळें। एकें न्हस्वें एकें विशाळें। पृथुतरें सरळें। नम्रातें ऐसें।' —ज्ञा ११ १२४ [स पृथु+तर प्रत्यय]

पृथु पृथुक—पु पोहा, पोह [स]

पृथ्वी—स्त्री १ भूमि, जमीन २ जें गंधरूप गुण राहतो असें पंचमहाभूतांपैकीं एक भूत ३ भूगोल, सूर्यमालेमधील पृथ्वी हा सूर्यापासूनचा तिसरा ग्रह आहे वातावरण, जमीन व पाणी हे तीन विषय पृथ्वीशीं संबद्ध आहेत ४ भूगोलावर राहणार मनुष्य पशु वृक्ष पर्वत इ० सर्व जग ५ माती 'अवतरती गाढय्या घडा। पृथ्वी अनोळख जाली मूढा।' —ज्ञा १८ ५८३ [स] ०दिग्विजय पु पृथ्वी जिंकणें सार्वभौमत्व 'दुर्ग तो असाध्य आणि एक जागा अवघी फौज राहिल्या पृथ्वी-दिग्वि जय होणार नाहीं' —भाव १३

पृथ्वी—स्त्री एक वृत्ताचें नांव याच्या चरणांत सतरा अक्षरें व ज स ज, स, य, ल ग हे गण असतात उदा० 'सुसंगति सदा घडो सुजनवाक्य कानीं पडो।' —केका ११८

पृष्ठ-ष्ठ—न १ मनुष्यादिकांची पाठ 'कूर्मरूप हा वनमाळी पृष्ठीं धरिली मेदिनी।' —दशावताराची भूपाळी पृ ८ २ मागची

बाजू पाठीमागचा भाग, पिछाडी ३ कागदाचीं दोन अंगें प्रत्येकीं पुस्तकाचें पान ४ पदार्थाची वरची बाजू ५ (ज्योतिष) (गोल इ०ची) बाहेरची पातळी -सूर्य ८ ६ (महत्त्वमापन) निव्वळ फक्त लांबी व रुंदी आहेत अशी पातळी (इं) सर्फेस ७ (वों) घसण्याचा लहान पाट [सं] सामासिक शब्द- ०केंद्र-न वर्तुळाचा आस, कणा, ध्रुव [सं] ०केंद्रगवृत्त-न एका वर्तुळाच्या ध्रुवातून जाणारें दुसरें वर्तुळ, गौणवर्तुळ

**पृष्ठतोनुपृष्ठ**-क्रिवि १ एका मागून एक, पाठोपाठ, एकाच्या पुढें दुसऱ्याची पाठ येईल अशा तऱ्हेनें (चालत असलेला समाज इ०) २ लागोपाठ अनुक्रमें [पृष्ठ+अनु+पृष्ठ] **पृष्ठदेश**-पु १ घोड्याचा मध्यभाग आणि कंबरेपासून गुरापर्यंत पश्चिम भाग -अश्वप १ ६८ २ पृष्ठभाग पहा ०फल-ळ-न (महत्त्वमापन) कोणत्याहि घनाकृतीची मर्यादा दाखविणाऱ्या सर्व पृष्ठांच्या क्षेत्रफळाची बेरीज, भरीव पदार्थांच्या वरील भागाचें क्षेत्रफळ 'परिघाला व्यासानें गुणिलें असता गोलाचें पृष्ठफळ निघतें' -मराठी ६ वें पुस्तक, पृ ३२८ ०भाग-पु १ पृष्ठ, पाठ २ सपाटी पातळी; सपाटीवरचा भाग (इं) सर्फेस ३ (स्थापत्य) मागची उभारणी (इं) बॅक् एलेव्हेशन ०मात्रा-स्त्री (क, कै, को, कौ प्रमाणें) अक्षराच्या डोक्यावर न देता पाठीमागें दिलेली मात्रा वगैरेप्रमाणें जसें -सैंधव, कपोत याजबद्दल ऽसधव, क ऽपात अशा पृष्ठमात्रा जुन्या कागदपत्रांतून उपयोजीत असत ०मैथुन-न गुदमैथुन, अनैसर्गिक संभोग वच्चेबाजी ०वंश-पु (शाप) पाठीचा कणा, मणिस्तंभ (इं) स्पाइन बॅकबोन ०वंशी-वंशीय-वि कणा, हाडें इ० असलेला (प्राणी) (इं) व्हर्टेब्रेट -प्राणिमो ११ प्राण्यांचे दोन वर्ग आहेत, एकाला पाठीचा कणा असतो तर दुसऱ्याला नसतो ०वंशहीन-वि पाठीचा कणा नसलेला (प्राणिवर्ग) (इं) इनव्हर्टेब्रेट ०वंशाधर-न १ शेवटचा कटिमणि, कटिकशेरुका २ शेवटचा कटिमणि व माकडहाडाच्या वरच्या बाजूचें त्रिकोणाकृति हाड यामधील प्रदेश ०स्वस्तिक-न (नृत्य) हात सारखे वडेवाकडे फेकणें व हात फिरता फिरता त्यांचें स्वस्तिक करणें तसेंच पायांनीं अपक्रांत आकाशचारी करून अर्धसूचीकरणाप्रमाणें पाठीमागच्या बाजूस पायांचें स्वस्तिक करणें **पृष्ठाकृति**-स्त्री (महत्त्वमापन) एक किंवा अनेक रेषांनीं सर्वांगाकडून मर्यादिलेली पातळी [पृष्ठ+आकृति] **पृष्ठांत**-पु पाठीचा खालचा भाग 'उचललें का नेणिजे। तैसें पृष्ठांत उचलिजे।' -ज्ञा ६ १९७ [पृष्ठ+अंत] **पृष्ठानुसारी(बाहु)**-पु (नृत्य) बाहू पाठीकडे नेणें

**पैं**—शअ १ (काव्य, पाशीं करिता) पाशीं, जवळ 'मन न वळे मज जैसा मन अजुन न भ्रमता महाता पैं।' -मोआदि ७ १० २ कडे, शीं, सीं 'खोंचि कीं निरटी मागें। येवढया जैता निघे। आपण पैं जो।' -अमृ २ १९ 'साधुपायांपैं थोळगती सकळ।' -दावि ६७ ३ स, ला, तें 'तें तीर्थे पाता न स्मरे। आपण पैं।' -अ १९ ४ पासून, पाशीं 'तंव गिरिजा म्हणे देवें। मज हिमवंतापैं मागावें।' -कालिका पुराण ५ ४४ ५ वर 'तियांस चाडापैं वांदरें आथें।' -शिशु १९ (साताऱ्याकडील कुणबाऊ भाषेंत मपं=मजपाशीं हा शब्द वापरतात)

**पेऊली**—स्त्री (चांभा) लहान बासाची (कळकाची) पट्टी

**पैक**—न पोंक, कुबड, पोंग, वोंग

**पे(पैं)कट-ड, पेकाड, पेगट**—न १ (निंदार्थी) कंबर, कंबरेचा सांधा, कंबरेपासून माड्यापर्यंतचा भाग २ (वों) कटिप्रदेश, कंबर **पेकडहाड**—न (वों) पाठीच्या कण्याचा खालचा शेवट, अगदीं खालचा मणका, कंबरेचा काटा पेकडहाड व माकडहाड एक नव्हेत

**पेक(ख)णें**—सक्रि (काव्य) वाट पहाणें, मार्गप्रतीक्षा करणें, थोडा वेळ, अमल थांबणें हा शब्द कोंकणी व अशिष्ट सुद्धां आहे [सं प्रेक्षण; सं प्र+ईक्ष्, प्रा पेक्ख, प्रा पेक्खण]

**पेकूप**—अक्रि (गो) जखम इ० बरें होणें

**पैका**—पु वेडकाच्या जातीचा एक प्राणी

**पैका-क्या**—वि कुबडा, पोंक असलेला [पैक]

**पेखण**—न १ नृत्य; नाचरंग 'घरोघरीं वृंदावनें। गीत पखणी देवाचेंनें।' -कथा २ ६ ६ २ काव्याकूट ३ छद -मनरो [सं पेख्]

**पेखणी**—स्त्री (महानु) नर्तकी, नाचणारी 'मध्यें कल्हणी ठाई पेखणी।' -ऋ ६९ [सं प्रेख्]

**पेखणें**—न (महानु) नाच, नृत्य, नाचरंग 'पेखणें या करिती तिआ विद्याधरा नारी।' -धवळे पूर्वार्ध ७१ 'तंव पखणें माडलें श्रीपती। सभारंगीं।' -कथा ७ १० १०९ [सं प्रेख्=हलणें-हलविणें]

**पेखणें**—सक्रि पूर्ण होणें, पीठ होणें [सं पेषण]

**पेलणें**—सक्रि (वों) जखम सुधारणें -शिशु

**पैंग**—स्त्री डुलकी, झोंपेमुळें मान डोलणें (क्रि० येणें) [हिं] **पंगणें** अक्रि १ (झोंपेच्या गुंगीमुळें) डुलकी घेणें २ लंगडणें एका पायावर चालणें ३ (रोगादिकांनीं) निरुत्साही, उदास होणें दुबळें होणें, अशक्त होणें [हिं] **पैंगणी, पैंगणें**—स्त्रीन १ पेंग डुलकी घेण्याची क्रिया (क्रि० देणें, घेणें खाणें, मारणें, येणें) २ लंगडी, लंगडणें लंगडशाई **पैंग(गु)ळणें**-अक्रि निरुत्साही उदास होणें अशक्त होणें, ग्लानी किंवा सुस्ती चढणें, निःसत्त्व होणें, गळणें, कमजोर होणें [पेंगणें] **पेंगळा**-वि ढिला, जड, सुस्त, निरुत्साही, उदासीन, कमजोर (मनुष्य, पशु)

**पे(पै)गंबर पेगमबर**—पु ईश्वराचा दूत स्वर्गाहून निरोप आणणारा मोसेस येशू महमद आणि अली यांस कांहींशा विशेष अर्थानें व आदरानें हा शब्द लावतात [ फा ]

**पेगाम पे(पै)गाम**—पु १ विनवणी उपाय, युक्ति, मार्ग काढण्याचा शिवाय प्रवेश मिळविण्याचा प्रयत्न 'क्यार इमानी मिळून पगाम केला कीं ।'–पद २० १७६ २ पत्रव्यवहार, दळणवळण चालू करणें निरोप युक्तीनें बांधलेलें सधान इ०च्या सालीचा दुवा, एकरूपता परस्पर माहिती किंवा सदश खटपट (क्रि० करणें बांधणें घालणें ) 'राजाची भेट घ्यायाला मी चार वर्षे पेगाम करीत आहे ' 'सखारामबापूचे चहूंकडे पेगाम होते ' २ पत्र आमोका टप्पा आवाका; शक्ति सामर्थ्य ३ बोली (लढाईची) 'तदोत्तर पाचसावेरोजीं सद्रखाचा पेगाम नबाबाकडून आला '–पेद ११

**पेगमबरी नवसागर**—पु एक प्रकारचा नवसागर [ हिं ]

**पेगाव**—पु ( गो ) मातीचा खाव 'पेगाव घालूक जाय= मातीचे खाव घातले पाहिजेत '

**पेंगूळ**—पु एक घाण वास सोडणारा कीटक, पिंगूळ

**पे(पें)च**—पु १ पीळ, वळा आटा वळसा (पागोट्याचा) पाचपेंच अम्बरी आणा कोणी बांधुन पगडीला।'–सला ४१ दोरीचा वेढा विळखा (एखाद्या वस्तूभोवतीं असलेला), पिरगळा वटोळें वर्तुळ(एखाद्या पिळलेल्या वस्तूचें) २ (ल) युक्तीची लपेट हून शकल हिकमत कुस्तीतील मल्लयुद्धातील डाव प्रतिपक्ष्याला पाडण्याची युक्ति भीमानें एक अवघड पेंच घालून राक्षसाची कंबर मोडली ३ ( वाद–व्यवहारातील ) कोडें भाव आडावेढा जाळें तेढ वक्रता कुटिलता कपट ज्या राजकारणात पीळ पेच असेल त्या कामात मी येणार नाहीं –रा १ १४८ ४ त्रास अडचण संकटें दुःख संकट सुनें समजुनि गुरुवंध करिता नमनें ढळत का पेंच।'–मोशाति २ ४७ ५ पचाइत गोंधळ, घोटाळ्याची स्थिति ( क्रि० येणें किंवा पचात पडणें सापडणें धरणें पाडणें आणणें ) ६ मळसूत्र स्क्रू किंवा त्याचा आटा 'हा स्क्रूचे पेच चालले नाहींत ७ पोंच समज 'मुसल्य शिपायाला इतका पेंच सुचला –इप १२३ ८ खोंच (भाषणातील) त्याच्या बोलण्यातला पेंच प्रथम आपणाला कळला नाहीं '–इप ११४ ९ (भाषण वगैरेंतील) खुबी; युक्ति 'अतरीं पीळ पेंच वळसा। तोचि पाडवी बहुवसा।'–दा १५ ६ १४ १० कूट गूढ ज्याचे पेंच जाणावे।'–दा १८ २ ११ ११ (विडीच धंदा) सारा गेंसर (पगाचा) [स प्रत्य फा पेच] ०कस पु (ना) स्क्रू वाटण्याचें हत्यार ०दार–वि १ गुतागुंतीचा नागमोडीचा २ आट असलेला पेंच असलेला वाकविलेला ०दार पेंच वि आटपाण्यें आटें असलेला फार गुतागुंतीचा ०पट्टी–पाटी–स्त्री (सुतारी धंदा) पेच पाडण्याचें हत्यार; आटे पाडण्याचें चपटें यंत्र ०पाच–पाड–पु १ (मल्लविद्या) डावपेच, युक्तीदार लपेट हिकमत पकड २(ल) त्रासदायक धोरण कारस्थान युक्ति छक्केपंजे धावडाव 'प्रीति चिया चोरा नाहीं पेचपाड। भलतैंसे गोड करुनि घेई।'–तुगा १६६५ ३ संकट, अडचण ह्याएवढी भारी गोष्ट आम्ही करीत नाहीं मागील पेच–पाच बहुत आहेत '–पया [ पेच द्वि हिं ]

**पेचक**—स्त्री १ पितळी तार जरतारी कामात हिचा उपयोग करितात २ (फुलमाळी धंदा) हाराची बलावतु (पाटरी क्वचित पिवळी) ३ पक्क्या दोऱ्याची गुंडी [ हिं ]

**पेचकट**—पु (मुद्रण) जुळविलेल्या मजकुराचें, टाइपांचें पृष्ठ बांधण्यासाठीं वापरलेला पक्का दोरा [ हिं ]

**पेचकळी**—स्त्री (प्र) पेशकळी

**पेंचकाड**—न (व) (निंदार्थी) कचर कचरडें पकाड 'त्याचें पेंचकाड मोडलें ' [पेकाड]

**पेंचणें**—सक्रि (राजा गो ) मधोमध दोन भाग करणें उभा चिरणें, फोडणें (बांबू इ० उभा) फाडणें, फुटणें, काष्ठादिक पिंजलें जाणें [पेच]

**पे(पें)चणें**—सक्रि १ पिळणें पीळ घालणें पिळवटणें, पिरगाळणें जोरानें फिरविणें २ घोटाळ्यात चुचकळ्यात पाडणें अडखळविणें निरुत्तर कुटिल करणें (वादात) आपणात कोंडणें पेचात धरणें त्यासी हरएक जाबसालीं पेचून माकूल करीत नाहीं हें अपूर्व आहे –रा १२ १९ ३ अडचणींत संकटात पकडणें पेचात संकटात आणणें घोळितो नृपाला पेंचुनी।'–दावि ४५७ ४ लच करणें तिरपणें दुमडणें वचकणें मुरगाळणें (हात पाय इ० अवयव) [पेंच] **पे(पें)चणी** स्त्री पीळ विळखा पिळणें पिरगाळणें

**पे(पें)चाटी**—स्त्री गोंधळ ज्यासारखी पेच पडल्याची स्थिति कचाटी अडचण पचाईत संकटें (क्रि० सापडणें धरणें) (सामान्यत सप्तम्यंत प्रयोग) [पेच]

**पेचापक्षी**—पु एक पक्षी

**पेज पेजवणी पेजपाणी**—स्त्री न काजी भातावरचें काढून घेतलेलें पाणी कण्हेरी तांदूळ शिजल्यानंतर जें भातातील वेढून पाणी काढतात तें 'पसरिल तरि कर मेघें चातक रसना तृषें करनि करपे ज।'–मोकृष्ण ४६९ [स पय] **पेजट पेजकट**, **पेजरा–रा** १ पचपचीत ज्यात पेज फार आहे असा (भात) २ (ल) थोपशा भातवुड स्थूल दिसण्यात पुष्ट पण शक्तिहीन (मनुष्य) ०**पात्र पेजा**–नदि थोपशा पेजट अर्थ २ पहा [पेज+पात्र] ०**बुडा**–वि (कों) पेजट ज्याला पुष्कळ पेज आहे असा पचपचीत (भात) ०**बुडा भात**–पु पातळ भात आजारी माणसास राहून पचावा म्हणून ज्याची पेज राखली आहे

असा भात ०घुडें–न पेज घालून घट्ट केलेलें ताक ०मारप–क्रि (गो ) पेज जेवणें

**पेजवणें, पेजवत, पेजळूक**—नस्त्री (कु राजा) दुभत्या जनावराचें भाडें [पेजें] **पेजळी**–स्त्री (राजा) भाड्यानें घेतलेलें दुभतें जनावर [पेजें] **पेजें**–न (राजा) गाय किंवा म्हैस व्यायल्यामुळें उत्पन्न होणाऱ्या दोन पैदासीं (पेजें आणि जावपें) पैकीं एक, म्हणजे दूध (दुसरी पैदास म्हणजे जावपें=वासरू) [स पेय] **पेजेंजापें, पेजेंजावपें**–न दुभतें व वासरू न घेता गाय किंवा म्हैस परत घेण्याच्या अटीवर ती पाळण्यासाठीं एखाद्याकडे ठेवण्याची चाल 'ही पाडी मी पेजेंजावप्याचे बोलीनें आणली आहे' [पेजें+जावपें]

**पेट**—स्त्री (व) नदी वगैरे तरून जाण्यासाठीं केलेली भोपळ्याची सांगड, पेटें [पेटारा]

**पेट**—पु १ तोफेची दारू भरण्याची कोठी, (विशेषत) तोफेचा, बंदुकीचा भरलेला बार २ बंदुकीचा, तोफेचा आवाज बार –स्त्रीपु पेट घेणें, शिलगणें, चेतणें (क्रि० घेणें) [पेटणें]

**पेट**—पु (कु) एखादी वस्तु सारखी किंवा सपाट करण्याकरिता थापटणें, ठोकणें, प्रहार, तडाखा, चपेटा [पिटणें]

**पेट**—स्त्री (कु) पेटी, सदूक [स पेटिका] ०फुली–स्त्री (ना) वासाची तयार केलेली ल्हानशी पेटी

**पेट**—न (गु हिं) पोट [दे प्रा पेट, हिं पेट]

•**पेटका–की**—पुस्त्री. १ साप चावल्यामुळें अंगात ओढी येणें, गात्रसंकोच; झटका, लहर, घळ २ स्नायु जोरानें ओढल्यामुळें उठणारी वेदना, वळ (क्रि० काढणें, उठवणें, दाखविणें, निघणें, उठणें, येणें) [हिं ?] **पेटगा-पेटगी**–पुस्त्री स्नायूंत उठणारा गोळा, वखवा, मेंडका, पेडका, झटका, आचका (क्रि० येणें, उठणें)

**पेटणें–णा**—न (कु) चोपणें, थोपटणें, जमीन चोपण्याचें लाकूड जमीन ठोकून सपाट करण्याकरितां याचा उपयोग करितात [हिं पीटना]

**पेटणें**—अक्रि १ चेतणें, शिलगणें, आग लागणें, पेट घेणें २ (ल) रागावणें, क्षुब्ध होणें, संतापणें, भडकणें ३ (बैल) औताला धरणें, वठणीस येणें [देशी] **पेटणी**–स्त्री पेट घेणें शिलगणें, चेतणें **पेटवा**–पु १ आग २ (ल) चिताग्नि 'तरी तुज पेटवा निमित्तार्थ। कामानळें दाटला।' –नव १२ १३९ [पेटणें] **पेटविणें**–सक्रि १ चेतविणें, शिलगावणें २ (ल) संतापविणें, क्षुब्ध करणें ३ वठणीस आणणें, कामाला लावणें (बैल) [पेटणें] **पेटवण**–नस्त्री १ विस्तव पडविण्यासाठीं उपयोगांत आणावयाचें गवत, काटक्या, सांग, चिलप्या वगैरे साधन २ अग्नि पेटण्यासाठीं त्यावर गोंवरीचे तुकडे, बारीक काटक्या इ० रचून ठेवतात तें **पेटवणी**–स्त्री १ चेतवणी, शिलगावणें, क्षुब्ध करणें २ वठणीस आणणें **पेटीव**–वि १ पेटलेला, पेटविलेला २ (ल.) वठणीस आणलेलें, निरढावलेलें (जनावर) [पेटणें, पेटविणें]

**पेटा**—पु १ वर्तुळ, घेर, पोट २ (ल) तावा, अधिकार ३ अनेक गावाचा समुदाय व त्याचें मुख्य ठिकाण, साप्रतचा तालुक्याहून ल्हान देशविभाग, वरींचशीं ल्हान गावें आणि खेडीं ज्यात आहेत असा देशाचा विभाग, परगण्याचा, तालुक्याचा पोटविभाग देश पहा ३ किल्ल्याच्या घेरातील गावाचा समुदाय व तो किल्ला 'एक नगराच्या पेट्यात शभर गाव असतात' ४ अधिकारी पुरुष व त्याचे हाताखालील नोकर किंवा लवाजमा 'मोठ्या पुरुषास आमंत्रण केलें म्हणजे त्याच्या पेट्यात ल्हानसहान येतात' ५ वाघाचा पेटीसारखा पिंजरा, सापळा. ६ (कों) नदी वगैरे तरून जाण्यासाठीं केलेला भोपळ्याचा तराफा पेटें पहा ७ पेटा, एक प्रकारचा भोपळा ८ मुळासकट उपटलेल्या काटेरी झुडपाचा (मुख्यत्वें करडई, हरभरा, अवाडी, ताग इ० चा) केलेला भारा, ओझें, काट्याचा भारा, तसल्या झुडपाची रास, गंजी ९ वाघाचा किंवा सिंहाचा बच्चा 'व्याघ्रीचे अविकुळीं जसे पेटे।'–मोआदि २१.१३ १० ज्या जातीचें पिल्लूं असेल त्या (कुत्रा, मांजर, ससा इ०) जातीचा शब्द पाठीमागें योजून हा शब्द योजितात जसें–कुत्र्याचा पेटा, डुकराचा पेटा ११ (बीजगणित) समीकरणाची एक बाजू [हिं पेट=पोट]

**पेटा**—पु बाजार, पेठ 'उत्कृष्ट विषयाचा पेटा। होत मनाचा चोहटा।' –ज्ञा ८ १८४. [पेठ]

**पेटारा–री**—पुस्त्री १ वांबूची, वेताची–साधारणपणें लांब, चौरस व १५–१८ इंच खोल, अशी केलेली झाकणाची पेटी, टोपली, पेटीसारखा मोठा करंडा २ –स्त्री (अहागरी) नांगराच्या जमीनीतील ढेकळें फोडून ती सारखी करण्याचें व डिफळ्यामागून फिरविण्याचें सुपासारखें एक लोखंडी आउत ३ गारुड्याची साप ठेवण्याची झाकणाची टोपली 'कोपे मानधनाचा पेटारा जो पृथा-सुतद्वेषी।' –मोशल्य ३ ४७ [स पेटक]

**पेटारें**—न १ (वांबूची, वेताची, लाकडाची) ल्हान वाटोळी पाटी, टोपली, करंडा २ (कों.) पेटारें, शेत साफ करण्याचा मोठा कुळव, फावडी; शेतातील कचरा, माती काढून जमीन साफ करण्याचें बैलांनीं ओढलें जाणारें आउत [स पेटक]

**पेटारी, पेटरी**—स्त्री (गो) एक झाड

**पेटिया**—पु दाणाचारा, चंदी, आहार (भोजन किंवा त्याच्या खर्चादाखल पैसा), पोटापुरतें अन्न, भत्ता; शिलेदार, चपराशी वगैरेंना दूर पाठवावयाचें असतां त्यांना देण्यांत येणारा खर्च, भत्ता [हिं पेट=पोट] म्ह० घोडिया घोडा पेटिया घोडा काय कामाचा

**पेटी**—स्त्री १ सदूक, वस्तु घदोयरतानें ठेवण्याचें लाकडाचें आच्छादनसहित साधन, लहान पेटारा २ पुरुषाच्या मणगटा वर, दडावर बाधावयाचें एक भूषण ३ बायकाचा गळ्यातील एक जडावाचा, लहान लहान पग्या असलेला दागिना, चिचपेटी. ४ फगाक्याच्या सरावें वंद पुडकें ५ दगडी जोत्याचा मघला थर, वेंदरी व पाटथर यामधील लहान थर ६ वालतंगी, तंगी, घोडयाच्या पोटाखालून घ्यावयाचा खोगीर आवळण्याचा पट्टा ७ कमरेपासून खायापर्यंतचें चिलखत, जाकीट ८ गाडीच्या दाडघा ज्यात बसवितात तो व गाडीच्या कण्यावर असलेला पटीच्या आकाराचा लांकडी भाग ९ नदींतून तरण्याचा तराफा सागड 'पेटी आणायासी गले तऱ्हा।'—रामदासी २ २८ १० (कों नाविक) परभाणाचे तुकडे मध्यभागीं ज्या ठिकाणीं कांह बाधतात, त्या ठिकाणीं विशिष्ट पद्धतीनें साधतात तें साधकाम ११ (विणकाम) सुताचे थोक एकत्र बाधलेलें वडल पुडकें, जितक्या नबरचें सुत असेल तितके थाक त्या नबरच्या सुताच्या पेटींत असतात १२ (ल) खजीना 'सवळ जनक माझा राम लावण्यपटी।'—स्तोत्रमाला—रामदास, करुणाष्टक १ १३ बाजाची पेटी, (इं) हार्मोनियम १४ (ल) समूह, समुदाय 'सयातें इद्रियवैलांची पटी। न म्हणे अवसीं पाहाटीं।'—ज्ञा १३ २९ [स पेटक, हिं पेटी] ०वाला—पु हार्मोनियमची पेटी वाजविणारा **पेटी(टीं)ची, सागर**—स्त्री एक प्रकारची मऊ, पिठीसाखर ही चीनमधून पेटींतून येते **पेटु(ट्र)ळ**—न लहान पेटी [पेटी]

**पेटें**—न नदींतून तरण्याकरिता अनेक भोंपळे एकत्र बाधून केलेलें साधन तराफा सागड लहान नाव पेटी 'कारभाराचें व्यसन खोटें। जैसें फुटकें पेटें।'—अमृत ११३ [हिं पेठा=भोंपळा] **पेटेकरी**—पु १ माणसाना वरील पटयावर वसवून नद्यादितून नेणारा इसम, सागडवाला, नावाडी २ ज्याच्याजवळ पेटें आहे तो

**पेटें**—क्रिवि मार्फतीत, (कर्जफेडीच्या) पोटीं 'सरकार घेण्या पटें जमा करविण्याची तजवीज कली पाहिजे —(वडोदें) खानगी खात्यातील अमलदाराच अधिकार १५७ [गु पेट पोट]

**पेटोली**—स्त्री जिव्यावर घोडयाचा तग बांधावयाचा ती पोटाखालची प[ट्टी] —अश्वप [पोट]

**पे(पें)ठ**—स्त्री १ अनेक कारखाने असलेलें व्यापाराचें शहर, बाजार गाव, कसबा 'लुल्ली पठ फिरयानें।'—ऐपो ४४५ २ खरेदीविक्रीचें देवघेवीचें ठिकाण, (कापड, धान्य वगैरेचा) विवक्षित बाजार 'प्रणवाचिये पेठे। जाहलें शब्दब्रह्म माजिठें।'—ज्ञा ६ १०९ दुतर्फा दुकानें असलेला शहरातील लाब रस्ता, दुकानाची ओळ 'बाजार असा थाटाचा भरला होता कीं जणु काय एक पेठ वसली आहे' ३ शहराचा मोठा भाग जसें —पुण्याची शनवारपेठ, नारायण पेठ ४ बाजारभावाची बातमी, सावकाराची खबर, बाजारभावाच्या चढ–उताराची माहिती (नि० यणें) ५ खाजगी गुप्त बातमी, (सामा) खबर, बातमी ६ बाजारभाव पेठ उतरली' ७ किल्ल्याच्या किंवा गडाच्या खालचा मोठा गाव ८ पेठीवाल्यांचें बातमीपत्र ९ (अस्सल हुंडी हरवल्यामुळें) नवी केलेली हुंडी, हुंडीची पहिली नक्कल [स पीठ=स्थान, द्रा पेंटे=बाजार, हिं] (वाप्र) ०नसाबी होणें—हें प्रसिद्ध हाऊ देऊ नका, कोणास कळू देऊ नका ०लागणें—गुप्त गोष्ट बोलल्याची वगैरे बातमी फुटणें, पसरणें सामाशब्द— ०करी—पु १ पेठेवरील, बाजारातील मुख्य मनुष्य, पेठेवरील अधिकारी, वाकवगार, शेटया पद्ध २ प्रत्येक गोष्ट जाणणारा व ती करणारा गांवचा कुळकर्णी ३ एखाद्या परगण्याच्या किंवा गावाच्या जोशीपणाची पाळी क्रमाक्रमानें ज्याच्या कडे आली आहे असा माणूस ०चलन—नी,पेठ चालणी—स्त्री—पेठेंत किंवा मोठ्या गावात चालणारें (चलन, नाणें) [पेठ+चालणें] ०पाड—पु पेठेंतील बाजारभाव **पेठेचा गाव**—पु बाजारपेठ किंवा काहीं चागलीं दुकानें असलेला व कधीं कधीं बाजार भरत असलेला गाव, लहानसें शहर, उतारमालाच्या खरेदी विक्रीच गाव

**पे(पें)ठवणी, पेठवणूक पेठविणें**—स्त्रीन बिदागी पाठवणी इ० पद्ध 'पेंठवणी भगा नका टेकू लिगाड।'—तुगा २८२ – [पाठविणें]

**पेठा**—पु गोल दुध्या भोंपळा [स पिंडी, हिं पठा]

**पेड**—स्त्री (गो) एक मासळी

**पेड**—न १ झाड, वृक्ष, बहुधा एखाद्या झाडाच्या नांवापूर्वी योजतात जसें —आंब्याचें–खिरणीचें–बाभळीचें–पेड २ —नस्त्री झाडाचें खोड, मुख्यत्वें जमीनीपासून फांद्या फुटेपर्यंतचा झाडाचा भाग ३ —न (कों) (माड, पोफळी याचा) दुसरीकडे लावण्यासाठीं, मुळास इजा होऊ नये म्हणून बुधाशीं थोडी माती ठेवून खणून काढलेला रोपा, कुडी, दाडी 'रोपाचा पेड जरा मोठा काढ' ४ —न झाडाचा घर, घेरा ५ (गो) झाडाचा पार, वृंदावन [हिं]

**पेड**—पु १ पेड, वेठ एकरी दोरी, पदर (दोरी, वेणी, पीळ इ०काचा) २ —स्त्रीन (कों) जात्याची तळी ३ —स्त्री (कों) उच्च आसन, बसण्याची जागा ४ —न (कों) डोंगराच्या उतरणीवरचा सपाट जमीनीचा तुकडा, भाग ५ (कु) सापाचें वारूळ (विशेषत मुग्यानीं केलेलें) असल्या जागेवर नागाच्या पूजेकरितां बहुधा देऊळ बाधतात [का पिंडी]

**पेंड**—स्त्री १ तीळ खोबरें इ० कातील तेल काढून घेतल्या वर राहणारा चोथा जसें —खोबऱ्याची–तिळाची–करडीची–उडिणीची–पेंड या पेंडीच्या सामान्य चार जाती आहेत पैकीं पहिल्या तीन गुरांना घालतात व चवथीचा खताप्रमाणें उपयोग करतात २ –पु पायाला किंवा जोडयाला चालताना चिकटणारा चिखलाचा (ओल्या काळ्या मातीचा) गोळा, धान्याचा किंवा

दुसऱ्या ओल्या पदार्थाचा भिजून झालेला लगदा ३ कोंवळया नारळाचा घड, नारळीस येणाऱ्या शहाळयाचा झुबका ४ (शेकण्यासाठी) चेचलेली आणि ऊन केलेली पानें, दुखरेल्या भागावर बांधावयाचा नारळाचा चव ५ वेठीला धरलेल्या मनुष्यांनीं वाहिलेलें ओझें, अशा तऱ्हेनें वेठीचें ओझें वाहणें ६ घराच्या पाटणीवर किंवा ओमणावर पसरलेला मातीचा थर ७ (कों) मोठें ढेंकूळ, मातीच्या भिंती इ० घालण्यात उपयोग केला जाणारा मातीचा गोळा, भेंडा 'कीं पेंड आणि कर्पूर। कीं हस आणि बुबड अप विन।'–ह २१ १६५ [स पिण्याक, स पिंड, प्रा पेंड] **पेंडणें**–सक्रि १ पेंड (वाफलेली पानें इ० चें) पोटीस बांधणें २ छपरावर किंवा पाि ल्या मजल्याच्या वरच्या जमीनीवर पड टाकणें ३ व्रण गींचें तोंड चिखलानें वद करणें ४ बांधणें, गुडाळणें ५ गुडाळणें, वळस्टी करणें [पेंड] **पेंड टाकणें**–लागवडीस आणण्याच्या जमीनीवर वाजूनें खुणेसाठीं ढकळें टाकून बा -वहळया घालणें ०चळणें-१ (मोठया प्रमाणात, सख्येंत मनुष्यें, जनावरें इ०) मरणें, आजारी पडणें २ घरात अडकविणें, कोंडणें (ज्याप्रमाणें धनगो रिणकोला कोंडतो त्याप्रमाणें) **पेंडओल**–स्त्री पेंडवल पहा **पेंडखजूर**–पु ओला, लगदा, गोळा झालेला खजूर [पेंड=गोळा+खजूर] **पेंडवल**–स्त्री (थोडासा पाऊस पडल्यामुळें झालेली) ढेंकळाची ओल, जमीन ओली होणें, ओलावा (समासात) पेंडवल–जमीन–भुई–काळी–शेत–मार्ग–रस्ता –वि १ (क) किंचित् ओली झालेली (जमीन) २ (जोंधळा या शब्दा सह) कणसात दाणा असलेला **पेंडवल पाऊस**–पु ढवळ जमीन भिजण्यापुरता पडलेला पाऊस **पेंडसणें**–न (कों) तीळ, खोबरें इ० कांचें तल काढून घेतल्यानतर राहिलेला चोथा पेंड अर्थ १ पहा [पेंड] **पेंडीचा खडा**–पु गाणाऱ्या किंवा नाच णाऱ्याच्या दुरुपतेवरून श्रोते मडळींचें लक्ष दूर करण्याकरिता समासमिरामध्यें बसविलेला सुदर, खूबसूरत मनुष्य [पेंड=चोथा+खडा] **पेंडीचें गुरूं**–न १ पेंडीची आवड असलेलें पेंडीवर पासलेलें जनावर २ (ल) लाचखाऊ लाच घेणारा मनुष्य [पेंड+गुरू]

**पेंड**—पु (मुद्रण) सरस चिकटविण्याचा रूळाचा दाडा

**पेंड**—पु खानदश, नाशीक सोलापूर या प्रातातील मागातीत एक पोटजात –भस्तृ ४७

**पेंड**—पु (व) नदीचा घाट किंवा उतार असलेली जागा जसें–घोड्याचा पेंड 'नादुन्याचा पेंड सोपा'

**पेंडकण**—न कुपणाचें कवाड, दार

**पेंडका-गा**—पु पटका अर्थ ३ पहा

**पेंडका-की-कें**—पुस्त्रीन गवत, कडबा इ० काचा भारा, गड्डा, ओझें 'पेंडकें टाकलें आहे त्याची मजुरी द्या' [पेंड]

**पेंडु(डू)क**—न (कों) गवत, कडवा इ०चा ल्हान भारा, गड्डा

**पेंडकें**—न दोरीचें पेंडें किंवा धातुचें वडें पर्वे पहा [स पिंड]

**पेंडगूळ**—स्त्री एक मोठी वल.

**पेंडण**—न (राजा) मोदक इ० उकडताना त्यास पाणी न लागावें म्हणून भाडयात घालावयाचा पाचोळा, पानें इ०

**पेंडणें**—न (बे) नागराचा भाग, नागराचें रूमणें

**पेंडपोहो**—पु आळशी ऐदी, जड, कांहीं, कलें तरी जो काम करीत नाहीं असा मनुष्य [पेंड+पोहो]

**पेंडवळा-ळें**—पुन १ मर्यादा, सीमा 'लाजेचा पेंडवळा। खाणोनि घाली।' -ज्ञा १३ ६९५ २ (ल) भेंडोळा 'तरि हे गगनवैनगरीचे उभाळे। जाण पोकळीचे पेंडवळें।'-ज्ञा ११ ४६४ [पेंड=ढकळें+आळ]

**पेंडवॉ-वो**—पु (गा कु) एक जातीचा ल्हान मासा

**पेंडस**—पुन १ (कों) दोन हात लाब लाकडी दाडा असलेलें व खालीं चापट सरळ टोक असलेलें खोदण्याचें एक लोखडी हत्यार २ –पु (राजा) खळगे खणण्याचें फावडें, (दुपण करताना) जमिनींत खळगे करण्याची मुसळासारखी लाकडी पहार, उत्कड याच्या शेवटच्या लोखडी पात्याला भाल म्हणतात [पेंड]

**पेंडसळ, पेंडसा**—स्त्रीपु (राजा कों) पावसाळा सपल्या नतर घराच्या वाश्यावर पसरून टाकलेल्या गवताच्या पेंढया भारे, ओमण (क्रि० घालणें, घेणें टाकणें) [पेंड+सळ]

**पेंडळी**—स्त्री पुस्ता –हको

**पेंडा**—पु १ (कों) ओल्या गवताचा किंवा वड इ०च्या पानाचा भारा २ भाताचें वाड, भात्याण ३ विस्तव कायम राहावा म्हणून चुर्गीतल्या आहारागारीं, फुफाट्यात टेवलेला, अर्धवट वाळलेला शेणाचा गोळा [स पिंड, म पेंडा]

**पेंडा, पेंडार-री, पेंडी**—पेंढा, पेंढार इ० पहा

**पेंडापट्टी**—स्त्री (नगदी किंवा मालाच्या रूपानें) फळ झाडावर बसविलेला कर [पेंडा+पट्टी]

**पेंडावद**—पु (सगीत) गाण्याचें ध्रुपद किंवा पाउपद [?]

**पेंडाऱ्या**—वि एका गावापासून दुसऱ्या गावापर्यंत ओझें नेण्यास वेठीस धरलेला (माणूस) [पेंड]

**पेंडाळ**—पुन एक वदनिशेष [पेंड+आळ]

**पेंडी**—स्त्री (गो) एक प्रकारचा मासा

**पेंडी**—स्त्री (व) एक पानमळयात होणारा कद हा सप वासास खातात [पिंड]

**पेंढी**—स्त्री पार्सल सगण मालाचा बाधलेला गड्डा [पिंड]

**पेंडें**—न १ मोत्याच्या सराची माळ २ विरडें, मुदन (दाव्याची, दावणीची गाडयाच्या घाडयाची वगैरे) ३ (कों) एका गल्लीतील, मळातील, परस्पर सबध असणारी मडळी, टाळी,

जूट, झुंड, जमाव 'पंच, वादी, साक्षीदार असें सगळें पेंडेंच पेंडें उठून आलें ' ४ (विणकाम) जुपणी आणि अटणी जोडणारी दोरी, वैल अथवा वैलीची दोरमुदन ५ (ढोराचा धंदा) गोफण मारण्याकरितां कातड्याची केलेली वस्तु-आंगठा [सं पिंड, का पेणे=गुंडाळणें प्रा पेंड=वलय]

**पेंडोळा-ळें**—पुन १ (दोर, नवार इ०ची) गुंडाळी, वेटोळें, गुंडी २ भारा इ० बांधण्याचें साधन, पेंढीचें बंधन (वळलेल्या गवताचें, ओल्या सालीचें, लवचीक वेलाचें) ३ शेताची हद्द सीमा दाखविणारा बांध, कड, रस्ता, रंगा इ० ४ पेंडाची वळ, एका खेड्याहून दुसऱ्या खेड्याकडे जाणाऱ्या ओझ्यानें लादलेल्या वाहनाची किंवा वठीस धरलेल्या लोकांची रांग ५ (ल) क्रम, परंपरा, (यावरून) रूढी वहिवाट, नित्यक्रम [पेंड १]

**पेढ**—पु १ पेड अर्थ १ पहा २ पेड अर्थ २ पहा ३ एक प्रकारचा निवडुंग ४-न (कों) नारळ, पोफळ, माड, सुपारी इ०चें झाड (या शब्दाचा उपयोग रोप लावण्याच्या किंवा गणती करून कर बसविण्याच्या संबंधात करतात) ५ पेड अर्थ ४ पहा [पेड]

**पेंढ**—स्त्री (गो) पेंड अर्थ १ पहा [पेंड]

**पेंढका-की-कें**—पुस्त्रीन भारा, पेंडका पहा

**पेंढर-रा-री**—पुस्त्री एक प्रकारचें झाड; याच्या फळास पेंढरें किंवा तूप केळें म्हणतात

**पेढा-डा**—पु १ दुधाचा खवा करून त्यांत साखर घालून तयार केलेली मिठाई, दूधपेढा २ डोंगराच्या माथ्यावरील किंवा उतरणीवरील कांहींसा उंच व सपाट भाग [हिं] **पेढवणी**—न पेढ्याचें तार धुवून काढलेलें पाणी [पेढ+पाणी] **पेढेघाट**—पु पेढ्याच्या आकाराचें रत्न (मोती किंवा माणिक) [पेढा+घाट] **पेढेघाटी**—वि पेढ्याच्या आकाराचें (रत्न, जवाहीर, डबा)

**पेंढा**—पु १ (कों) भाताचें तृण, भात्याण २ भात्याणाचा भारा, मोठी पेंढी ३ भात्याणाच्या तीन घाडांचा भारा ४ जोंधळे, भिजत घालून व अबवून तयार केलेलें एक पेय, गुराच्या किंवा माणसाच्यां करितां भातणापासून तयार केलेलें एक पेय [सं पिंड्=गोळा होणें] ०**भरून ठेवणें**—मेलेला बाघ, लांडगा याच्या कातड्यांत गवत भुसा भरून तें दाखविण्याकरितां ठेवणें

**पेंढार-रा-री**—नपु १ लुटारू लोकांची टोळी, समुदाय पेंढारी लोक हे लूट घोडस्वार असून अनेक मिळून गांव, देश लुटीत असत २ (विशेषत) पेंढारी लुटारूंची धाड (क्रि० घालणें) ३ गाई-म्हशींचे कळप घेऊन फिरणार अहीर वगैरे [सं पिंडार=गवळी]

**पेढी**—स्त्री १ बसण्याकरितां, जेवणाचीं ताटें, दप्तर वगैरे ठेवण्याकरितां जमीनीवर केलेली उंच जागा २ सराफकट्टा, सराफाची बैठक, बसण्याची जागा, सराफ, हुंडीवाला यांचें दुकान ३ (गुज) दुकान ४ (अर्थशास्त्र) पैशाचा व्यवहार करणारी संस्था (इं) बँक [सं पीठ=आसन] ०**वाला**-पु पैशाचा, भांडवलाचा व्यापारी, पेढीचा मालक

**पेंढी**—स्त्री १ गवत, कडबा वगैरेची जुडी, ल्हान गड्डा, कापलेल्या जोंधळ्याच्या ताटाची मुठींत मावेल अशी गड्डी २ पेंढें अर्थ १ पहा ३ (कर्ज, व्याज वगैरेचें) ओझें, भारा (क्रि० जमणें, होणें, असणें) (गो) वस्त्राचा गड्डा [पेंढा] (बाप्र) **जळत्यांत पेंढी टाकणें**-कलहास उत्तेजन देणें ०**काडी**-स्त्री (व्यापक) पेंढ्या 'पेंढीकाडी मागायला बळतें आलें' [पेंढी द्वि]

**पेंढें**—न (विणकाम) १ वैलीच्या गुलड्याला अडकविलेलें धातूचें कडें किंवा दोरीची मुदन दोरीचें एक आठबोटें ईंदीचें वाटोळें कडें केलेलें असतें व तें आट, चाळ, तनकूल गुल्डा वगैरेस ताण देण्यासाठीं उपयोगी पडतें २ ढेंकणी आणि वही यांना साधणारा दुवा

**पेड्या**—पु एक प्रकारचा निवडुंग

**पेंढ्या**—पु एक खेळ यांत प्रत्येक मुलाजवळ एक एक पेंढी (गवताची) असावी लागते हा फक्त पावसाळ्यांतच खेळतात -मराठी खेळांचें पुस्तक ११७

**पेण**—स्त्री (प्र) पाणकोळी पहा

**पेण-णें**—न. १ मिरवणुकीच्या वेळीं पालखी उभी करण्याचें एक ठराविक ठिकाण, प्रवासांतील मुक्कामाची जागा 'देवा तंव कृपे वाचून । मीं न पावचि हें पेण ।' -कथा २ १ २ मुक्काम, मजल, टप्पा, मजलीवर थांबणें 'करा एक वेळे पेणें । मग नलगे येणें जाणें ।' [सं आप्यायनम्]

**पेत्राल, पेत्रॉल**—न (गो) रॉकेल, घासलेट [इं पेट्रोल, पोर्तु पेत्रोलिओ]

**पेत्रोल्ल**—स्त्री (गो) एक फुलझाड

**पेंद**—स्त्री (गो) शेताच्या (खाचराच्या) बांधाची वरई मजबूत व्हावी म्हणून लावण्यांत येणारा चिखल

**पेंद**—न (कों) गवत, भात वगैरेचा जुबडा; तृणादिकांचा एका बीजापासून अनेक अंकुर फुटून होणारा विशिष्ट समुदाय, नारळाचा घड [सं पिंड, म पेंढ] ०**फाटणें**-भातशेतांची, लावणी नंतर बेणणी करणें **पेंदारणें**-अक्रि (कु) १ पेंद होईल अशा रीतीनें विस्तृत होणें, विस्तारानें वाढणें (गवत वगैरे) २ झुबकेदार पेंदांनीं आच्छादित होणें (जमीन). [पेंद]

**पेदिंद**—पु (गा) मागणी; शब्दटाकणी

**पेंदी-धी**—स्त्री १ प्याला, भांडें वगैरेची बैठक, बूड २ उडविण्याच्या पतंगाचा खालचा भाग ३ फल्मरडी, पेंदी (क्रि० करणें, बांधणें) ०**पतंग**-पु पेंदी असलेला कागदाचा पतंग.

पेदीद—पु (गो ) पत्त्यानीं खेळण्याच्या जुगाराचा एक प्रकार [ पोर्तु पेदिदो ]

पेंदूर—न कोंकणात होणारें एक झाड यास ज्येष्ठ आषाढ महिन्यात पेरूएवढीं फळें पडतात याचा रग हिरवा असतो याची भाजी करतात —वगु ४ ८०

पेंद्रो—पु (गो ) स्मशानरक्षक

पेंदो—पु ( कु ) खेकडयाचा मगज किंवा पाय.

पेद्रू—वि दुबैल, कमकुवत, निर्बल, भित्रा 'वसईच्या किल्ल्यावर भगवा झेंडा रोवताना भेदारलेल्या एखाद्या पेद्रूला विचारलें असतें तर ' –नि ९५ [ पोर्तु पेद्रो ]

पेंधा—पु गोळा –शर –वि मोडका, पागळा 'जे अनगु तो पेंधा। निववडा नुमधा।' –ज्ञा १३ ९८० [ पेंड ] पेंधें—न पडित जागेंत, शेतात उगवणारें गवत

पेनसिल—स्त्री १ दगडी पाटीवर लिहावयाची दगडी काडी २ ( कागदावर लिहावयाची ) शिसपेनसिल [ इ ]

पेनसी—वि (नदभाषा) पन्नास 'तुम्हाजवळ पेनसी भुरके ( रुपये ) मिळतील काय ?'

पेनेत—न ( गो ) बायकाच्या कानातील एक दागिना, ईअररिंग [ इं पेंडट ]

पेन्शन—न ठराविक मुदतीपर्यंत चाकरी केल्यानतर तहा हयात मिळणारा बैठा पगार [ इं ]

पेपर—पु १ कागद २ ( परीक्षेचें ) प्रश्नपत्रक ३ वर्तमानपत्र [ इ ]

पेपरमिंट—न १ पुदीन्याचा किंवा एका विशिष्ट वनस्पतीचा अर्क २ हा घालून केलेली मिठाई [ इ ]

पेपाणी, पेंपेरें—स्त्रीन (पानाची ) पिपाणी, वाजविण्याची पोंगळी, पुंगी, नळी, शिटी [ ध्व ]

पेमनें—न ( व ) ( विदार्थी ) पाणचट पातळ पदार्थ 'साबूदाण्याचें पेमनें शिजविलें आहे, लागेल तर खा '

पेय—स्त्री ( कु ) गुराच्या पोटातील एक रोग

पेय—न पिण्याचा पदार्थ –वि पिण्यायोग्य, सारखें [स]

पेर—स्त्री ( कों गो ) पेरूचें झाड –न पेरू, जाब [पेरू]

पेर—पु १ बैलाकडून मळलीं जावींत म्हणून खळयामध्यें कणसें वगैरे पसरणें, पात, अशा रीतीनें पसरलेलीं कणसें ( क्रि० घालणें ) २ ( पेरल्याप्रमाणें ) धान्य, फुलें कागद वगैरे, निरुपयोगी वस्तु याची पडलेली पखळण, पसरण ( क्रि० घालणें करणें, होणें, पडणें ) अशा रीतीनें पडलेल्या वस्तू –स्त्री वीं बीज पेरणी [ पेरणें ] म्ह० पेर तसें फळ

पेर पेरें—न १ बोट ऊस वेळू इ० चें कांडें तुकडा पेरें, वळू वगैरेच्या दोन गाठीमधील भाग चौऱ्यायशी लक्ष योनी। तिर्ये काडा पेरा सादणी।' –ज्ञा १४ १०७ २ बोटाच्या टोकाचा रोग [ सं पर्व ] ०कंड–(व) ज्वारीच्या ताटाचें, धाटाचें पेर

पेरअळू—न एक झाड, गेळ

पेरओल—स्त्री पेरवल पहा

पेरकूं—न १ मोडलेलें, लडबडीत, निरुपयोगी पेर, काडें, चोरू. २ ( ल ) सैकट, अडचण, त्रास; लचाड ( क्रि० लावणें, लागणें, येणें, बसणें, जडणें ) [ पेर+काडें ]

पेरकूट—न एकप्रकारचा निवडुग [ पेर+कूट ]

पेरगांव—स्त्री ( गो ) जाहिरात, दवंडी [ पेरणें, पसरणें ]

०कार–पु ( गो ) दवंडी पिटणारा

पेरण—न पाण्याच्या आश्रयास वाढणारें सुदर पानाचें झाड हें सावलींत ठेवून यास पाणी घातल्यास हिरवेंगार राहतें [इ फर्न]

पेरण-णें—न ( प्र ) पेहरण [ स परिधान ]

पेरणें—उक्रि १ उगवण्यासाठीं जमीनींत बीं टाकणें, लावणें २ पसरणें, पसरून टाकणें, फेंकणें साडणें ३ (ल) पाया घालणें, आरंभ करणें, उत्पन्न करणें ४ ( ल ) पसरणें, फैलावणें (बातमी, खबर, चुगली, कडया इ० ) ५ (ल ) विद्यादि गुण प्रसृत व्हावयासाठीं शिष्यादिकास शिकविणें ६ (ल) अधिक प्राप्तीच्या इच्छेनें ( व्याजाच्या बोलीनें ) धन इ० दुसऱ्यास देणें. [ स प्र+ईर्‌यू, प्रा पेर, पइर, हिं पेरना ] पेरणी-पेरा–स्त्रीपु शेतात बीज पेरणें, पेरणी करणें, बीजारोपण पेरीव–वि १ पेरल्यामुळें उगवणारें सहजगत्या, आपोआप जें उगवलें नाहीं तें २ पेरलेली ( जमीन ) ३ पेरलेलें ( बीं, धान्य ) म्ह० जसें पेरावें तसें उगवतें पेरवल–स्त्री बीं पेरण्यायोग्य असा जमीनींतील ओलावा [ पेर+ओल ]

पेरवी—स्त्री पैरवी पहा

पेरसवाणा—वि ( व ) खिन्न, उद्विग्न 'आईवाचून इतका वेळ राहिल्यानें मूल परसवाणें झालें '

पेरसोन—वि ज्याचे कान मोठे व डोळे मनुष्यासारखे आहेत असा ( घोडा ) हें अशुभ लक्षण होय –अश्वप १ १०४

पेरा—पु ( सोनारी ) सोन्याच्या कांबीच्या गोल सळया बनविणें ( आमठी इ० करण्यासाठीं ) [ पेरें ] पेरांची अवटी–स्त्री सोनाराची अवटी एक प्रकारचा पेर किंवा साधे असलेला एक पचरस धातूचा तुकडा याला आडवे रवे असतात वावाची अवटी आणि बेटणी पहा

पेराज—स्त्री ( कों ) (नाविक) होडीच्या काठावर आडवी, जाड ठोकलेली फळी ही सर्व गलबतास नसते [ परें ? ]

पेराव-वा, पेरावणी—पुस्त्री पहराव, पेहरावणी पहा

पेरुजा, पेरोज-जा पिरोजा—पुन वैडूर्य, एक रत्न, पाची पेरोज हीरे माणीकें।'–धवळे, उत्तरार्ध ५० [फा फिरूदा]

पेरू—पु जांबाचें झाड, फळ [ पोतु ]
पेरू—न जमीनीवरील एक पक्षी टर्वी –शृ २१०
पेरें—न १ पर-पेरकें अर्थ १, २ पहा २ पन्याच्या अव टीरा ठोकून ठस, उे पाडलेली सान्या-चादीची सळई (स पर्व)
पेरळ्या-पु परकांत घालावयाची उसाची पेरी तोडणारा
पेर्णे—स्त्री (गा ) सरवम
पेन्या—पु एक जातीचा घवडा [ पेरे ? ] –कृषि ५८६
पेर्वी—स्त्री (गो ) एक जुन्या काळचा दागिना ०चेट–म (गो ) पर्वी करण्याचें सोनाराचें एक हत्यार
पेल—पु ताणण्या-सावरण्याची क्रिया (प्र ) पलाव पहा
पेलकट—न निंदा आराप आळ (क्रि० घाल॑ वणें)
पेलण णी—नस्त्री १ तोल राखणें पलणें समतोल (क्रि० राखणें, टेवणें ) २ वजन सर्वस्व जोर (क्रि० चालवणें, चालणें )
पेलणें-नें—न (कों ) छपरावरी॰ गवत इ० न उडावें म्हणून त्यावर आडवी टाकलेली ताड इ०ची फांदी या कामाकरितां जर जाडी लाकडाचा उपयोग केला असल तर तें आडवें न टेवतां मुगळापासून लोंबतें (वरून खालीं असें ) टेवतात
पेलणें—सक्रि १ समतोल राखणें तोल सभाळून धरणें स्थिर समतोलात राखणें (ओझें उभी काठी इ०) २ मुद्गल, लेजीम इ० शरीर दृढ करण्यासाठीं फिरविणें ३ (ल ) निभावणें झपणें पेटणें पार पाडणें (अग्नचर्णीतून) आत्मपणें चालविणें व्यवस्था लावणें (पैसा शक्ति बुद्धि इ० काच्या जोरावर) ४ दामटणें हाकलणें पुढें लोटणें (मनुष्य जनावर) पुढें रेटणें ढकलणें घरविणें (सैन्य) दवडणें पाठविणें (दूत) ५ लोटणें राम पहाया पलती। –वेसीस्व ९ ७३ ६ घर साव इ० एका अगावर घेणें ७ तयार होणें 'तव पुढां वाढी पेल। नवेया वहाची। –ज्ञा १५ १६० ८ भरणें –मनको [ स प्र प्रेरण प्रा परण पेल्ण पल्इ] पेलाव पेल-पु १ उचलणें तोलणें (वाहून न्यावयाचें ओझें ) शरीर पेलणें किंवा समतोल राखणें (उडी मारण्याच्या वळीं ) शरीराचा तोल २ (यत्नाचा कामाशीं मेळ बसण्याकरिता) निश्चित व सघटित यत्न [ पलणें ]
पेलच—स्त्री (कों ) पद्
पेलवान—पु (प्र ) पहिलवान पहा [ हि ]
पेल्गा—पु १ धातु काच माती इ० चें पाणी पेय पिण्याचें भाडें प्याला २ (विणकाम) ताण्याच्या सुताचे चालदन पालटून वर-खालीं होण्यानें तयात पेल्यासारखा उत्पन्न होणारा आकार ३ (शिवण) सरदारी अंगरख्याचा (छातीवरील) पेल्यासारखा गोल भाग गिर्वाणवरून उजवे कडील पेल्याच्या आकारात त्या आकाराची पट्टी बसवतात ' –शिकशि २ २० [ वैदिक स पद्द फा प्याला ]
पेला पेलें—पुन (कु कों ) काम्यांचा, झाडाच्या वळ्यांचा वुणण्याकरितां बांधलेला भारा ओझें [ पलणें ]
पेली—स्त्री १ ओली साल लाकूड 'कलियुगातीं कोरडी। द्वापुरयुगीं साउेसाडी। तत्रतयुगाची पेली। दग्धणी पडे पुढती।' –ज्ञा १५ १२९ २ उत्पत्ति –शर
पेढू—स्त्री कणांच्या जागा, जटांच्या कणाचा सुबका पद पहा
पेलोवेली—स्त्री वाढ वृद्धि 'पाटीं रूपपण पेलावली। पशु लावतें काढें पाली। ' –ज्ञा १५ १०२
पेल्याड—स्त्री (गो ) पैलतड, पलीकडील जागा [ पैलाड ]
पेल्ल—पु (गा ) चेंडू
पे(पें)य—न धान्य सांठविण्याची जमीनींतील कोरडी विहीर जमानींतील कोठार 'काय मुस पेंव आपदांची धाव। निटय तुझें नाव मुच्चारितां।' –तुगा १०४ [ ? ] ०फुटणें-उघडणें–भार बाहेर पडणें गोळा होणें ' भिकाऱ्यांचें-ब्राह्मणांचें-मुग्यांचे-पेंव फुटलें ' ०भरणें-(वायकी) चातुम सांत वेरापुढें सुमारें कोपवें भर धान्य मावल असे दोन खळगे काढून एकात तांदूळ व एकांत दाणे असा रोज घाद्रा उदक सोडणें पेंवात पडणें–मोठ्या प्रासात, सकटात पडणें ०खुड-स्त्री पेंव उपसून धान्य काढताना गावचा कुळकर्णी व महार यांना हक्क म्हणून त्यातून थोडें धान्य द्यावें लागतें तें
पेवगा—पु (कु ) एक पक्षी
पेवडी—स्त्री पिवडी, पिवळा रग पळसाचीं फुलें गोमूत्रात भिजवून तयार केलेला पिवळा रग [ पिवळा ]
पेवणें—सक्रि (राजा ) पोहणें (गो ) पेवन पेववें पेवणा–स्त्री (राजा ) पाटणें (क्रि० मारणें टाकणें) [ पोहण ]
पेवंदी-घी—स्त्री झाडाचें कलम बांधणें कलमबदी –वि १ कलम केलेलें (झाड) २ ठिगळ लावलेला ठिगळाचा [ फा पवद ]
पेवली—स्त्री (व ) विड्याचीं पानें टेवण्याची टोपली [ पव? ]
पेश-षें—पुन १ एक वनस्पति २ एक औषध
पेश—वि वजनदार दरबार वगैरे मध्यें मान-मान्यता असलेला सन्माननीय (माणूस इ० ) राजकारणात बहुत पेश ' –पेद२१ ९१ [ फा पेश ] ०करणें-पुढें ठेवणें सादर करणें (अर्ज इ०) अर्पण करणें बदगीस पश केली –इम ६५ ०कदमी–स्त्री १ पुढें पाऊल टाकणें प्रगति दिवसेंदिवस त्याचे फौजेची पशकदमी आहे –रा ६ ४३७ २ पहिली हालचाल युद्धाची हालचाल जितका मुलुख आपल काबूत येईल तितका पुरेंपणें बदोबस्त करून मग पुढें पेश-कदमी करणें ठीक आहे ' –दिमरा १ १८० ३ आगळीक आम्हांकडून अतर नसतां तिकडून पेश–

त्याचा वयान काय लिहू ? ' –रा १० १३९ ३ (ना) जबानी, म्हणणें [अर बयान्] ०अर्ज–पु साक्षणी (क्रि० करणें, सांगणें) 'हेंनीच जाऊन राजश्रीयांसी ह हकीकती बयाण-अर्ज केले ' –इम १० ०धार–वरा–क्रिवि तपशीलवार, सविस्तर 'खबर बहुत बयानवार लिहिली ' –रा १५ ३१ [फा] ०तहरीरी–पु लेखी जबाब

**वयावया**—क्रिवि (व) उगीच, खोटेंच, येरेंं, दादून 'हें भाडण वयावया झालें ' [वठें वठें ?]

**वयावल**—न विस्तार इ० बयाद पहा

**वर**—स्त्री (गो) वरगडी –शिंपु

**वर**—पुलीन पूयप्रधान द्रव्य, मुख्यत्वें रक्तमिश्रित पू (क्रि० वाहणें, जमणें, साचणें, भरणें, धरणें)

**वॅर**—स्त्री (गो) भिंतीवर शेवटच्या थरात रचलेली नक्षी केलेल्या चिऱ्याची, दगडाची रांग. [वर ?]

**वरईक**—स्त्री चांगलें नाव, चांगली कीर्ति (क्रि० संपादणें, मिळविणें, मिळणें) [वॅर]

**वरक**—न मेंढयाची लोंकर आणि बोकडाचे केस यांच्या मिश्रणापासुन विणलेलें वस्त्र अधिक बारीक व तलमदार वरकास कुर्के म्हणतात

**वरकडी**—स्त्री वरगडी, फासळी

**वर-कण-कन-कर-दिनीं-दिशीं**—क्रिवि चिखल, शेण इ० मध्यें पाय भरणें इ० क्रियांच्या आवाजाप्रमाणें ध्वनि होऊन [ध्व]

**वरकणी, वरकता, वरकांण**—स्त्री (कु) एक लहान जातीची होडी, क्रीडानौका [पोर्तु बरकिन्हा, बरकेता]

**वरकत-खत, वर्कत**—स्त्री १ सिद्धि, यश, सुपरिणाम, लाभ २ यशस्विता, भरभराट, भाग्यशालीपणा 'ज्याचें दैव अनुकूल नाहीं त्यास कोणत्याही व्यवहारात बरकत येत नाहीं ' ३ भरभराटीचें आधिक्य, कल्पनेपेक्षा अधिक नफा, प्राप्ति, फायदा (कामात, धंद्यात) ४ कोणतीहि वस्तु मापताना एक या सख्ये ऐवजीं करिता म्हणतात, लाभ [स भृ–भर, अर बरकत] म्ह० नियत तशी बरकत=बुद्धि तशी समृद्धि ०सोडणें–(शेतानें) आपली मातबरी, सुपीकपणा गमावणें, टाकणें

**वरकत्या-ता, वरखत्या-खट्या**—पु (कों) भाताची पेंडी बांधण्यासाठीं भात्याणाचा, गवताचा वेलेला बंद दोर

**वरकंदाज वर्कंदाज**—पु बंदुकवाला शिपाई, बंदुकीनें नेम मारणारा, गोळीबार करणारा इसम 'चौकडीनें एक हजार पावेतों बरकदाज निवडक. ' –समारो २ ४ [फा बर्कअंदाज] बरकं(क)दाजी–स्त्री तोड्याची बंदूक सोडणें, निशाण मारणें, गोळयांचा भडिमार [फा]

**वरकशी-कस, वर्कशी**—स्त्री १ स्पर्धा, चढाओढ, भांडण 'बलवंताबरोबर बरकस लावणें ती विचारें करून लावावी ' २ आकस, द्वेष, वैर, शत्रुत्व (क्रि० बांधणें, धरणें, बाळगणें, चाल वणें) 'माझ्या घरच्याची तुझी आधींच किर बरकशी। ' –राला ६३ [फा बर्‌आकस] ०धरणें–राग धरणें

**वरका**—वि १ मऊ, विलविलीत, घट्ट नसलेला (एक प्रकारचा फणस, त्याचें झाड, फळ व गरा) (गो) वरकय २ पिठयें विमूड [का बके]

**वरका**—पु (कु) कफ, बेडका [बेडका]

**वरकाळी**—स्त्री पांदोटी, चिंधी, धुडका

**वरखाड**—स्त्री (व) न्यूनता, वाण 'भाताची वरखाड आली पर्कीत। ' [बरखास्त ?]

**वरखा(का)स-स्त, वर्खास्त, वर्खास**—वि विसर्जित, उठलेली, मोडलेली, समाप्त झालेली (सभा, कचेरी इ०) 'कचेरी बर्खास व्हावी ' –रा ६ ५१० [फा बरखवास्त]

**वरग**—पुन १ एक धान्य, ज्वारी, बाजरी, नाचणा इ० चें बीज 'बरगासाठीं खादलें शेण। मिळता अन्न न सडी। ' –तुगा ३११९ २ –पु (ल) केसामध्यें गोचिडया, उवा पडणारा, गुरास होणारा मधुऱ्या रोग, गोचीड, ऊ 'बरग पडोनि मेलीं गुरें। मार्डी नेलीं म्हणावें चोरें। ' –भवि ४९ ९३ ३ (गो) लाकडाचा भुसा करणारा कीटक ४ –न (गो) न कुजलेलें लाकूड ५ (महानु) दुष्काळ, अवर्षण 'बरग पडिलें कव्हणी एकीं वर्षी।'–भाए ४२०. ०पडणें–अक्रि दुष्काळ पडणें **वरगे(ग्ये)ण**–न बरग धान्याचा पेंढा, भात्याण [बरग+त्राण]

**वरगडी, वरगडा-ला**—स्त्रीपु फासळी, छातीचें हाड **वरगड्या, वरगडे-ळे मोडणें**–१ बरगड्यांची हाडें मोडणें, (ल) अति श्रम करणें, अति श्रमानें भागणें, थकणें २ (ल) नम्र व विनीत करणें, नरम करणें, खोडकी जिरविणें, अभिमान उतरविणें (हाडें घुमट्या यथेच्छ ठोकून)

**वरगण**—स्त्री (व) नुकसान, तोटा 'सन्यात बरगण भरावी लागली '

**वरगळ, वरंगळ**—वि दूरदूर, विरळ घट्ट नसलेल्या विणीचा (कपडा चटई वीण, दात, आळ) [स विरल ?]

**वर(ं)गळणें**–अक्रि १ विरळ विणीचा, रचनेचा, ठेवणीचा असणें (कपडा दात इ०) २ बडबडणें, विसगत बोलणें, बडबडणें ३ उत्कंठित, अधीर होणें ४ (प्राय वारगळणें) भडकणें

**वरगळभूत वरगळलें-गळेल-वरगेल-ळ भूत**—न भुकेलें माणूस, भुकेनें उत्कंठेनें कावराबावरा झालेला मनुष्य **वरगळेल**–वि भुकेला, अधीर, उतावळा म्ह० बरगळेल भूत कोंडोळ्यावर राजी

**वरगा**—पु १ इमारतीलाकडाचा चौकोनी तुकडा, दोन तुळयावरील आडवी कडी, वासा इ० २ भिंतीत बसविलेला खांब [ हिं ] ०**मोडणें**–वडगा मोडणें

**वरची-छी-शी, वर्ची-र्छी-र्शी, वर्चा**—स्त्रीपु एक प्रकारचा लहान भाला, अंकुश लटकल्या इसमाच्या डोक्यापेक्षा जास्त उंचीचें, लोखंडी दांड्याचें व शेवटास निमुळती सुरीप्रमाणें केलेलें भोंसकण्याचें शस्त्र 'विचवा लवंगी सुरगुन साग सोटा वरची पेंफिती।'–ऐपो १०९ 'बरशी सरशी मारी नैनाची पाहून हजारों अल्म फिदा।'–पला ४ ३३ [ हिं बरछी ]

**वरज**—पुन ( राजा ) वरग पहा

**वरजोर, वर्झोर**—वि सख्त, बलाढ्य 'वर्झोर नतिजा देऊन'–ब्रच ५७ [फा वर्झोर] **वरजोरी**-स्त्री (गु) बळजबरी

**वरट-टा**—पु चिखल 'मग दु खाचेनि वरटें चोंवले।'–माज्ञा ७ ८८ [ वरवट ] **वरट चोंबळणें**–सक्रि सारवणें

**वरटी-ड**—स्त्रीपु भातशेतातील एक तृणधान्य, पाढरें, बारीक वरी-राळयासारखें असणारें धान्य, याचें कणीस नागली प्रमाणें असतें 'शेतींतील निंदन काढलें होतें तरी सुद्धा वरड सुटून राहिला' गहू० तुरीबरोबर वरड पिरडला जातो'

**वरड, वरडखरड, वरडा-डी**—स्त्री १ माळ जमीन, भरड 'वेधता कठिणशा वरडातें।'–किंगवि २६ २ ( कों ) भाताचें आवण काढल्यावर पुन्हा आवणासाठीं दुसऱ्या वर्षापावेतों पडीत टाकलेली जमीन [ ता वरडु=रुक्षता ]–वि १ आत मुरूम, गोटा, वाळू व तांबडी माती असणारी ओसाड, नापीक, निकस (जमीन) 'कमाकर्माचे गुडे। बाब घ तलें दोहींकडे। नपुनकें वरडें। रानें केली।'–ज्ञा १३ ४७ २ भाकड 'कीं कामधेनु पय पान। वरड गायीस मागतसे।'–भवि १० १२२. ३ ओबडधोबड, खडबडीत 'कीं वरड गोटे चिंतामण। परी अभग जाहले कीं।'–भवि १० ५ ४ ( ल ) देवीचे व्रण असलेला ( चेहरा ) [ बरड हिं ] **वरडरान**–न माळरान

**वरड**—पु धान्य, लाकूड इ० स उपद्रव देणारा किडा **वरडणें**–अक्रि १ किडणें, (धान्य लाकूड इ०) किड्यांनीं पोखरलें जाणें ( गो ) बडुचें, वड्डुचें २ ( ल ) देवीचे व्रण, खळगा पडणें [ वरड=कीड ]

**वरड बोंबल्या**—वि ( व ) गुप्त ठेवावयाची गोष्ट सांगत सुटणारा, बोंबाबोंब करणारा [ ओरडणें+बोंबलणें ]

**वर(रें)डा**—पु ( व कु ) उंचें अंडें, अंडें; लिखा

**वरडा, वरडी सुपारी**—पुस्त्री जून पोफळाची शिजवून, वाळवून तयार केलेली सुपारी

**वरडेल**—न वडे तळून काढल्यावर राहिलेलें तल, वडेल [ वडा+तेल ] ०**काढणें**–सक्रि ( ल ) मारणें –रासो

**व(भ)रणी**—स्त्री चिनी मातीचा लावट घट, उभट भांडें 'एखादा न देखे तरु स्वप्नीं। त्यासी मिळे क्षीरभरणी।'–गुंच १३ ६ [ सं भरण ? ]

**वरतरफ-र्फ वर्तर्फ**—वि कामावरून काढलेला, पदच्युत. 'मुरादखान याची फौज अगदी वर्तर्फ केली'–ख १ २२४ **वरतरफी वर्तर्फी**–स्त्री चाकरीवरून दूर करणें, काढणें [ फा ]

**वरतर**—वि जास्त मोठा. –आदिलशाही फर्मानें [ फा ]

**वरतावा**—पु ( व ) कारभार, कारकीर्द [ हिं ]

**वरदार, वर्दार**—वि वाहणारा, नेणारा मुख्यत्वें हिंदी व फारशी शब्दांशीं फक्त समासांत प्रयोग उदा० बेले वरदार, शिके वरदार, निशाण वरदार ( निशाण नेणारा ) [ फा ]

**वरदास्त-र्दास्त**—स्त्री १ आदरसत्कार, पाहुणचार, सत्कार (पाहुण्याचा इ०) (क्रि० करणें, राखणें) २ निगा, देखरेख करणें, जोपासना, व्यवस्था ठेवणें, शुश्रूषा करणें (मुलें, गुरें, जिन्नस यांची) 'तुर्त जखमाची वगैरे वर्दास्त होत आहे'–ख ११ ६०१२ –वि ( व ) सह्य, खपण्याजोगें 'वरदास्त होणार नाहीं' =सहन होणार नाहीं 'भाऊसाहेबास हें वर्दास्त न होता.'–होकै [ फा बर्दाश्त ]

**वरप**—क्रि ( गो ) लिहिणें [ का बरिदु ] **वरपी**–पु लेखक, लिहिणारा

**वरफ वर्फ**—न १ थिजलेलें पाणी हें दोन प्रकारचें असतें, निसर्गजन्य व कृत्रिम २ हिम, भीहार ३ ( ल ) त्वचेवर बारीक पुटकुळया, मसुऱ्या, पुरळ येणें उदा० देवीचें-मसुऱ्याचें-गोंडाचें-वरफ बाहेर पडलें ४ दाट उगवणारें गवत, झाडपाला, केस इ० 'शेतामध्यें गवताचें बरफ झालें' [ फा बर्फ ] ०**दाणी**–स्त्री वर्फ ठेवण्याची पेटी

**वरफी वर्फी**—स्त्री १ निसर्गजन्य बर्फाची वडी २ नारळाचा चव, खवा, साखर यांची केलेली एक प्रकारची खाण्याची मिठाई [ फा बर्फी ] **नारळाची वरफी** स्त्री नारळ घालून केलेली वर्फी **वर्फीचुरमा**-पु तळलेल्या रव्याचे मुठे पाटयावर वाटून भुगा करून त्यांत तूप साखर खवा व बदाम, पिस्ते इ० घालून त्याचे कापून वर्फीप्रमाणें केलेले तुकडे –गृशि १ ४४३

**वरवट**—पुन १ (व) आवे, चिंचा इ० कोळून दाट केलेलें पाणी, ताक इ० आंबट पाणी, पन्हें, रायतें 'चिंचेचें वरवट पितो' २ बकऱ्याच्या मांसाचा रस्सा, सांबारें ३ चिखल 'मग दु खाचेनि बरवटें धोंवले।'–ज्ञा ७ ८८

**वरवटणें**—अक्रि १ वरवट, चिखल इ० कानीं लिप्त होणें २ –सक्रि ( ना ) शेणानें किंवा मातीनें सारविणें [ बरवट ]

**वरवटी**—स्त्री (व) चवळीच्या शेंगेसारखी एक शेंगाची जात [वरवट]

**वरवडा-डी-डें**—पुस्त्रीन एक जंगली झाड व त्याचें वीं, एक तृणधान्य व त्याचें गवत याच्या बियाची भाकरी होते

**वरवरणें**—अक्रि १ पूयमय होणें, पूयरक्तवत् द्रव्य गळत असणें (क्षतें, फोड इ० वानून), शेंबूड गळणें (नाक इ०तून) २ पिकल्यानें किंवा कुजण्यानें मृदु, स्रवणारें, पचपचीत होणें (लिंबू फणस इ०) [ध्व] **वरवर-वरा**-क्रिवि निचरे, वाहे, गळे, स्रव अशा रीतीनें (क्रि० वाहणें, चालणें, शिकरणें, हगणें) **वरवरीत**-वि १ गळगळीत, विलविलीत, स्रवणारें, मऊ (पातळ शेण, चिखल, नासकें फळ) २ वरवरलेलें, शेंबूड गळणारें (नाक) ३ लाळ गळणारें (तोंड, क्षत)

**वरवाद, वर्वाद**—वि १ विघडलेलें, नाश झालेलें, नष्ट, ओसाड, वाताहत झालेलें 'गढी खोदून वर्वाद केली'—होकै १४ (सामा) नासलेलें २ रद्द, वद केलेला 'पुढील तहनामा झाल्यानंतर मागील तहनामा वर्वाद होतो'—रा ७ ३ ३ओसाड [फा वर्वाद] ०करणें—सक्रि धूळधाण, नासाडी करणें **वरवादी**—स्त्री नासाडी

**वरमदंडा**—पु कांटेचुवक, एक काटेरी क्षुद्रुप [स भ्रमदंड]

**वरमा-म्हा, वर्मा**—पु १ दोरीनें ओढून फिरवून भोंक पाडण्याचें यंत्र, सामता; वेधन, गिरमिट २ दारूच्या बाणाचें तोंडा कडील भोंक [फा वर्मा] **वर्मेदान**-वि भोंक पाडण्यात कुशल 'भण्डारी चागले वर्मेदान'—वाइसमा २ ९

**वरलीमाह**—पु सुरमाह —वागेची माहिती पृ ४

**वरलेख**—क्रिवि लेखाप्रमाणें, लिहिल्याप्रमाणें [फा बर्+स लेख]

**वरव**—स्त्री वरवेपणा, शोभा 'जैसी नाकेंवीण वरव। का शिरेंवीण अवयव।'—एभा १४ २५७ [स वरम, म बरवा]

**वरव(वो)ट-टा, वरवटा**—वि गोजिरवाणें, सुदर, चागलें, देखणें, छान, सुरेख, उत्कृष्ट उत्तम 'ठाइ ठाइ वरवट। निवृत मडीत घाट।'—ऋ १८ **वरवणें**-अक्रि शोभणें प्रतिविंव किंवा अनु मापक। तैसें द्वैतमिसें येक। वरवतसे।'—अमृ १ २६ **वरवंटा**-वि (ल) पतिव्रता, शुद्धाचारी 'आम्ही गौळणी वरवटा। जातों मथुरेच्या हाटा।'—होला ९ **वरवा-वी-वें**-वि १ (काव्य) चागला, छानदार 'वरविया वरवग घनमेघसावळा। वैजयती माळा गळा शोभे।'—तुगा ३ २ सुदर, नामी निवडक इ० [वरा] म्ह० वाहेर वरवा आत हिरवा ०काळ होणें-(व) काळ अनुकूल होणें, आर्थिक परिस्थिति अनुकूल येणें, भरभराट होणें **वरवेपण**-न सौंदर्य 'मग अलवारीं वरवेपण। निवाडु दावी।'—ज्ञा १ ४४

**वरवा**—पुस्त्री (राग) या रागात षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल गाधार, कोमल मध्यम, पचम, तीव्रधैवत कोमल व तीव्र निषाद हे स्वर असतात जाती औडव-सपूर्ण वादी ऋषभ, सवादी पचम गानसमय सर्वकाळ [स वरम्?]

**वरवाळणें**—अक्रि फिरणें 'सज्जूनि आपुलाले भार। वर वाळले सग्रामा।'—मुआदि २३,११७

**वरसकाळा**—पु (ना) पावसाळा [स वर्षाकाल]

**वरस(सा)न**—न १ मस्तकातील थंडी, शैत्य, पडसें २ पडश्यामुळें नाक इ० गळणें (क्रि० येणें, वाहणें) [सं वर्षण]

**वरसात, वर्सात**—स्त्री १ पावसाळा, पाऊसकाळ २ वर्षाव, वृष्टि ३ घोड्यास होणारा शैत्य रोग, घोड्याच्या चार खवाट्यावर होणारें दर्द —अश्वप २ ९४० ४ (पावसाळ्यात) घोड्याच्या डोळ्याच्या रक्षणासाठीं केलेली कातडी झापड, पडदा [सं वर्षर्तु कृ=पाऊस पडणें] **वरसाती डगला**-पु (वडोदें) पावसाळ्यात पोषाखावर वापरण्याचा डगला, (इ) रेनकोट

**वरह(र्ह)क-क्क**—वि बरोबर, युक्त, न्याय्य, योग्य —क्रिवि बरोबर रीतीनें, न्यायानें, हक्काप्रमाणें 'मनसुबी मनास आणून वरहकइनसाफ करून उत्पन्न होईल'—वाडवावा २ २ [फा वर्हक]

**वरहु(हुं)कूम**—क्रिवि आज्ञेप्रमाणें, बेतानें, सारखें 'बर्हुकूम याद'—वाडवावा २ ६६ 'धनी हुकूम करील त्या वरहुकूम चालवें'[फा बरहुक्म]

**वरळ**—न. भरड दळलेलें पीठ —वि १ विरळ विणीचा, अतिशय जाडाभरडा (कपडा) २ भरड दळलेलें (धान्याचें पीठ) [वरड]

**वरळ**—स्त्री १ विसगत भाषण (झोंप, ताप, दारूची निशा यातील) २ निरर्थक वडबड, वटवट, जल्पना —वि १ असंबद्ध (भाषण), मूर्खपणाचें भाषण करणारा, भ्रमिष्ट मूर्खपणाचें (भाषण) 'ऐसें वोलती ते वरळ ज्ञानहीन।' २ भटकणारा, आड मार्गाला जाणारा; छाविष्ट 'सुरतें याचा वरळ। विनवीत असे।'—विपु २ ६ ३ भ्रांत 'जीव आर्धीचि समळ। वरि विषयेसगें होति वरळ।'—भाए ६२१ [ध्व] ०जाणें-अक्रि चाचरणें, मत्र म्हणताना चुकणें 'देखा मन्त्रु वरळु जाय।'—ज्ञा १ १९० **वरळणें**-अक्रि १ असबद्ध भाषण करणें, भलतें भलतें वोलणें (झोंपेंत, तापात निशेंत) २ वडवडणें, चावळणें, ३ स्वच्छंद फिरणें भटकणें, भलत्या मार्गाला जाणें 'इद्रियें वरळों नेदावीं।'—ज्ञा ३ ११६ **वरळणी**—स्त्री वडवड (झोंपेंतील)

**वरा**—पु कोवळा दुवा, लहान शेंपटीचा मेंढा

**वरा**—वि १ चागला गुणाचा मध्यम वर्गाचा, चालण्या जोगा, योग्य २ ठीक प्रकृतीचा, आरोग्य असणारा, रोगनिर्मुक्त ३ सुमाराचा, बराच, पुष्कळ नसला तरी पुरेपूर ४ (ल) शहाणा 'केवळ बाळचि इच्छी विधुसि धरायासि का वरा इच्छी।'—मो उद्योग १० ३ —क्रिवि १ वळेवर यक्तशीर 'तु वरा आलास'

२ चागल्या, नीट रीतीनें 'देव म्हणे बैस बरा।'–मोभीष्म ४ १९ [स वरम्] **बरा घेणें**–चागल्या तऱ्हेनें, खूप वर्णे (मार, ठपका इ०) खरडपट्टी काढणें **बऱ्यावर असणें**–एखाद्याचें चांगलें इच्छिणें **बऱ्या बोलानें–घार्जानें**–क्रिवि गोडीगुलाबीनें राजीखुषीनें, स्वतःची चूक कबूल करून 'या चळवळीवरील अत्या चाराचे आरोप बऱ्याबालानें परत घ्यावेत'–के २७५३० **बऱ्याशा झाडाची साल काढून न्हावप**–(गो) चागल्या माणसाच्या आधारानें राहणें **बरावाईट**–वि १ साधारण चागला, मध्यम, बरासा, चालचलाऊ २ (कु ल) आत्महत्या, मरण 'जिवाचा बरावायट करूक वगता' **बरीगत-गती**–स्त्री धडगत आशाजनक स्थिति (बहुधा नकारार्थी प्रयोग) 'त्या रोग्याची बरी गत दिसत नाहीं' **बरें**–न १ कल्याण, क्षेम, भरभराट २ हित, नफा, फायदा, चागलें –क्रिवि १ ठीक, चागलें, योग्य मान्य २ पाद-पूरणार्थक शब्द 'काय बरें यास उदाहरण?' ३ ठीक फार चांगलें, होय (रुकार, कबुली, मान्यता इ० विवक्षित असता) [बरा] म्ह० ज्याचें करावें बरें तो म्हणतो वर माझें खरें (परशाधास-ला) **बरें मागणें**–चागलें व्हावें अशी इच्छा, प्रार्थना करणें ०**पाहणें**–क्रि चागलें म्हणून समजणें, कल्याण चिंतणें 'पढरीचे ब्राह्मण देखतील कोणी। बरें मजलागोनी न पाहती।'–तुगा **बरेंपण जावप**–क्रि (गो) मैत्री जमणें **बरेंवाईट**–न दैवानें येणारें दुखणें, मरण, नाश इ०, आरोग्यादिक बरें व रोगादि वाईट

**बराप**—क्रिवि विषयीं –आदिलशाही फर्मानें [फा]

**बराक**—स्त्री चाल, खोल्याची रांग, छावणी [इ बरॅक्]

**बराडी**—वि १ पराकाष्ठेचा खादाड, आधाशी 'हे तो विख्यात खोडी खरवि न कवडी काय देतो बराडी।'–किंसुदाम ७४ २ हावरा, आशाळभूत 'कृपा कराल ते थोडी। पाया पडिलें बराडी।'–तुगा ५५१ [वऱ्हाड, विरड]

**बराडी**—स्त्री (व) ताग काढून घेतलेली काडी, सणकाडी

**बराडोल**—पु भोंक पाडण्याचें हत्यार –राको

**बरात**—पु १ चगकाचनी नामक गजिफाच्या खेळांतील तिसरा रग २ –स्त्री खजिन्यातील पैशाची मागणी, हुडी ३ (मुसलमानी) लग्नाची वरात [फा बरात]

**बराद**—स्त्री (गो) परयाचा सच [पोर्तु बरायो]

**बरा(रो)बर**—वि १ सम, तुल्य, सारखा, समान २ ततो तत अचूक, मिळणारा न्यूनाधिक नसलेला (हिशेब इरीकत) ३ युक्त योग्य, न्याय्य रास्त चागला ४ सपाट, सारखा, सम, सरळ नियमित व्यवस्थित यथायोग्य सारखा, अनुगुण –क्रिवि १ समवेत, समागमें मिळून एकाच वेळीं २ समपातळींत ततोतत रीतीनें सुरेख रीतीनें न्यायानें ठाकठीकपणें नीटपणें, खरेपणानें नेमका इ० [फा बराबर्] **बरोबरचा-रीचा**–वि १ सारखा, सम, तोलाचा २ एकाच वेळेचा, पदवीचा ३ सोब तीचा, सगतीचा, सगती ०**होणें**–अक्रि १ साफ जाणें, पूर्णपणें सपणें, व्यय होणें २ चिरडलें जाणें, चुराडा होणें, तुकडे तुकडे होणें, उध्वस्त होणें, पूर्ण नाश केला जाणें (शब्दश व ल)

**बरा(रो)बरी**—स्त्री १ समता, सारखेपणा, (बुद्धिबळ क्रीडा) एका बाजूची दुसऱ्या बाजूवर मात होणें, अशक्य नाहीं अशी स्थिति होणें, (कोणत्याही खेळात) एका बाजूसारखा दुसऱ्या बाजूचा डाव होणें, २ समानता, नियमितपणा, एकरूपता ३ समसमान पणा (व्यापारात-नफातोटयाचा इ०) ४ तुलना, स्पर्धा, 'हीन अनाती बराबरी। बोल बोले सरोत्तरीं।'–दा २१५२ [फा बराबरी] (ग्राम्य) ०**करणें**–स्पर्धा करणें, तोलास तोल देणें टक्कर मारणें ०**पाहणें–करून पाहणें**–तोलून पाहणें, तुलना करणें **बराबरीचा, बरोबरीचा**–वि सारख्या गुणाचा, धर्माचा, वीर्याचा, कौशल्याचा, जोड, तोल

**बरामत**—स्त्री बलामत, खोटा आरोप (क्रि० येणें, आणणें, घालणें) [फा]

**बरामद**—स्त्री १ व्यवस्था, निकाल 'कामाची बरामद होईल'–रा १०१८३ २ निर्गत मालावरील जकात –वि १ आगत, आलेला 'मागती नवाब बरामद होऊन इग्रजी सह्रा सर्दार यांची मुलाजमत झाली'–रा ५१४१ २ अधिष्ठित 'कुर्सीवर नवाब बरामद जाले'–रा ७८४ [फा बरामद्]

**बराय, बराई-ये**—क्रिवि १ साठीं, करिता 'बराय तिजा-रत'–पदमव ११३ २ स्वत; जातीनें खुद, प्रत्यक्ष 'तो बराय अर्ज खातरेस आणून'–योमारो १३३७ [फा बराइ]

**बराय(ई)खुद**–क्रिवि स्वत च्या विचारानें, स्वत, जातीनें 'इन्साफ बराई खुद (शब्दश स्वत च्या विचारानें) जातीनें पहावी'–रा १५२९८ [फा बराय+खुद]

**बरावर्द-वर्दी**—स्त्री बरावर्द पहा

**बरास**—न १ (व) शभर चौरस फूट अथवा दहा फूट लाव, दहा फूट रुद जागा २ शभर घनफूट ३ (गो) २५ घनहात [पोर्तु]

**बरासकापूर**—पु कापराची एक जात –मुव्या १५५

**बरी**—स्त्री आगरख्याच्या चोळाची एक बाजू होणाऱ्या दोन तिकोनी तुकडयापैकीं पुढचा तुकडा मेषकळी 'भवताले घोंस जरीचे। सारे पडदे एक बरीचे। तुम्ही केवळ लाल हरीचे।'–प्रला १६६

**बरी**—पु (माळवी) उडदाचा वडा वगैरे

**बरीक**—क्रिवि वाक्यालंकारार्थी प्रयोग जेव्हां सजातीय पदार्थसमुदायातून विवक्षित गुणाचा एकच पदार्थ अपेक्षित असतो तेव्हा उपयोगात आणतात मात्र, तेवढा, सत्यत खातरीनं

वास्तविक, तत्वत, गृहीत धरून, अंगीकार करून 'हे सगळे दागिन वाईट आहेत हा वरीक चांगला' 'तद्वीति राम कवि म्हणो मामहरीच्या वरीक रीतीतें।' -मोसमा ५ ३१ [ वरा ]

वरू—पु वोरू, तृणविशेष, ज्याची लेखणी करतात असें ताट 'नाना देशींचे वरू आणावे।' -दा १९ १ १६ [ प्रा वरुअ ]

वरोद—पु तुळईवर ठेवावयाची लांकडी कडी 'यांत परशा वरोदावर ठेवतात' -मॅरट ५६

वर्गोचें—क्रि (गो.) रिद्गिणें वरप पहा

वर्करार, वर्करारी—पुस्त्री निश्चितपणा, कायमपणा 'वर्करारीची वचनें शिवाजीमहाराजास सांगावीं' -चित्रगुप्त ९ [ फा वर्करार् ]

वर्का—पु (वाई) हरळीसारखें गवत -मसाप ३ ३ -वि रसाळ

वर्खास—क्रिवि १ खास, स्वत ची २ मुद्दाम 'वर्खास चिठी घउन पाठविली पाहिजे' -रा १० ४२२ [ फा ]

वर्खुर्दार—वि १ फळ खाणारा, उपभोक्ता २ चिरंजीवी -राव्यको ८ ४५ [ फा वर्खुर्दार् ] वर्खुर्दारी—स्त्री उपभोग [ फा ]

वर्गा—पु लुटारू, गनीम 'वर्गे लोकाची चाल रहण्यास तोंड द्यावें आणि कमजोर जाला म्हणजे पळून जावें -भाव १०९

वर्गुजर—स्त्री दिरंग, निष्काळजीपणा 'वर्गुजर न करणें' -रा १० ३६३ [ फा ]

वर्गोवर्चे—अक्रि (गो ) लाकडाचा भुगा होणें वरग पहा

वर्जा—वि मान्य, योग्य 'दुतर्फा दोस्ती चालावी हें वर्जा' -रा १० १२८ [ फा वर्जा ]

वर्जेस—पु ( छापखाना ) वारीक टाईप हा टीपाच्या उपयोगी असतो [ इं ]

वर्तख्त—क्रिवि तख्तावर 'दिल्लींत पातशाहा वर्तख्त वसवावा' -दिमरा १ २६९ [ फा ]

वर्तर—वि श्रेष्ठ, उच्चतर 'पादशाही हुकूम वर्तर म्हणोन' -चित्रगुप्त ७० [ फा ]

वर्ताव-वा—पु ( व ) चाल, रीत, पद्धत [ हिं ]

वर्दार—वरदार पहा

वर्निश—पु (सोनारी) भाडयावर पॉलिश करण्याचा गोल रधा [ इं ]

वर्निस्वती—क्रिवि प्रमाणें 'तें वर्निस्वती साल मजकूर दुमाला कीजे' -रा १५ १३८ [ अर निस्वत्=संबध ]

वर्पा—क्रिवि उभा सुरू असलेला 'हंगामा वर्पा केला' -ख ७ ३५६७

वर्फ वर्फी—वरफ बरफी पहा

वर्वटाण—स्त्री (गो ) उग्र वास

वर्बर—पु म्लेंछडातील एक जात व तींतील व्यक्ति [ स ]

वर्बरदेश—पु आफ्रिकेंतील वार्बरी संस्थान -अश्वप १ ३४

वर्न्या—क्रिवि (नामपुरी) वर

वर्ले, वल्लु—न १ ( गो ) भुईनळा २ पीप ३ (वे) शिरी -वि ( निंदार्थी ) अतिशय दारू पिणारा [ पोर्तु वॅरील ]

वर्वक्त-ख्त—क्रिवि वक्तशीर, वेळेवर 'मरल्हत उम्दी वर्वक्त तस्वीर् होउन' -पया ४६९ [ फा ]

वर्सात-ती—वरसात-ती पहा

वर्हम—वि दिक्‌, मम 'मर्जी वर्हम होत' -रा ५ ८. [ फा वर्हम् ]

वर्हाणपुरी—वि बऱ्हाणपूर शहरचें (कापड, जरतार इ०)

वर्हि—न दर्भ, दर्भमुष्टि श्रौत व स्मार्त यागात दर्भमुष्टि पसरून त्यावर हवनीय द्रव्य ठेवतात 'कुडमंडप वेदिका सुलक्षण। इध्मा वर्हि निसंधान।' -भारावाल २ ६९ [ स ]

वर्हि—पु मोर, मयूर [ स ]

वल-ळ—न १ सामर्थ्य, जोर, शक्ति, कुवत, क्षमता (इ०देश वल ) (समासांत) तारा-ग्रह-रवि-गुरु-वल ( चद्र, तारा इ०ची अनुकूलता) तसेंच द्रव्य-विद्या-बुद्धि-बाहु-मनुष्य-पुण्य-वल इ० २ सैन्य, फौज, दळ 'त्यावरि दुर्योधन वल पचविससहस्र पाठवी राजा।' -मोभीष्म ५ ११ [ स ] ०कुवल-ळ-स्त्री धोक्याचा व अडचणीचा काळ, संकटसमय; परीक्षेची वेळ कालकक्षा, वेळ अवेळ पहा -क्रिवि धोक्याच्या अडचणीच्या वेळीं 'आम्हास वल्कुवल पडल्यास कुमक करावी' -माराचियोरा ६३ [ वल=शक्ति+कुवल=अशक्तता ] ०ठा-पु बळ, शक्ति -वि बळकट, सशक्त, वलाढ्य ०दर्प-पु शक्तीचा गर्व [ स ] ०वत्तर, वलोत्तर-वि अतिशय बळकट, मजबूत समर्थ, शक्त, बलाढ्य (मनुष्य विशेषत देव, वळ, परिस्थिति, घडलेली गोष्ट) [ स वलवत्+तर] ०वान्-वन्त-वि बळकट, सशक्त [ स ] ०हा-पु इंद्र, वल दैत्याचा हननकर्ता 'वलहाकरिता मनसी भगचि पावेल सामरहि वल्हा।' -मोद्रोण १२ ८९ [स] ०क्षय-क्षयवात-पु शक्तिपात करणाऱ्या वातविकाराचा क्षोभ [स] वला(ळा)ढ्य-वि वलवान्, सशक्त [स] वला(ळा)त्कार-पु जुलूम, जबरी, जबरदस्ती [स] वलावल-न १ अन्योन्य शक्तता व अशक्तता, वळाची तुलना ( वादी पक्षाची, विधिनिषेध पक्षाची, वादग्रस्त गोष्टींच्या अनुकूल-प्रतिकूल कारणाची ) 'हे दोन पक्ष आहेत त्यात वलावल पाहून सवल पक्ष असेल तो घ्या' २ शक्ति उपाय, साधन 'जं कांहीं करणें तें वलावल पाहून करावें' ३ सामर्थ्य आगची शक्ति उत्कृष्टता (वस्तुतील, मनुष्यातील) [ स वल+अवल ] वलाय, वलायकी—स्त्री (गो ) व?, आरोग्य वलियाड-वि वलिष्ठ 'जे कीं वलियाद सुभट।' -गीता १ ४९८

वलिष्ठ-वि ०वल अतिशय बळकट [ स ] वली ळी-वि

सशक्त बलवान् पराक्रमी [ सं ] बलीकटु-वि बळकट 'आमचा वैरी बलीकटु' -पंच ३ १

बलँ—न (गो) गूळ [ भली ? ]

बलक बलख—पु १ चीक चिवट पदार्थ ( अंडें इ० कातील) २ गूळ इ० चा रस ३ मगज गीर [ हिं ]

बलख—क्रिवि (ग्राम्य) थोर मोठा, पूर्ण, बरचरीत, सम्बल, जबर मळकट परव, वद (थोर मजल, ओसें, माप होर इ०)

बलकाव—न १ (गो) सोपा २ घरापुढील दारासमोर दोन्ही बाजूंस बसण्यासाठीं केलेली उंच जागा कट्टा [ पोर्तु ]

बलकी—स्त्री साव इ०च्या बोपन्यावरची खोवण

बलकी-किं ल्की बलक बलकें-कैं—क्रिवि निदानीं इतकाच नव्ह तर आणखी, वकील विंबहुना '१०० पडोत बल्की ३५० पडोत पण घाडा घ्यावयाचा' [ फा बल्कि ]

बलग(गा)ट—न (चि) आरोप बाळट विटाळ संकट

बलगी—स्त्री बाजरीच्या निबुराचे वरपट गोंड तें दातांत अडकल्यानें होणारें दुःख 'दिरडी बुजे भरे बलगी।' -दा ३ ६ १८

बलंगी—स्त्री कुस्तीचा एक पेंच (क्रि० भरणें)

बलछडा—पु १ लाकडाचा जाड व लांब वासा (शिडी इ० साठीं) २ भाल्याचा दांडा ३ (ल) भाला

बलबल बलबलपुरी—स्त्री १ दगलीचें धुमाकुळीचें ठिकाण बाजार २ अव्यवस्था अंधेरनगरी गोंधळ, अदाधुंदी नियम इ०कडे दुर्लक्ष बेशिस्ती (क्रि० माडणें होणें करणें) 'राजेलोक एषआरामी झाले म्हणज सगळी,बलबलपुरी होऊन जात' -बाजी [ बलबल+पुरी=शहर ] म्ह० बलबलपुरी आणि टमटम राज्य

बलबलीत—वि मऊ दबणारें विलविलीत, गिजगिजीत व चिघळणारें (फळ इ०) [ ध्व ]

बल(ल)म—पु आखूड भाला खासें याच्याकरिता बल्लम स्वारींत पाठविणें -(बडोदें) हुजराची शिकार १४

बलवणें—अक्रि बोलवणें वाचे नो बलवे मुहुद्रणमुखें या उत्तरा द बदे। -विठ्ठल रसमजरी ४२ [ बोलवणें ]

बलवा—पु १ गलबला दंगल कोलाहल तटा तकार बड २ (ल) सुप्रसिद्धि ३ अव्यवस्था (काम हिशेब व्यवहार यांची) ४ उपद्रव [ हिं ]

बलवार—पु छप्परबंदाची जात व तींतील व्यक्ति

बला—स्त्री भिस्त आधार पक्षकाराची बला वकिलावर -गौज अ ३ (१९३५) [ स बल ]

बला बलाय-ई—स्त्री १ संकट इडापिडा 'कोणीकांहीं समजावी' आणि आपल्यावर देहाटी घराई येईल' -मदर १ १२१ त्रास दुःख पीडा (माणूस, प्रसंग,शापापासून) २ आळ बालट आरोप (क्रि० घालणें आणणें) [अर बला] म्ह० शाह ण्याची बलायदूर बला-या घेणें—क्रि इडापिडा घालविण्यासाठीं बोटें मोडून दृष्ट काढणें 'उभारूनि बाह्या बला घेत बसुनिया। -सप्त ३७ विर्ताक रूपवत्या मुख पाहुनी बलाया घेती। -सप्त ५२ बलागत-स्त्री आकस्मिक बलानें सकट त्याद, पीडादायक मनुष्य, पदार्थ इ० (क्रि० येणें घालणें, आणणें) बलादुरी-स्त्री सकट दूर होण्यासाठीं ओंवाळून टाकलेला पदार्थ बायकांनीं बला-दुरी व शतगें करून ओवाळिलें' -चित्रगुप्त ११४

बला(ला)ट-ड—न वृथारोप आळ बालट तुफान (क्रि० पण घालणें) [ दे ] बलाटी टवा बलाट-लाट-लाड-खोर, बलाढा-ढी-ढ्या-वि तूफान घेणारा आळ घणारा

बलाढ्य—वि (वों) बलवान विद्यादि गुणांनीं मोठा [ स बलाढ्य ]

बला(ल्हा)णी बलावणी बल्हाणी—स्त्री १ (राजा) देवळाच्या गाभाऱ्याच्या सभामडपाच्या भिंतीला लागून असलेला ओटा 'दरी बलाणी इंद्रनीळाची। -कथा ४ १८ २१६ २ (कों) रहाटगाड्यांत फिरविणाराची बसण्याची जागा [ द ]

बलामत—स्त्री १ मिथ्या आरोप २ बलागत या अर्थी योजतात बला शब्दांत बलागत पहा [फा बलामत अर बगामत]

बलाय(ई)नस्तर—न १ सटरफटर वस्तु २ त्याडीनें मिळविलेली मिळकत (जमाखर्चांतील)

बलाव—न (हेट) कोडवीपक्षां मोठी होडी [ पोर्तु ? ]

बलाविणें बलावणेंकरी—बोलाविणें बोलावणेकरी पहा

बला(ळा)हक—पु मेघ [ स ]

बलि-ळी—पु १ देव पिशाच यांना अर्पण करावयाचें अन्न पशु प क्षी इ० (क्रि० दणें) २ बलिदानाचे वेळचें देवपूजेचें साहित्य (पुष्पादिक) ३ बलि नामक राजा दैत्य; महाबलि पहा -वि बलवान सशक्त [ स ] ०दान-प्रदान-न १ बली अर्पण करणें दान शांति इ० कांत उडीद मिसळलेल्या भातावर किंवा कोहळ्यावर गुलाल टाकून त्यावर जळता काकडा लावून तो शिस र त ठेवून तो मनुष्यादिकावरून ओवाळून देवतास अर्पण करि तात तें भक्ष्य पीडा निवारू बलिदान दणें। -दावि १७२ २ नजराणा कांहीं बलिदान अंगीकारा माझें। -एभा ४ १०० [ स ] ०प्रतिपदा स्त्री कार्तिक शुद्ध प्रतिपदा [ स ] ०हरण-न भूतयज्ञ

बलिग—वि सक्त करडा -आदिलशाही फर्मानें [ फा ]

बलीवर्द—पु अडिल बैल न बडविलेला बैल [ स ]

**बलु(लो)तें**—न १ गांवांतील बारा वतनदारांना अथवा हक्कदार कारूंना शेतावर त्यांच्या हक्काबद्दल गावकऱ्यांनीं नेमून दिलेला धान्याचा, बागाइताच्या उत्पन्नाचा वाटा; गांवकऱ्यांच्या गरजा भागविण्यासाठीं कारूंना कुणब्याकडून मेहनताना म्हणून मिळणारा पिकाचा वंशपरंपरागत वाटा २ (कांहीं ठिकाणीं) पाटील कुळकर्णी इ० गावच्या पिढीजात कामगाराचा हक्काचा वाटा ३ वरील बारा वतनें –कांहीं महारबलुतीं (मुसलमानी व मराठी राज्यांत मिळणारीं ) –१ सितादेवी किंवा ढम्या उसाचा भाग २ वशी घरची देणगी ३ शिमगीपौर्णिमेस होळीचा नैवेद्य ४ वैदूर-आषाढी पौर्णिमेला धान्य ५ हातशकुणें=गुऱ्हाळावरील भट्टीचें बन्तें ६ मृत जनावराचें अवशेष ७ परटक्का ८ दफनाचे खड्डे खणण्याचे पैसे ९ खळ्यावरील दाणे १० पेवाच्या तळाचे दाणे इ० –भस्तृ ३७ 'येश जय प्रताप कीर्ति । हे अयोध्येचीं बलुतीं ।'–वेसीस्व ६ ६३ [का बल=उजवा+कुड=देणें, बलुता= उजव्या हाताचा हक्क म्हणून देणें ] **बलु(लो)तेदार, बलु(लो)त्या, बलु(लो)लीता**–पु. बलुत्यावर हक्क असणारा गावचा वतनदार सरकारी कामगार पाटील, कुळकर्णी इ० काहून ह भिन्न असून बारा आहेत–१ सुतार, २ लोहार, ३ महार, ४ माग (ही पहिली किंवा थोरली कास किंवा वळ यापैकीं तिघाचा धान्याच चार पाचुंदे किंवा कणसासह २० पेंढ्यावर हक्क आहे व महाराचा ८ पाचुंद्यावर हक्क आहे ), ५ कुंभार, ६ चांभार, ७ परीट, ८ न्हावी, (ही दुसरी किंवा मधली कास किंवा वळ या प्रत्येकाचा तीन पाचुंद्या वर हक्क आहे ), ९ भट, १० मुलाणा, ११ गुरव, १२ कोळी ( ही तिसरी किंवा धाकटी कास किंवा वळ या प्रत्येकास दोन पाचुंदे मिळतात ) याप्रमाणें पुढील बारा अलुते आहेत –तेली, तांबोळी, साळी, माळी, जंगम, कळावंत, डवऱ्या, ठाकर, घडशी, तराळ, सोनार, चौगुला हेहि हक्कदार आहेत ( मात्र यांचा हक्क टाविक नाहीं ) कांहीं ठिकाणीं पुढीलप्रमाणें बलुतेदार आढळतात–पाटील, कुळकर्णी, चौधरी, पोतदार, देशपांड्या, न्हावी, परीट, गुरव, सुतार, कुंभार, वेसकर, जोशी यांत सुतार, लोहार चांभार, कुंभार ही पहिली कास न्हावी, परीट, कोळी, गुरव ही मधली कास आणि भट, मुलाणा, सोनार, माग ही तिसरी कास होय कोंकणातील बलुतदार याहून थोडसे निराळे आहेत इंदापूर परगण्यातील बलुतेदार पुढीलप्रमाणें आढळतात –पहिली कास सुतार, लोहार चांभार महार दुसरी कास–परीट, कुंभार न्हावी माग तिसरी कास-सोनार, मुलाणा गुरव, जोशी, कोळी, रामोशी एकूण १४ पंढरपूर प्रांतातील बलुतेदार – थोरली वळ –महार, सुतार लोहार, चांभार मधली वळ–परीट कुंभार न्हावी माग धाकटी वळ–कुळकर्णी, जोशी, गुरव पोतदार ग्रँटडफ याच्या मतानें–सुतार, लोहार, चांभार, माग, कुंभार न्हावी, परीट, गुरव, जोशी, भाट, मुलाणा हे बलुतेदार व सोनार, जंगम, शिंपी, कोळी, तराळ, वेसकर, माळी, डवऱ्यागोसावी, घडशी, रामोशी, तेली, तांबोळी, गोंधळी हे अलुतेदार आहेत पुष्कळ जागीं महारास पहिल्या, दुसऱ्या किंवा तिसऱ्या वळींत धरतात इर्गी आढळणारे अलुतेदार किंवा नारू –सोनार, माग, शिंपी, भट, गोंधळी, कोरगु, कोतवाल, तराळ हे आहेत तथापि अलुतेदार व बलुतेदार हे निरनिराळ्या जिल्ह्यांत वेगवेगळे आहेत, त्यामुळें त्यांची एकवाक्यता होणें कठिण वरील कास म्हणजे, गाव ही गाय असून तिचें पीक ही कास होय, आणि बलुतेदार हीं या गाईच्या कासेला पिणारीं वासरें 'अहो जीवु एथ उखिता । वस्तीकरु वाटे जाता । आणि प्राणु हा बलौता । म्हणोनि जागे ।'–ज्ञा १३ ३४ [ स बली+अपत्य=बलुत्या ? ]

**बल्यामारी**—उद्गा ( व ) पर्वा, दिक्कत, फिकीर नाहीं या अर्थी 'या तेंग्यापायीं घरदार गल तरी बल्यामारी ' [ बला= पीडा ? ]

**बल्यांव**—न ( कों ) एक प्रकारची ल्हान होडी बलाव पहा.

**बल्ल**—न ( गो ) पीव

**बल्लम**—पु बल्म पहा 'बल्म बाण बोथाट्या ।'–ऐपो २०० [ हिं बल्म ]

**बल्लव**—पु १ गोपाळ, गवळी 'वनीं खेळती बाळ ते बल्लवांचे ।'–वामन, वनसुधा १ १६ २ आचारी, विराटाच्या घरीं भीमानें आचारीपणा करीत असतांना धारण केलेलें नाव [ स ]

**बल्ला**—पु १ ( व ) सापळा २ फासा [ का बळ्ळी ]

**बल्लाळताटी**—स्त्री ( महानु ) कनात 'गाडेयाचिया निहरी । घातली बल्लाळताटी ।'–शिशु ५६९

**बल्ली**—स्त्री १ उथळ पाण्यात होडी पुढें लोटण्यासाठीं उपयोगांत आणावयाची दांडी, वासा, ताज २ नावेची होल काठी ३ ( व ) लाकडी दांडी, वासा

**बल्ल्या**—पु १ ( कर ) बच्चा २ ( मुलांत रूढ ) दडादाखल खावयाची गोटी 'बल्ल्या दे '

**बल्वा-ल्वा**—पु दंगा बलवा पहा 'ज्यांणीं बल्वा केला, त्यांत शामील जाले असतील त्यांचेंहि पारिपत्य करणें '–रा ७ ४१ [ फा बल्वा ]

**बल्हारी**—स्त्री ( व ) सामर्थ्य, थोरपणा, मोटेपणा 'काय तुमची बल्हारी सांगावी ' [ हिं बलिहारी ]

**बव**—न ( ज्योतिष ) अकरा करणांपैकीं पहिलें [ स ]

**ब-वकूफ**—पु शहाणा [ फा बा-वकूफ ]

**ब-वक्त(खत)-नेक**—क्रिवि शुभ समयीं, प्रसंगीं, वेळेवर योग्यवेळीं 'खत मसरंत-नमत पाठविलें तें ब-वक्त्-नेक पोंहचलें '–पया ४८० [ फा ]

**व-वजूद**—क्रिवि असुनहि, शिवाय 'व-वजूद टॉमस मोधीन पुण्यात आला असता ' -ऐटि १५८ [फा बा-वुजूद्]

**व-वजे**—क्रिवि उत्कृष्ट रीतीनें, वहिवाटीप्रमाणें [फा]

**ववर्ता**—पु सफेत व काळया केसांत लाल केस असलेला घोड्याचा एक रंग -अश्वप १ ३२

**व-वाईक**—क्रिवि खरेपणानें -आदिलशाही फर्मानें [फा]

**व-वाजवी**—क्रिवि योग्यतेनुरूप 'व-वाजवी ताकीद होईल '-रा १५ १५६ [अर]

**व-वाशि(सी)र**—स्त्री मूळव्याध -अश्वप २ १९५ [हिं]

**व शर्त(र्थ)-र्ती**—स्त्री १ पराकाष्ठेचा यत्न, जबरदस्त आणि निश्चयाचा प्रयत्न 'त्यानें दास व-शर्तीनें वाचविलें ' २ अट 'व-शर्तीची याद '-पया २५१ -वि अगोवरील 'व-शर्ती हुण्डया ' -रा १९ ३२ -क्रिवि १ निश्चयाच्या प्रयत्नानें, आस्थेनें, आवेशानें 'त्या प्रांतात व-शर्ते अम्मल बसविला ' २ निःसंशय, खातरीनें विनचूक ३ (शर्तीनें, पैजेनें) निश्चितपणें, पूर्णपणें, अगदीं उदा० व-शर्ते ल्वाड-लुच्चा-सोदा इ० ४ अटी प्रमाणें 'तुमचें काम व-शर्थे झालें ' -हव ५६ ५ अटीवर 'परतु व-शर्थे मशारनिल्हेचीं कुटुंबें शहरांत दाखल व्हावीं ' -रा १० २६५ [फा ब-शर्त्]

**वशा-श्या**—पु १ माल्याच्या गैरहजिरीत घराच्या, शेताच्या राखणीस ठेवलेला महार २ बसून फुकट वेळ घालविणारा, आळशी [बसणें] ०**खाणें** अक्रि अडकून बसणें

**वशारत**—स्त्री शुभ वार्ता, खुशखबर 'अशी आम्हास वशारत जाली आहे '-रा १ ६३ [अर बशारत्]

**वशी-सी**—स्त्री लहान ताटलीसारखें पसरट भांडें (विशेषत पद्मापिण्याचें) 'कपवशी ' (गो) काचेचें तबक [पोर्तु बसिया हिं बासन]

**वॅष्टॉ**—वि (गो) निरर्थक

**वस-स्स**—क्रिवि पुरे; पुरेसा, ठीक 'ज्यासावर युरोपीय पंडितांनीं अलीकडे जो चोरीचा चार्ज आणला आहे तोच बस आहे ' -नि ५०० -स्त्री (अशिष्ट) वैपुल्य, रेलचेल, कमाल 'त्यानें गाण्याची बस करून दिली '[फा बस्] (वाप्र) ०**करणें**-अक्रि थांबवणें विरमणें, राहणें **वस माई**-उद्गा १ थांब! पुरे बाबा! २ तृप्ति कटाळा दाखविण्यासाठीं योजतात (क्रि० होणें कर्त्याची षष्ठी) [हिं बसमाई]

**वस**—पु १ दृढता, निश्चितपणा, कायमपणा २ स्थिरस्था वरसची स्थिति जम वजन छाप पगडा (व) वसोटी (क्रि० बसणें) 'ज्या व्यवहारात ज्याचा बस बसला तो त्यास सुकर ' [बसणें] **वसक**-स्त्री १ आसन; आस्तरण बैठक गिर्दाईत (जाजम, खुर्ची इ०) २ बैठक, खुर्ची, तळखडा; (सामा) आधार ३ वसवी, तळ, बुड, पाय, बुधा, अहणी 'या दऊ तीची बसक ल्हान म्हणून आपटते '४ वसवी, बाजारात घातलेल्या दुकानावरील कर, पट्टी ५ वसकीची जमीन, सपाट, सखल जमीन, दरी, वदखल ६ जमीनीचा खोलगट भाग स्थळ ७ जमीनीवर ठाम वसून राहणें (थकव्यामुळें, हट्टानें-मनुष्यानें, पशूनें) (क्रि० घेणें, मारणें) **वसक**-वि सखल, खोलगट (जमीन) **वसक्ट**-स्त्री दमल्यामुळें, हट्टानें, (तमाशेवाल्यानें ऋणकोला) रोखण्याकरिता जमीनीवर थवकल घालून बसणें, हातपाय मोकळे सोडून बसण्याची क्रिया, बैठक (क्रि० घेणें, मारणें) 'ही म्हैस उभी आहे तों दूध काढा एकदा वसकट मारली म्हणजे उठणार नाहीं ' -वि १ सखल, थपकट, चपटें, सपाटसर, याच्या उलट उभट उभार २ बपकें फेंदरें नकटें (नाक) **वसक्ट नाक्या**-वि फेंदरा, नकटा **वसकण**-न १ आस्तरण बैठक बसक (-स्त्री) पहा २ बसवट, थवकल (-स्त्री) पहा ०**कण-घेणें मारणें**-सिद्धीच्या निराशेनें हातीं घेतलेलें काम सोडून देणें ०**र(का)र-क्र्र**, **वस्क-(स्का)र**-स्त्रीन हातरी, चटई, जाजम, घडवंची, मुलांनीं शाळेत बसावयास आणलेलें गोणपाट इ० आसनाप्रमाणें पसरलेली ठेव लेली कोणतीहि वस्तु (हेट) वस्तुक [स विष्टर] ०**कल**-स्त्रीन बसण्यास फुरसत वेळ, सवड, सधि (बहुधा नकारार्थी प्रयोग) 'तो सारा दिवस फिरतो त्यास क्षणभर वसकल सापडत नाहीं ' -वि १ कमी उचीचें, आखूड व पसरट, नीच व सपाट २ बसकें, फेंदरें, नकटें (नाक) ३ खोलगट, खालपट (जमीन) ०**का**-स्त्री १ (राजा) बैठक, आसन, खुर्ची २ तळ पाया (वस्तूचा) -वि १ वेताच्या उताराचा, आडव्या घाटाचा, याच्या उलट पाणढाळ, खर २ सपाट, थबकट ०**की**-स्त्री १ विटीदाडूच्या खेळांतील एक शब्द २ बसका अर्थ १ व २ पहा ३ चुंवळ -वि चुंवळीसारखें वसकट (पागोटें) 'तिवट वस्की साथें ' -समारो १ २०१ ०**कीचा**-वि १ तळ, पाया, बैठक, असलेला २ बसण्यालायक (घोडा, बैल गाढव) ०**कूर**-स्त्रीन बसकर पहा **वसकेचा**-वि तळ, पाया, बैठक, आधार असलेला ०**कोळी**-स्त्री वसकट मातीची घागर 'ययाविधीनें त्या येरी। वसकोळ्या घागरी। '-तुगा २८० **वसण**-स्त्री (कर) बसण्यास घेतलेली लाकडी वस्तु **वसणी**-स्त्री १ बसणें, बैठक मांडी ठोकून बसणें 'एका वसणीत म्या शंभर पद लिहिले ' २ बुड, आसन ३ (को) ल्हान पाट ०**पुगडी**-स्त्री बसून घालाव याच्या फुगडीचा खेळ 'बस पुगडी वसुगा। चतुर भुगा लालुगा। एक पाय खोलीतो। सीताराम बोलीतो। ' -मसाप २ २३४

**वसक्ल**—स्त्री (को) माशाची एक जात हे ऑक्टोबर-नोव्हेंबरमध्यें पकडतात

**वसणें**—अक्रि १ बैठक मारणें २ ढुंगण, गुडघा, घोटा इ० च्यावर टेंकणें ३ खालीं बुड टेंकणें, उपविष्ट होणें, बसक घेणें, पाय आकुंचित करून राहणें, विश्रांतीसाठीं खालीं टेंकणें ( पशु, पक्षी यांनीं ) ४ उद्योगधंदा, काम वगैरेशिवाय असणें, रिकामटेकडा, निरुद्योगी असणें ५ फुकट वेळ घालविणें ६ खुर्ची इ० बैठकीवर अधिष्ठित होणें ७ (शब्दशः व ल०) वर पडणें, असणें 'अंगावर धूळ बसली ' ८ ( विशेषत ल० ) एखाद्यास भारभूत होणें, एखाद्यावर अवलंबून असणें ९ तळीं जाणें, स्थिरावणें १० खालावणें, कमी होणें (नदीचें, विहिरीचें पाणी) ११ बोथट होणें ( शस्त्राची धार) १२ स्थिरावणें (एखाद्या मार्गांत, स्थितींत), (ल०) रमणें 'तदुपरि मग तीचें चित्त कोठें बसेना ।'—सारुह ३ ५९ १३ स्थिरावणें ( पाऊस, उष्णता, ताप ) १४ ऱ्हास, अपकर्ष होणें, खालावणें, कादतें घेणें, श्रेष्ठता गमाविणें, वैभव कमी होणें १५ सवयीनें निष्णात किंवा तरबेज होणें, अंत प्रवेश होणें (हाताचा, दुसऱ्या अवयवाचा, बुद्धीचा, ज्ञानाचा), चांगलें समजणें 'हें गाणें माझें बसलें ' १६ ( ल ) अंगावर येणें, पडणें 'मार–खर्च–तोटा–चमला ' १७ योग्य होणें, विवक्षितपणें जुळणें, मिळणें, पक्कें जडणें, बरोबर होणें, लागू पडणें ( साधेजोड, युक्ति, हिकमत हिशेब ) १८ खचणें, बुडणें, विन किफायतीचा होणें, नासणें तोटा येणें (व्यापार, धंदा यांत) १९ घोगरा, बदसूर, खोल व अस्पष्ट होणें बिघडणें (कंठ, गळा, घसा, आवाज) २० स्थापित होणें ( अम्मल, सत्ता ) २१ जोम, जोर मिळविणें (पिकानें) २२ पार जाणें, समूळ नाहींसें होणें २३ दवणें, कमी होणें, चेपणें ( गळू ) २४ आरंभ करणें २५ प्रमाण ठरणें २६ प्रहार लागू पडणें, फटकारा लागणें ( चाबूक इ० चा ) [ स उपविष्ट, प्रा उवइस, वइस हिं जि वेश, आर्मेजि वेस ] म्ह० बसू जाणे त्याला ऊठ कोण म्हणे=ज्याला कोठें व कसें बसावें हें कळतें त्याला ' ऊठ ' म्हणून कोण म्हणेल **बसतां लाथ उठतां बुक्की, उठतां लाथ बसतां बुक्की**—सर्वदा मार **वसले(ल्या)घडीचा**—वि पुष्कळ दिवस एकसारखा घडी घालून ठेवलेला व त्यामुळें कोरेपणा व झकपकपणा गेलेला कोरा(कपडा) याच उलट ताण्याचा=कोराकरकरीत [ बसणें+घडी ] **वसले राहून**—क्रिवि बसून 'महाराज खिडकींत नहमीं बसले राहून दिवस मोजीत —विक्षिप्त १ १३१ **वसत्या महिना**—वि चाकरी न करिता दरमहाचा दर महा मिळणारा(पगार) **वसात आणणें**—सक्रि स्वत च्या ताब्यात आणणें 'दहाजणी मी वसात आणिल्या प्रमाणें पाजुन पाणी ।' —पला १४ **बसून आतील टांग ( मारणें )**—स्त्री (मल्लविद्या) जोडीदारानें आपल्यास खालीं धरल्यास आपल्या एका हातानें जोडीदाराच्या कोपरावरून हात घालून त्याचा हात घट्ट धरून ज्या हातानें आपण जोडीदाराचा हात धरला असेल त्याच बाजूच्या आपल्या पायानें जोडीदारास वर ढकलून व त्याच्या हातास आपल्याकडे ओढून झटका देऊन त्यास चीत करणें **बसून बाहेरील टांग( मारणें )**—स्त्री (मल्लविद्या) जोडीदारानें आपल्यास खालीं धरल्यास जोडीदाराच्या कोपरावरून आपला हात घालून त्या हातानें त्याचा हात घट्ट धरून त्याच बाजूच्या आपल्या पायानें जोडीदाराच्या पिंडरीस बाहेरून आपला पाय टाकून त्याच्या धरलेल्या हातास एकदम आंत झटका देऊन त्यास चीत करणें ( टांग=गुडघ्यापासून घोट्यापर्यंतचा पायाचा भाग ) **वसणें**—न बसण्यासाठीं पसरलेली, ठेवलेली कोणतीहि वस्तु, बैठक **वसता**—वि बसण्याच्या उपयोगी ( घोडा, बैल इ० )

**वसंत**—पु १ गाण्यातील एक राग २ वसंतऋतु [ हिं, स वसत ] **वसंत–ती**—वि केशरी, कुसुंबी, पिवळा (कपडा किंवा रंग) 'डोईस वसंती फेटा दुपेटा वसंत ग ।'—प्रला ९४

**वसन**—न (ढोर) जनावराच्या मागील फऱ्याची जागा, चौक

**व(बे)सनेकड**—न (कों ) मुळकुड्यामध्यें घातलेला दांडा रहाटास बैल लावावयाचा नसल्यास ह्या दांड्यानें रहाट फिरवितात मुळकुड्याजवळ बसनेकडाशीं काटकोनात जोखड बांधतात

**व-सरंजाम**—क्रिवि सरंजामासहित [ फा ]

**वसर**—वि (व ) हार गेलेला, पराजित 'कोणाला बसर जाणार नाहीं तो ' [ओसर] ०**येणें–जाणें**—अक्रि हरणें, पराभूत होणें [ ओसरणें–वसरणें–वसर ]

**वसराई**—वि १ वसरा शहरचीं (रेशमी वस्त्रें, मोत्यें, फळें) २ केळीची एक जात हीं केळें बारीक व लांब असतें यांचें बीं वसऱ्याहून आलेलें आहे —कृषि ४८८ ०**चोखे मोतीं**—न वसरा येथील सुकुमार, तेजस्वी व गोल मोतीं [ फा ]

**वसला वाटा–भाग**—पु (कर) फाळ्यासहित उत्पन्नातील मालकीचा विशिष्ट भाग ( खर्चवेंचाविरहित ) हा कडधान्यापुरताच असतो

**वसव**—पु लिंगायत धर्माचा मुख्य उत्पादक हा धर्म शिवोपासक आहे [ स वृषभ=बैल ] **वसव(ह्व)ण्णा, वस्वण्ण**—पु, **वसवा**—पु जंगमाच्या देवळातील पूजेचा नंदी, बैल 'वसावाचे खालीं मांडिलें प्रमाण। वस्वण्णाची आण तया काईं।'—तुगा ३०६८

**वसवंत**—न उपास्य दैवत 'सार्डी या विषयाची धाई र। यणेंचि खेळे बसवंत होसी। '—तुगा २४३ [ प्रा ]

**व-सवाव**—वि उचित त्याचा जबाव व-सवावच येईल ' —रा ५ ८५ [ फा ]

**वसविणें**—सक्रि १ बसायास लावणें 'भजावन करावया वसविलें नखाग्रीं धरा।'—केक ५ २ पक्कें करणें, बांधणें, स्थिर करणें ( कोणत्याहि स्थितींत ) ३ माथीं मारणें, सोंपणें, लादणें ४ यद करणें, शमविणें, स्थिर करणें, विश्रांति घेण्यास लावणें

५ भोगावयास लावणें, घर आणणें, गुरवविणें (कांहीं अनिष्ट) ६ योग्य करणें, जमविणें; लावणें, जुळविणें, मिळविणें ७ स्थापणें (राज्य, सत्ता यानृ विधि, वहिवाट) ८ (बायकी) न्हाणवलीस मखरात ठेवणें (गर्भधानाच्या पूर्वी) [बसणें] बसवी–स्त्री १ (बाजारात बसणारी) वेश्या, कसबीण निर्लज्जत्वादि गुणविशिष्ट गरती स्त्री २ जगम मताची कसबीण –शास्त्रीको ३ देवळी, मेंळी [बसणें]

**ब-साअत-नेक**—क्रिवि शुभ घटिकेला [फा]

**बसालत**—स्त्री सधि स्नेह [अर विसाऌ] ०ती–वि स्नेहाचा, मैत्रीचा 'खान कुम्पनीचे बसालती सिलसिल्यात दाखल जाला आहे' –रा १० २११

**ब-सिका-खास**– क्रिवि खास शिक्यानिशीं फर्मान ब-सिका-खास' –रा २० ३६५ [फा]

**बंसी**—स्त्री बासरी, पावा, वेणू मुरली. 'अधरीं धरिसी बसीला।' –मध्व १४६ –पु कृष्ण [हिं स वश]

**बसु(सो)ला-ले**—पुस्त्री सुताराची तासणी, वाकस [हिं बसुला].

**बसो**—पु उसाची एक जात –कृपि ४५०

**बसोल**—पु (व) मढविणारा

**बस्त**—पु बोकड 'कस दैत्य हे बस्त सकळ। बळी घेसी तयांसी।' –ह १४ ७ [स]

**बस्त व भाव**—पु वस्तभाव –आदिल्शाही फर्मानें [फा]

**बस्त(स्ता)न**—न १ रचना व्यवस्था बेत बस, जम (क्रि० बसणें) स्नानाचें–जेवण्याचें–निजण्याचें–बस्तान बसलें' २ बदोबस्त, स्थिरावलेपणा निश्चिति कायमची जागा घेणें धरणें (क्रि० बसणें) ३ टरणें पडणें (प्रमाण) यावरून सरा सरी, मध्यम प्रमाण, वाटणीचें प्रमाण दर (क्रि० बसणें) 'पधरा रुपयांचें पचवीस माणसात बस्तान चागलें बसलें' ४ जम ताळा (हिशेब हकीकत यांचा) खऱ्या गोष्टीशीं मिळणी, मेळ (वात म्याचा इतिहासाचा, वर्णनाचा) योग्य ठीक होणें (सामान्यत) (क्रि० बसणें, जमणें मिळणें) ५ सबध, प्रमाण 'आकाशां तील गोलाच्या गतीवर मनुष्यास होणाऱ्या इष्टानिष्ट गोष्टींचें बस्तान असण्याचा सभव किती' –नि २३१ [फा बस्तन=बाधणें, आवळणें] ०बिघडणें–अक्रि बिघाड होणें, घडी बिघडणें

**बस्तनी**—स्त्री वेष्टनी –राज्यको ८ ११० [हिं]

**बस्तरवार**—पु (ना खा) बृहस्पतवार, गुरुवार बिस्तरवार

**बस्ता**—पु गठ्ठा (कापसाचा कागदाचा इ०) त्याचा बस्ता भरून ठेवावा स्वामीसी।' –रामदासी २ ५७ थैली गाठोडें बदरा [फा बस्ता] बस्त(स्ता)न–पु ठाण दिंड

**बस्तानी**—स्त्री टोकास दोरी बांधलेली काठी, मुल ना शिक्षा करण्याचें गुरुजीचें साधन

**बस्ति-स्ती**—स्त्रीपु १ खालच्या पोटाचा भाग, खालचें पोट, ओटीपोट, मूत्राशय २ बस्तियत्र (कोठा साफ करण्याचें) –न बस्तिनलिका –स्त्री १ बस्तीची नळी २ पिचकारी ३ गुदद्वारात पिचकारीनें पाणी सोडून मलोत्सर्ग करविण्याची क्रिया [स]

**बस्ती**—स्त्री जैन लोकांचें देऊळ 'जरीं लागला पाठीं हस्ती। तरीं न रिघावें बस्तीं।' [बसणें ?]

**बहकणें**—अक्रि १ भकणें, रस्ता चुकणें, भरकणें, भलत्या वाटेस लागणें २ (ल) नीतिभ्रष्ट होणें, वाकडें पाऊल पडणें ३ चुकणें, घसरणें ४ बेसुमार चढणें, अमर्याद होणें, आटोक्याबाहेर जाणें (किंमत, करार) ५ (काव्य) सर्वत्र पसरणें, फाकणें दरवळणें (सुगध) 'अयोध्येमाजी सुवास बहकत।' –रावि १० २१ ६ वरळणें, बाहवणें, भ्रमात पडणें [हिं बहकना]

**बहकणी, बहक(का)वणी**–स्त्री चुकणें, भटकणें, भुलवणी

**बहक(का)विणें**–सक्रि १ भलत्या वाटेस लावणें, भटकावयास लावणें (शब्दश व ल०) २ गोंधळविणें, घाबरविणें बहका–पु (ना) घोटाळा, धादल

**बहंगी**—स्त्री १ खाद्यावरून वहावयाची ओझ्याची कावड, बगी; पेटारा २ (ल) कावडींतून नेण्याचें ओझें [हिं]

**बह(ह)गुण**—न (व.) रुद तोंडाचें पातेलें [बहुगुणी]

**बहडणें**—कि (वा) वाढणें, पुढें होणें [हिं बढना; स वर्धन]

**बहर**—पुस्त्री १ हगाम, वैपुल्याचा काळ, भर, सुगी, जोम, उत्कर्षाची पूर्णता तजेला (उत्पन्न, तारुण्य आरोग्य मान, सपत्ति खळ उद्योग यांचा) 'स्पन्द छातिवर छुन्द गेन्द जणु गुलाब बहरामधि फुलती।' –प्रला २ पराकाष्ठेचा रग मौज (नृत्यादिकांची) [फा बहार=वसत] ०मारणें–क्रि आनदात मौज मारणें पूर्ण सुखोपभोग घेणें बहरामन्द–वि सुखी, सपन्न [फा] बहरी–बहारी पहा

**बहरी, बहरीससाणा**—बहिरी, बहिरीससाणा पहा

**ब-हर्गीज-हरगीज**—क्रिवि कधींहि, बिल्कुल हा मज्मून ब-हर्गीज मौकूफ करूं नये' –रा ७ २३ [फा]

**बहव(व्ह)स**—वि १ बेकैद, ओढाळ, उच्छृखल, फटिंग २ निष्काळजी, बेकायदा, बेबद जुलमी, स्वैर, स्वच्छाचारी (सामान्यत मनुष्य काम राज्य) [बहु+वास वसणें]

**बहस**—स्त्री चर्चा –आदिल्शाही फर्मानें [फा]

**बहळ-ल**—वि १ प्रचुर विपुल पुष्कळ 'आनदामोद बहळ। सात्विकाचें मुकुळ।' –ज्ञा १५६ २ पुष्ट 'चिन्मात्र तेजें बहळ। नित्य निर्मळ सदरा।' –एभा ९ २०७ ३ विस्तृत प्रशस्त, विस्तीर्ण मोकळी (इमारत, मैदान प्रदेश) [स बहुल, का बाहळ]

वहा—स्त्री किंमत, दर्चे ' कागद-वहासर्ताल रुपये पचवीस देविले जातील ' –सासं२ जुलै ९१ [ फा वहा ]

**वहाईपंथ**—पु एक मुसल्मानी धर्मपंथ हा १८४४-४५ मध्यें इराणात उदय पावला याचा उत्पादक मिर्जाअली महमद होय हल्लीं हा पंथ अरबस्तानात प्रबळ झाला आहे –शाको (व) ६२

**वहाचर**—वि १ (व ) वाचट २ लावालावी करणारा

**वहाड**—न समुद्र, खाडी याच्या काठची भरतीची सारी जमीन

**वहाड**—न (प्र ) वाड, सारभूंय, कोडपर्ने इ०

**वहाण**—स्त्री (कों ) नावेचा काठ, कड, वाण, वाणी

**वहाणा-ना**—पु मिष, ढोंग, खोटी सबब, निमित्त 'राजश्री भाऊचे पत्राचा वहाना लावतील ' –ख ५ २४७६ [ फा. वहाना ] ०**करणें**-क्रि खोटें बोलून एखादी गोष्ट लपविणें

**वहा(हि)णा**—वि (व घाटी ) लाडक्या मुलीस म्हणतात

**वहाणें**—सक्रि (काव्य ) हाक मारणें, बोलावणें 'दुर्योधन ये स्वयें वहायाला ' –मोउद्योग ७ ८८ [ स आवाहन ]

**वहात्तर**—वि सत्तर आणि दोन [ हिं ] ०**खोडी**-स्त्री घोडयाचे वहात्तर दोष, वाईट लक्षणें अशुभ लक्षण पहा ०**जुलूम**-पु पराकाष्ठेचा जुलूम ०**भोवरे**-पुअव कसाची वहात्तर वलयें (घोड्याची) यापैकीं वासष्ठ अशुभ व दहा शुभ ०**रोग**-पुअव देशी वैद्यकातील रोगाचे वहात्तर प्रकार म्ह० वहात्तर रोगाचा खडोवा=अनेक रोग एकाच वेळीं असलेला रोगी

**वहाद(दु-द्द)र**—वि १ धीट, धाडशी छातीचा शूर २ प्रवीण, निष्णात, निपुण, हुशार, वस्ताद, पटाईत [ फा वहादुर् ]

**वहाद(दू-द्द)री**-स्त्री शौर्य, पराक्रम [ फा ] **वहादुराई** स्त्री शाबासकी, बक्षीस ' खंडेराव महाराजास मिळाली वहादुराई।' –गापो ५

**वहाद(दा)री**—स्त्री बाहीदारी, हमी, जिम्मा **वहादरी**—स्त्री गायकवाडींतील आरब सरदाराची जामीनकी

**वहादूरखानी कागद**—पु एक जातीचा दौलताबादी कागद

**वहादुरीतोडी**—पु (राग ) यात षड्ज कोमल ऋषभ, कोमल गाधार, तीव्र मध्यम पचम, कोमल धैवत तीव्र निषाद हे स्वर लागतात जाती संपूर्ण-संपूर्ण वादी मंद्रस्थानचा धैवत व सवादी मध्यस्थानचा गाधार गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर

**वहानक्त**—न तमर व फराक्त याच्या वजावाटीनंतर ऐन जिनसी धान्यरूपी साऱ्याची नक्त किंमत वसुली गल्ल्याची नाण्यात किंमत [ फा वहा+नक्त् ]

**वहानचोत-द**—वि एक शिवी [हिं बहेन=वहीण+चोदणें]

**वहार**—पु वहर पहा

**वहार**—स्त्री कमाल, उत्कृष्टता ०**दारी**-स्त्री सौंदर्य 'हिमालयादि स्थानाचे वर्णनात वहारदारी बरीच दिसून येते ' –विवि ८ ७ १२३ **वहा(ह)री**-वि १ मेजवान्या, खेळ, आनंद व सुख यात रमणारा. २ वासंतिक

**वहार**—पुस्त्री १ वहर पहा २ एक राग यात षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल गाधार, कोमल मध्यम, पचम, तीव्र धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात आरोहात ऋषभ व अवरोहात धैवत वर्ज्य जाति षाडव-षाडव वादी मध्यम, सवादी षड्ज गानसमय वसत ऋतूतील रात्रीचा तिसरा प्रहर [ फा बहार, स विहार ]

**वहारम**—क्रिवि रुष्ट, खप्पा, दिक्क वहेम पहा 'राजे मजकूर वाहेर जाऊन राहिल्यामुळें मर्जी वहारम ' –रा ५ १८० [ फा ]

**वहाल, भाल**—न १ मुळई, सरा २ अर्धेलापासून चूल निराळी करणारा चुलीचा अवयव

**व-हाल**—वि १ प्रसन्न, खूष २ पूर्ववत् कामावर नेमलेला ३ क्षमा केलेला ४ बक्षीस दिलेला 'कसबे मजकूरची माकदमी तुम्हास वहाल करून ' –रा १५ १७८ ५ पुन्हा स्थापिलेलें, परत दिलेलें ' वतन वहाल वनारी ' –थोमारो १ ६५. ६ (व) कायम असलेला, टिकलेला –क्रिवि पूर्ववत् ' याजकरिता लाडाचे चौथे दफेची इमारत ब-हाल ठेवणें जरूर '–रा ७ ९२ [ फा बहाल ] ०**करणें** सक्रि १ कृपावंत होऊन देणें २ खालच्या कोर्टाचा हुकुमनामा कायम करणें (**मामलत, सनद इ० कोणा पकास**) ०**करणें**-एखाद्यास पुन्हा तो अधिकार देणें ०**मर्जी**-स्त्री प्रसन्नता, खुशमर्जी **वहाली**-स्त्री १ अनुकूलता, प्रसन्नता २ स्थापना, ठाम करणें (अधिकारात, उद्योगात ) ३ क्षमा, माफी, कृपा ' मशारनिल्हेस बहालीचीं पत्रें पाठविलीं ' –दिमरा १ १२० ४ (मागें तगिरी शब्द जोडून) एखाद्या कामावरून कमी केलेल्या नोकराची कामावर पुन नेमणूक तगिरी वहाली पहा, पुन नेमणूक (सरकारी अधिकाऱ्याची, नोकराची) 'जर्नेल इस्वरिष्ट यास हिंदुस्थानचे फौजेचा वहाली-वर्तर्फीचा मुख्त्यार केला आहे ' –दिमरा १ १२८ ५ चढती कमान चढती, उत्कर्ष 'जीववादादा परशुरामपंताची दिसदिस वहाली। –ऐपो २२५ **वहाली-मेहेर वानगी**-स्त्री दया, लोभ

**वहाला वहावा, वहावा पचक वहावेपंचक, वहाळा**—वाहमध्यें पहा

वहाळ, वहाळणें—वाहल, वाहळणें पहा

**वहाळी**—स्त्री विपुलता, समृद्धि, भर, उत्कृष्टता ' अगा कृष्णासि। पाताळीं। जळ सापडे मुळीं। तें शाखांचिये वाहाळीं। वाहेर दिसे।' –ज्ञा १३ १७९ [ स बहुल ]

**वहि वही**—क्रिवि वाहेर, वाहेरच्या बाजूस (समासात) वहि प्रदेश, वहिर्भाग, वहिष्कार इ० [स] ०**करण**-न चक्षुरादि दहा इंद्रियें [ स ] ०**प्रीति, वहिर्ममता, वहिर्लोभ**-स्त्रीपु

वरकरणी प्रीति, माया [ स ] बहिरंग–न बाह्य स्वरूप –वि परका, अपरिचित, दूरचा, आपल्या कुळाच्या, अनुयायाच्या विस्तारात नसलेला याच्या उलट अतरग [ग] ०रंगपरीक्षण–न विशेष खोलात न जाता वरवर केलेलें आलोचन [स] ०रंगोपासन–न बाह्य उपासना ही मपद्विधि, आरोपविधि, सर्गविधि व अभ्यासविधि अशी चार प्रकारची आहे; कर्मभक्ति [ स ] ०रवसा–पु बाहेरची (भूत, पिशाचाची) बाधा बहिर्वा(र्वा)स, बहीरवास–पु १ बाहेर राहणें २ (महानु ) बाहेरच्या उपयोगाचें नेसावयाचें वस्त्र, उत्तरीय वस्त्र 'चोखट बहिरवास वेढीति।' –पूजावसर [ स ] ०रानीं क्रिवि उघड्या मैदानात, माळरानावर (भटकणें)०रायाम वात–पु एक प्रकारचा धनुर्वात यात रोग्याची छाती पुढें येऊन पाठीकडे कमान होते अतरायाम वात पहा [स] ०रुपद्रव–बहिरवसा पहा [ स ] बहिर्कोप–पु (प्र बहिष्कोप) वरपागी धारण केलेला खोटा राग [स.] बहिर्गृह–न पडवी, ओसरी, ओटी, ढेल्च–ज, दवडी [ स ] ०र्दंत–पु ओठाच्या बाहेर आलेला दात [ स ] ०र्दाह–पु शरीराची काहली, याच्या उलट अंतर्दाह [ स ] ०र्दिशेस–भूमीस जाणें–अक्रि शौचास जाणें ०र्द्वार–न व्यभिचार, राडवाजी बहि प्रकृति–स्त्रीभव राज्यकारभाराचें एक अग कोश, राष्ट्र दुर्ग, व आणि प्रजा इ० याशिवाय दुसरी अत प्रकृति प्रकृति अर्थ ७ पहा [ स ] ०र्भाव–पु बाह्य भाव, डौल, स्थिति देखावा, हेतु [ स ] ०र्भूत–वि बाह्य बाहेरील 'मनाची गणना काहीं इंद्रियात करितात कोणी त्याहून बहिर्भूत असें मणतात ' [ स ] ०र्भूमीची व्यथा–स्त्री ( ल ) हगवणीचा उपद्रव ०र्मुख–वि बाहेर तोंड असलेला, बाह्य प्रापंचिक गोष्टींकडे कल असलेला विषयासक्त याच्या उलट अंतर्मुख [ स ] ०र्लंब–वि विशाल रोणाचा ०र्लापिका–कोडें, गूढ, ज्याच्या अर्थपूरणा साठी बाहेरचें पद इ० घ्यावें लागतें अशी कूट कविता अतर्लापिकाच्या उलट [स] ०र्वक्रपृष्ठ–न गोलाचें पृष्ठ बाहेरच्या बाजूनें पाहिलें असता दिसणारा आकार –सूर्य ८ ०र्वर्ती–वि १ बाहेर राहणारा असणारा २ (ज्यो ) श्रेष्ठ सूर्याभोंवती होणाऱ्या पृथ्वी प्रदक्षिणेच्या मडलाबाहेर असणारा ( ग्रह ) बुध, शुक्र या शिवाय बाकीच्या ग्रहास बहिर्वर्तीग्रह म्हणतात [ स ] ०र्विकार–पु १ ( ल ) उपदश, गर्मी २ बाह्य, शारीरिक आजार [ स ] ०र्व्यसन–न बहिर्द्वार पहा [ स ] ०र्व्यसनी–वि व्यभिचारी, रडीबाज [ स ] बहिश्चिक(रण)–न नृत्याचा एक प्रकार बहि स्नेह–पु दिखाऊ खोटी प्रीति ममता [ स ]

बहि(हे)दा वैदा–पु बड दगा, गोंधळ, दंगा [ हिं ]

बहिरव बरक–स्त्री निशाण ध्वज, एका निशाणाखालील टोळी (अरबाची) शिन्दीच लाक पोलीसखात्यात गल्यानें त्याच बेडे व बहिरवी राहिल्या नाहींत '–(बडोदें) पेरा, प्रस्तावना ९५

बहिरम–पु (व) भैरव 'बहिरमची यात्रा भरते ' [स भैरव]

बहिरव–पु १ (राग) भैरव २ भैरव, बहिरोबा (एक देव) 'बहिरव खडेराव। रोटी सुगीमाजीं देव।' –तुगा ७९१ बहिरवी–स्त्री भैरवी रागिणी [ सं भैरव ]

बहिरा, बहीर–वि १ फुटका ( कान ) २ ज्याला मुळींच ऐकू येत नाहीं किंवा कमी येतें असा ३ वेदनाक्षम, सुन, संवेदनारहित ( अवयव ) [ स बधिर] म्ह० ( व ) बहिऱ्याकानीं कुयऱ्या, अडक्यावायती मोहऱ्या=बहिऱ्याला ऐकू यत नाहीं तव्हा त्यास उद्देशून म्हणतात ०पिसा–वि बहिरा व वेडा, पिसाट

बहिरंभट–वि बहिरा

बहिरागी–पु वैरागी पहा

बहिरावणें, बहिरणें–अक्रि १ बधिर होणें 'दिशाचक्र बहिरेलें। घाई निशाणाचा।' –शिशु ५८५ २ वेदनारहित, सुन होणें [ बहिरा ]

बहिरी, बहिरीससाणा बहिरससाणा–ससा–पु १ ससाणा, एक मासभक्षक पक्षी याच्या पाठीचा रंग पारव्यासारखा असून मध्यें काळे ठिपके असतात दुसऱ्या पक्ष्याची शिकार करण्यासाठीं हा बाळगतात 'बाज बहिरी सोनार।' –दावि २४४ २ (ल) हुषार व धीट माणूस ०चोका–पु चलाख, वस्ताद, छाप बसविणारा इसम ( बहिरीससाण्याप्रमाणें डोळे असलेला, माजरा प्रमाणें चपल)

बहिरी–पु भैरव देव, बहिरोबा [ स भैरव ]

बहिरीवे(व्य)था बहिरी–स्त्री सुनबहिरी नावाचा रोग यानें त्वचला बधिरता येते

बहिरोबा–पु १ भैरव देव २ (ल ) बहिरा मनुष्य [ स भैरव ] ०ची सेवा असणें–अक्रि बहिरा असणें

बहिर्बुणगें, बहिरी, बहारबुणगें–न फौजेंतील बाजार बुणगें गर्दी 'भले भले सरदार यानीं बहिरींत तोंडें घातलीं।' –पेपो २७९ [ हिं बहीड बुन्गाह् ]

बहिष्कार–पु १ जातीबाहेर किंवा वाळींत टाकण्याची क्रिया ( क्रि० घालणें ) २ (सामा ) बाहेर ठेवणें, असहकारिता 'विनवणीस बहिष्काराची पुरवणी देऊन ' –टि ३ १० ३ त्याज्य ठरविणें, अंगिकार न करणें ( वस्तु इ० ) 'परदेशी मालावर बहिष्कार पुकारला ' [स] ०वादी–वि बहिष्कार पाळणारा बहिष्कारवादी विद्यार्थ्यांनीं कॉलेजें सोडलीं '–केले १ ३२२ [ स ] ०णें–सक्रि वाळींत टाकणें 'असो जैसा पुत्र भ्रष्टला। तो सर्वी जैसा बहिष्कारिला।' –ह २० ८६ [ स ] बहिष्कृत–वि १ जातीबाहेर, वाळींत टाकलेला २ बाहेर ठेवलेला, वर्ज्य केलेला

बहीण—स्त्री १ आपल्याच आईबापांची कन्या, भगिनी २ चुलत-आते-मामे-बहीण इ० ३ वरील बहीण ४ (निदर्शी) गुणांत, वर्तणुकींत एखादीची बरोबरी, बरोबरपणा करणारी स्त्री [स भगिनी, प्रा बहिणी, गु बन गि भेणु प भैण, मेनि पेन] म्ह० बहिणीमुळे भावोजी सोयरा ०जवाई-जावाई-पु (व) मेहुणा, बहिणीचा नवरा ०तीज-बीज-स्त्री कार्तिक शुद्ध तृतीया आणि द्वितीया, भाऊबीज बीजेस बहीण भावास ओवाळते व तीजस भाऊ तिची वस्त्रालंकारांनी संभावना करतो ०पणा पु मेहुण्याचे नातें 'ऐसा वरविला आमुचा पति। त्या बहिणपणा आग लागो।' —जै ७११०१ ०भावंडें—नमव भाऊ आणि बहिणी (समुच्चयानें) ०माया-पु (राजा) एकाच भाईंत्रन नातें, भाऊ बहीण, सहोदरपणा म्ह० बहीणभाव्या व सासू जावया ०लेक-पु (ना) बहिणीचा मुलगा, भाचा ०वळा-स्त्रीमव बहिणींची मालिका [बहीण+ओळ] बहिणीस-रा (वों) (अशिष्ट) बहीण बहिणुली—स्त्री लाडकी बहीण 'द्रौपदि ह बहिणुली।' —दप ४८ बहिणोई-पु (व) बहिणीचा नवरा, मेहुणा [बहीण+नाहो (-नवरा) बहिणोहो-बहिणोई]

बहीफळ—न श्रीफल [हिं]

बहीर—स्त्री अघाडीचें सैन्य, फिनी [हिं]

बहु—वि १ पुष्कळ, अतिशय, अनेक (समासांत) बहुपाद= पुष्कळ पायाचा, बहुभुज=पुष्कळ हाताचा, बहुप्रिय=पुष्कळास प्रिय, बहु-मत्त-गुण-तंत्रा-पर्ण-पत्र इ० २ —क्रिवि फार, अधिक 'तैसा बृहस्पतिचा मी वीं बहु राज्यार्पणादि बहुपरती।' —मोभीष्म १२५१ [स] म्ह० बहुरत्ना वसुंधरा ०फदास-क्रिवि फारकाय हरी व्यसन पाप हें बहुफदास काया धवा।' —कका७४ ०ऋणी-वि पुष्कळाचा देणेकरी, बहुत ऋण असलेला म्ह० बहु उवा त्यास खाज नाहीं, बहुऋणी त्यास लाज नाहीं [स] ०काल-क्रिवि पुष्कळ वेळपर्यंत, बहुतकाळ ०कोण-पु चौकोनापेक्षा जास्त बाजूंची सरलरेषाकृति —महमा ७ ०गुणित-वि अनेक मिळून एकाप्रमाणें दिसणारा —ज्योति शास्त्राचीं मूलतत्त्वें ०गुणी-वि १ पुष्कळ गुण असणारा पुष्कळ गोष्टी ज्यास करता यतात असा, पुष्कळ कामी किंवा उपयोगी लावता येण्यासारखा (मनुष्य, वस्तु) २ एक श्लेषात्मक रचना, टोंब्या, बईल 'बहुगुणी ईश्वरभजनीं लक्षाचा मनुष्य मोटयोग्य' या वाक्यातील पहिल्या तीन शब्दांतील आद्याक्षरें घेतल्यास बईल असा शब्द बनतो व तो मोटयोग्य म्हणजे मोट ओढण्यास योग्य टोंब्या असा अर्थ यात आहे [स] ०चरू-वि वाचाळ, बडबड्या चावट बहुचकाशीं करू नये। मैत्री कदा।' —दा २२२९ [स बहुवाचक] ०चके-स्त्री प्रेमिष्टपणा चावटी, बहकलेपणा बहुचकें ज्ञातया। आणिली चोरें।' —ज्ञा१८७३९ ०जिन(न्न)सी-वि आत पुष्कळ जिनस असणारा अनेक प्रकारचा 'दशक अष्टादशक बहुजिनसी।' —दा १८ ०प्र-क्रिवि पुष्कळ मार्गांनीं, ठिकाणीं [स] ०त्व-न १ पुष्कलता २ (प्रबंध) रागालापांत एखादा स्वर अनेक वेळां घेणें [स] ०दुधी-वि पुष्कळ दूध देणारी (गाय, म्हैस) 'अनुदकिंगी अल्पमोली बहुदुधी अशी (गाय) मिळणें कठीण' [बहु+दूध] ०धा-वि (काव्य) नाना प्रकारचा 'पाहें मुनिप्रसादें करुनि धम स्कार उदित बहुधा मीं।' —मोअनु ७९७ —क्रिवि १ पुष्कळ मार्गांनीं, प्रकारांनीं २ पुष्कळ अर्थीं बहुतकरून, बहुदा, बहुतेक [स] बहुधा नाहीं—क्रिवि क्वचित्, बहुत, वर्षीहि न, फार क्वचित् बहुधाकार-पुअव १ अनेक प्रकारचे आकार 'ऐसें बहुधाकारी वर्तेनी। बहुचि होउनी।' —ज्ञा ९२५८ २ —न (ल) जग ०धानक-स्त्री माया, प्रकृति 'गुणत्रयरूपी पदार्थभेदाचीं बीजें तींत आहेत म्हणून बहुधानक' —गीर १५८ ०धान्य-पु साठ संवत्सरांतील बारावा संवत्सर ०नायकी-स्त्री पुष्कळांचें राज्य सत्ता, बहुराजकी, (ल) झोटिंगपादशाही, अंदाधुंदी बारनायकी पहा ०पतिकत्व-न एक पति जिवंत असतां दुसरा किंवा अनेक पति करणें [स] ०पत्नीकत्व-न त्यांची बायको जिवंत असतां दुसऱ्या एक किंवा अनेक स्त्रियांशीं लग्न करणें [स] ०पाद-पादी प्राणी-पु अनेक पाय असणारा प्राणी या वर्गांतील प्राण्यांच्या पायाला अणीदार टोंक असतें व पुढील दोन पायांच्या पजात विषाच्या गाठी असतात गोचीड, घोण हे या वर्गांत येतात [स] ०प्रजा-वि पुष्कळ संतति मुलेंवाळें, परिवार असलेला [स] ०प्रद-वि उदार, सढळ हाताचा [स] ०बीज-वि पुष्कळ बियांचा [स] ०बोलका-वि वाचाट, बडबड्या ०भाग्य-(राज्य, कुटुंब इ०ना कारण असें) पुष्कळांचें दैव [स] ०भाष(स)-भाषी-वि १ बहुबोलका २ पुष्कळ भाषा जाणणारा, दुभाषी [स] ०मत-न साधारणतः अधिक लोकमताचें मत, गण्यांपक्षा अधिक मतें —वि पुष्कळांस मान्य 'भीष्म म्हणे बा! बहुमत साधुचि, न तसें सदा श्रम ज्ञात्या।' —मोभीष्म १८१ [स] ०मान-पु आदर, मान, सन्माननीय आगतस्वागत [स] ०मूत्रता-स्त्री मेहाचा एक प्रकार, बहुमूत्ररोग [स] ०मूत्रमेह-रोग-पु बेसुमार मूत्रस्राव होणारा रोग मधुमेह यांत तृष्णा घाम येणें, तोंडास दुर्गंधि जीभ, डोळे व कान यांस ओलसरपणा खोकला, अरुचि कोरड दाह थकवा इ० विकार असून लघवी पिवळी होते [स] ०मूल्य-मोली-वि मौल्यवान उंची म्ह० बहुमोली अल्प संतोषी ०युक्पद-वि (गणित) पुष्कळ पदांचा [सं] ०ये-वि बहुत तय परिवार बहुये। अघडता वीं।' —अमृ ९३८ [स बहु] ०रंगी-वि १ नानारंगी चित्रविचित्र २ बहुगुणी हरहुन्नरी ३ प्रसंगानुवर्ती वेळ पडेल तसें वागणारा [स] ०रत्नावसुधरा—नानारत्नांमुधरा पहा [स] ०राशिक—न (गणित) संयुक्त व साधें गुणोत्तर यांचें समीकरण [स] ०राशिप्रमाण-

न एखाद्या परिमाणाचें दोन किंवा अधिक परिमाणाशीं असणारें प्रमाण [स] ०रूप-न १ नाटय, अभिनय, सोंगें घेणें, विडंबन इ० २ जगदाकार, विश्व 'जो भेटतखेव सर। बहुरूप हें।' –अमृ २९ –वि अनेक प्रकारचा, रूपाचा, नानाविध [स] ०रूपत्व-न (रसा) अनेकाकारत्व. इं ऑल्ट्रोइझम, आल्ट्रोपी यास प्रतिशब्द ०रूपी-पु नाचणारे, सोंगें आणणार, नकल्या इ० लोकांच्या वर्गातील एक व्यक्ति, नाना प्रकारचीं सोंगें घेऊन उपजीविका करणारा 'कल्टावत बहुरूपी।' –दावि ४७४ ०वचन-न (व्या) अनेकवचन, अनेकत्वद्योतक वचन [स] ०वचनान्त-वि शेवटीं बहुवचनी प्रत्यय असलेला (शब्द, क्रियापद) [स] ०वस-स्त्री १ वल्गना, बसवीण २ गवगवा, बोभाटा, गाजावाजा (क्रि० करणें) –वि १ वाचाळ २ (काव्य) मोठा, बहुत, पुष्कळ, फार, नानाविध, विस्तृत 'तैसा बहुवस ससार।' –एभा २० ४६० –क्रिवि १ पुष्कळअशीं 'म्हणे हें आवड बहुवस।' २ (प्राय बहुवस) बवद, स्वैर इ० ३ सर्वज्ञ –मनको ०वसपण-न १ सर्वज्ञता 'आपुलेनि बहुवसपणें। श्रीकृष्ण म्हणे।' –ज्ञा ६ १०७ २ सर्वत्र राहण्याचा धर्म, व्यापकता 'कीं वायूचिया बहुवसपणें। अभ्रीं दिगत लक्षिने यक क्षणें।' –स्वादि १० २ ३५ ०वार-वाईं-क्रिवि पुष्कळदा, अनेकवेळ, अनेक प्रसगीं 'प्रियानुचतुरीं जिहीं न बहुवार पत्रावळी।' –केका ७ [स] ०विध-वि पुष्कळ प्रकारचा, नानाविध [स] ०वें-क्रिवि फार, पुष्कळ 'तया दासी बहुवें पाहें। मागाचि तू।' –ज्ञा १७ १० [प्रा] ०व्रीहि-पु (व्या) एक समास यांत कोणतेंहि पद प्रधान नसून सबंध सामासिक शब्द त्याहून निराळ्या अशा नामाचें विशेषण असतो उदा० चतुर्भुज, शशिशेखर इ० [स] ०श-शा-क्रिवि पुष्कळअशीं बहुतकरून, बहुधा 'बहुशा छेदिता जो दशकठ।' –दावि १७४ [स] ०श्रुत-वि ज्यानें पुष्कळ ऐकिलें आहे असा पुष्कळ गोष्टींचें थोडथोडें ज्ञान असलेला सामान्य माहिती असलेला [स] ०सम्मत-न सामान्य मत अभिप्राय (क्रि० पडणें होणें, असणें, घेणें) ०साल-ळ-क्रिवि १ (काव्य) पुष्कळ 'बहुसाल मारिले भुरके।' –मोउद्योग ७ ७७ २ नित्य, नहमीं, सदोदित, वारवार ३ पुष्कळ वर्षेपर्यंत, लांब अवधिपावेतों ०सालपण-न नाना प्रकार 'गुरु ऐसें नें म्हणणें। तेंही आइ बहुसालपणें।' –एभा ३ २७५ ०सुखवाद-पु (तत्त्वज्ञान) आधिभौतिक सुखवादातील एक श्रेष्ठ पथ, जनहितवाद, पुष्कळांचें पुष्कळ सुख अगर हित जें करून होईल तें करणें अशा प्रकारचें नीतितत्त्व 'बथाम मिल वगैरे पडित 'बहुसुखवाद' पथाचे पुरस्कर्ते आहेत' –ज्ञाको (ब) ६७ [स] ०क्षम-वि अतिशय सोशीक धीराचा [स] ०ज्ञ-वि पुष्कळ जाणणारा [स]

बहुगुणें-णी-नस्त्री दर तोळ्याचें धातूचें भांडें [बहु+गुण]

बहुडणें—अक्रि १ मागें फिरणें, सरणें 'गृहाप्य तरी बहुडे। तारुण्याची गांठी विघडे।' –ज्ञा ६ २६० २ उडणें –सक्रि निरोप देणें, बोळविणें, परत पाठविणें 'गरुडा आर्ळगूनी बहुडविलें' –तुगा ५२

बहुडा-ड—पु (कृपादृष्टीचा) वर्षाव 'हे भेगी मण्डे बहुडा। मेघाचा कसा।' –ज्ञा ११ ६७०

बहुडा—पु बदलण्यासाठीं खजिन्यांतून परत पाठविलेले पैसे, बदला, परत; परतबहुडा असेंहि म्हणतात कळवी पहा 'प्रेम देऊनि बहुडा झाला। तुका म्हणे विठ्ठल बोला।' –तुगा २७६ [गु]

बहु(हू)त—वि पुष्कळ प्रचुर, फार, अनेक [स बहु किंवा प्रभूत, प्रा बहुत्त; हिं बहोत] ०करून-क्रिवि पुष्कळअशीं, सामान्यत, पुष्कळदा, प्राय ०काळीं-दिवशीं-वि जुना, पुरातन, पुष्कळ दिवसांचा ०धाराचे निवडुंग-पु पुष्कळ धारा असलेला निवडुंग निवडुंग पहा ०धीणि-वि पुष्कळ अपत्यें प्रसविणारी 'म्हणौनि पहिलेयाचि वेळा। बहुतवीणि जाली।' –भाए ३१४ [बहुत+वीण] बहुतावें-न (कों) (एखाद्या कामांत) माजवीपक्षा जास्ती व्यवस्थापकांचा, कर्त्यांचा सबंध असणें, बारभाईपणा 'मसलतीचे कामावर बहुतावें कामाचें नाहीं' बहुतेक-वि अनेक, कित्येक, पुष्कळ 'माझीं लेकरें बहुतक मेलीं। महा दुष्काळें करूनिया।' –ह २९ १८८ –क्रिवि (काव्य) बहुतकरून पुष्कळअशीं, हजार वाटयांनीं [बहुत+एक]

बहुरणी—स्त्री. गाभणें जनावर –वि गाभण (गाय, म्हैस इ०)

बहुल-ळ—पु चैत्रादि महिन्यांतील वद्य पक्ष –वि १ वद्य(पक्ष) २ (काव्य) पुष्कळ, फार, अतिशय [स] ०स्वर-पु (सगीत) रागातील वादी स्वर

बहुली—वि सुदर

बहुली—स्त्री नाचणीची हलकी जात

बहुलें—न बोहलें, लग्नात सुर्जीत घातलेली चतुष्कोण वेदी यावर वधूवर, बटु बसतात व होम करितात ह्याची लांबी-रुंदी ५।४ आणि उंची एक हात असून ती सुर्जीत मुलाच्या हातानें व लग्नात मुलीच्या हातानें मापितात 'ऐसें सवादाचा बहुला। लग्न दाघाचिया आतुला। –ज्ञा १८ १५७८ [बहुल-बोहलें, मवाल्य बाहुल्य?]

बहुळणें—अक्रि व्याकुळ होणें

बहेचवजह—क्रिवि कोणत्याहि रूपानें –आदिलशाही फर्मानें [फा]

बहेतल बहा, बहाड बहताड—वि (व) मूर्ख बडसर बावळट पिसाट '[हिं बेहकना बहकल]

बहूंशीं—क्रिवि बहुतेक [बहु+अशीं]

बह्वाशी—वि आधाशी, खादाड [स बहु+अश्=खाणें]

बळ—न १ जोर; सामर्थ्य, शक्ति, क्षमता बल पहा २ सैन्य 'पळती बळें समस्तें' —मोकर्ण २ १ [स बल] म्ह० जिकडे बळ तिकडे न्याय ०करणें—क्रि १ जोरावर येणें, जुलम, जबरीचे उपाय योजणें २ सर्व शक्ति लावणें, लागू करणें ०धरणें—क्रि नेट धरणें दम धरणें, शक्ति मिळविणें ०बांधणें—क्रि १ नेट धरणें २ कंबर बांधणें, तोंड देण्यास, यत्न करण्यास तयार होणें, शक्ति कमाविणें बळाचा—वि १ बळकट २ दुसऱ्याचा जोर असणारें (बुद्धिबळ) बळास येणें—क्रि जुलम करण्यास आरंभ करणें, हमरीतुमरीवर येणें मामाशब्द– ०कट—वि १ मजबूत, दृढ २ जोराचा, झपाट्याचा (पाऊस) ३ भयंकर, घोर 'धात्र कुरुपति तेव्हां राया। संग्राम होय बळकट कीं।' —मोशल्य ३ ११ —क्रिवि १ झपाट्यानें, पूर्णपणें, अतिशय 'मी बळकट जेवलों' २ घट्ट, पक्का 'हा साधा बळकट बसला' [स बल+का कट्ट] ०कटी—स्त्री १ सामर्थ्य, शक्ति २ दृढता, जोर, टिकाऊपणा, मजबुती, सहन, प्रतिबंध करण्याची शक्ति (मनुष्याची, वस्तूची) ०कटून—क्रिवि घट्टपणें, गच्च, आवळून (क्रि० धरणें, बांधणें) ०कुनळ—न बलुबल पहा ०गंड—वि दांडगा ०गाढा—पु बलिष्ट बलाढ्य 'एक शत बळगाढे।' —मुआदि २६ ९९ ०गे—न (गो) पाठबळ, शक्ति ०जोरी–जबरी—स्त्री १ बलात्कार २ जुलम, दांडगाई ३ (कायदा) कोणा मनुष्यास गति देण्यास, बदलण्यास किंवा बंद होण्यास अगत्यानें कारण होणें, (इं) फोर्स ०ताड—पु नर जातीचें ताडाचें झाड ०त्कार—पु (ग्र) बलात्कार 'बळत्कार राया करावा सितेला।' —राक १ १५ [स बलात्कार] ०दर्प—पु सामर्थ्याचा, शक्तीचा गर्व 'यका मुग्ला बलदर्प। गेला बळदर्प गळोनि।' [स] ०पोंचा—स्त्री हाताची शक्ति ०बंड—वि दांडगा [प्रा] ०भद्र–भद्या बळि(ळी) भद्र—पु १ कृष्णाचा वडील भाऊ, बलिराम २ (ल) मजबूत मनुष्य ३ शिवाचा एक गण 'कली गर्जेना बलिभद्रे।' —एरुस्व ५ ३९ —वि (ल) कपाळकरंटा, कुलक्षणी 'स्वस्त्रीचा अनुग्रह गुरु केला शुद्र। तोही बलिभद्र ज्ञानहीन।' —ब ४६ [स बलभद्र] ०मस्त—वि शरीरबळाच्या गर्वानें फुगलेला ०मस्ती—स्त्री शक्तीचा गर्व, मद ०मोड—पुस्त्री (प्राणी वनस्पति रोग इ० इ० कांच्या) शक्तीचा ऱ्हास 'चांगलें झाड वाढत होतें पण गुरानें तोंड लावल्यापासून त्याची बळमोड झाली' —वि कमजोर झालेला, ऱ्हास झालेला. ०लिक—स्त्री (कों) अशक्त आजार 'ऐन मनुष्य एकुणचाळीस वरस वेळी बळलिक पडुन रोग होता' —शिपु २ ७० ०वणें—क्रि बळकावणें [प्रा] ०वत–वान—वि बळकट, बलाढ्य, शक्तिमान समर्थ [स] ०वत्तर—वि बलवत्तर पहा बलाढ्य, बळात्कार, बळावळ, दाबी ५ ४३

बळिष्ठ—बलाढ्य इ० पहा बळाधिक—वि (गो) बळवत बळिष्ट बळार्थ—पु पराक्रम, बळाचें काम 'वयसा तरी येतुले वरी। एऱ्हवीं बळाचा बळार्थ करी।' —ज्ञा ६ २६१ बळावणें—अक्रि १ बळकट जोरदार होत जाणें, जोरानें, झपाट्यानें, जोमानें, अतिशयानें वाढत जाणें २ —सक्रि. बळकट करणें 'दारुनि कीं ही! बळाविला वध।' —मोशल्य ३ १७ बळकावणें—अक्रि शक्तीनें, बळानें वाढणें बळावणें पहा. बळकावि(च)णें, बळकविणें—सक्रि बलात्कारानें, अन्यायानें ताबा घेणें, उपटणें, अन्यायानें वहिवाटणें, दाबून ठेवणें [बळ] बळावळ—स्त्री विपुलता, जोर, शक्ति (माणसें, पैसा, सैन्य इ० ची)

बळ—स्त्री १ बल पहा २ देवतेस अर्पिलेली वस्तु, बलि (क्रि० वाहणें, लावणें, अर्पणें) 'देवास माणसाची बळ द्यावी' —विधवाविवाह पृ १३. —न (वे) लक्ष्मी देवतेसाठीं मार लेल्या रेड्याचें शिर गावाभोंवतीं फिरविणें [स बलि]

बळई—पु गावच्या सीमा दुरुस्त करणें, गावाला सर्पण पुरविणें इ० कामें करणारा महार [हिं]

बळग—न (व) आप्तेष्ट, आप्त, सोयरेधायरे

बळगार—पु (वे) कासार

बळगी—स्त्री जाडेभरडे हलक्या किंमतीचें लुगडें —वि भिकार, टाकाऊ 'मग भक्तीशीं बळगीं दोन घोडीं होतीं . ' —भाव ७१ [बळ=गेळेरे?]

बळचें—क्रि (गो) पसरणें

बळद्–त—न (राजा) धान्य साठविण्याची भिंतींतील पोकळ जागा, कोठार यात वरून धान्य ओतून खालच्या बाजूस असलेल्या भोकांतून तें काढतात 'दोन मण गहूं आहेत बळदात।' —राक १ ' २ भुयार, जमीनींतील पोकळ जागा ३ लांकडें इ० अडगळ ठेवण्याची जागा ४ (कों) सांवट्याचें, खरकट पदार्थ, खरकटीं भांडीं ठेवण्याची व धाळी घातलली जागा ५ (व) गुराची वैरण साठविण्याची जागा [का, म बिल]

बळदणें—क्रि साबरणें भरणें 'तू वाटल तसें नागडें नाचावें व मी तें बळदावें हा कोठला न्याय?' [बळद]

बळया, बळा(ळ्)यानी—क्रिवि (कु गो) बळेंच, मुद्दाम [बळ]

बळय—पु (व) एक प्रकारचा मासा

बळ्याय—पु दंगा प्रमाणाचे गिर्द्वाईक मेनरियारी बळ माय आम जाला —रा ६ ३७७ [हिं बल्बा=बड]

बळस–सें—पुन अन्नाच्या वरीं बालकाच्या, पशूच्या तोंडातून निघणारा पदरा व चिकट द्रव नाकातोंडातून निघणारा फेंस, मळ 'विष्ट मूत्र आणि बळस।' —दा ३ ५.४४ [का ?] बळसट—न १ पा कफ, चिकट रक्ताचा सांकळा ३ कामतादि अ ज्वर रोग माय इ० निरढुन काढून न वाच्या बरींबाहर पोंचविणें

वळाणा—न (चि) वळद —मसाप २ ४ ३६६

वळा(ला)णी—स्त्री (चि) वसण्याकरिता (बाकाप्रमाणें धलेला) चिरवदी ओटा —मसाप २ ४ ३६६

वळार—स्त्री (गो) मोठा वगला

वळाहक—पु मेघ ढग [स बलाहक]

वळी—पु प्रसिद्ध दानशूर बळी राजा छळी नृपवळी, वळी तरिच तो नस आटला।' —केका ७६ [स बलि] ॰बधन—पु वळीला बधन करणारा वळीच्या बधनात राहिलेला वामन अतुलबळें प्रबळु। बलिबधनु।' —ज्ञा १२ २४१ ॰राजा—पु कुणबी, शेतकरी (हा धान्य पैदा करून दुनियेच्या पोगपाण्याचा भार उचलतो म्हणून) —गांगा ७ वळिराजाचा धर्म पु शेतकऱ्याचें दान

वळा—पु (कों) दलदलींत राहणारा एक पक्षी

वळा—स्त्री (वे) रद्दमाची पट्टी

वळी—पु (कोष्टी कर) सुत उवरण्याच्या रहाटावरील सुनाच पाचशे पचवीस (दोऱ्याचे) फेरे सात ताव धोक आठ लुगडीं विणलीं म्हणजे एक वळी सुत शिल्क राहतें '

वळी-ळि—पुस्त्री १ बलि पहा दवतेस अर्पण करावयाची वस्तु (पशु इ०) (क्रि० देणें वळी नेदूनि आम्हासी। ह जाऊ पाहती पूर्ण पदासी। —एभा ४ १५४ २ (?) आहुति होम जीववेंं साधूनि वळी। भूत प्रत कुळें मैळीं। —ज्ञा १७ ८० ३ —पु कर पट्टी इतराची काय कथा? ज देणार निरखवें वळि वा गा। —मोसभा ३ ३१ [स बलि] ॰दर्णे भक्ष्य म्हणून अर्पण करणें तुका म्हणे वळी। जीव दिला पायातळीं। —तुगा ९९१ ॰पडणें—क्रि भक्ष्यस्थानीं पडणें नाश पावणें मरणें ॰बा वकरा—वि (कर) मुर्दाड ॰दान—प्रतिपदा बलिदान बलि प्रतिपदा पहा ॰राणा—पु (वायकी) प्रभृतीच्या अकराव्या दिवशीं विगळ फिरण्यावर पाटावर काढलेल्या तांदुळाच्या दोन बाहुल्यांची पूजा करून ती सुवासिनीच्या ओटींत घालण्याचा विधि ॰हरण न १ भूतयज्ञ दवतास रोज भूमीवर दिलेल्या भाताच्या मडलाकार आहुती (वैश्वदवाच्या आहुती कुशातील अर्पीत टाकतात व या मुखर विशिष्ट क्रमानें घालतात) २ (ल) पोथीच्या समासाभोंवती टिप्पणीवजा किंवा चुकाच्या शुद्धीकरणार्थ लिहून सर्व पोथी चिताड करणें (क्रि० घालणें) [स बलिहरण] ॰घालणें—क्रि पोथी, पुस्तक चिताड करून ठेवणें

वळी—वि १ बळकट बळवान एकसरें गिरी धरिला गोपाळीं। होता भाव वळी आम्हीं एसा।' —तुगा ७० २ बुद्धिबळें खळ ण्याचा एक प्रकार जारी डाव [वळ] म्ह० वळी तो कान पिळी ॰आ या—पु बळवान माणूस —वि बलिष्ठ बलाढ्य बापु बळिआ अभिमानु। काई एकु न वसी। —शिशु ७४२ —क्रिवि दपणानें ॰करण—न १ बळकट, निरोगी करणें 'आता कदर्थवित व्याधि। वळाकरणाचिया आधी। आपपर न शोधी। सद्गुरु जैसा। —ज्ञा १६ १४१ २ उतार कमजोर कमी होणें [प्रा] ॰याड—न शिपाई साचळ होतां बलियाडें। धांवणियासि निघाले।' —दव दासकृत सतमालिका ९ ॰याडा-ढा—वि बळकट बलाढ्य दढ नि याचा पायाच प्रबळ बलियाडें। इमुरा २५ ८ ॰यावणें—क्रि बळकावणें सतराचियेचें पाणियाडें। वळियाविलें। ज्ञा ९ २१४ ॰य वि (महानु) बळकट पाधु म्हणे बलिय पाय हारिम वलिमद वसुदवो नद।' —धवळ पूर्वार्ध ५० ॰येपणा—पु बळकटपणा, सामर्थ्य

वळूखार—पु एक खार —मुव्या १३८

वळें—क्रिवि १ जोर जुलम जबरी सक्ति यानीं २ दारून बुद्धिपूर्वक मुद्दाम जाणूनबुजून उदारपण पानिले अजि गुरूपहासा वळें।' —केका ७० ३ हटानें ४ आश्रयानें तरेन तुमच्या वळें भव महानदी नाविरा। केका २२ [वळ] म्ह० आपल्या वळें बाधावी वास आणि कोणाची धरू नय आस —नि ४३१ वळेंचा वळेंवळेंचा वळवावळव्याचा—वि बळानें काढलेला ताणलेला ओढून आणलेला मनापासून नव्हे असा कृत्रिम अस्वाभाविक (अर्थ ६०) [द्वि]

वळा—पु (कु) एका माशाचें नाव

वळोत्तर—वि बळकट बलवत्तर पहा

वळोवळी-ळि—क्रिवि (महानु) एकसारखें नेटानें निर सारीं घरडहुळी। दव न करित बळोवळी। —ऋ ए२२२ [वळ]

वक्षिशी सी—स्त्री वक्षीस पहा

वक्षी पक्षी वख्शी—पु १ सेनापति सेनाध्यक्ष २ उमेद वाराची शिफारस करून मनसव देवविणारा ३ सैन्यातील शिपा याचा पगार वाटणारा [फा बख्शी] ॰गिरी—स्त्री सेनापित्य

वक्षी—न (नाशिक) लवकर तयार होणारी विड्याच्या पानाची एक जात

वक्षागहू वक्षी—पु वक्शी गहू पहा [हि]

वक्षी(वशी वक्षी)स वक्षिशी-सी—स्त्री १ पारि तोषिक इनाम देणगी (कमी दर्जाच्या किंवा हाताखालील माण सास मिळेली) (क्रि० करणें) २ क्षमा माफी (क्रि० करणें देणें) तिचे पायावर डोई ठेऊन झाले अन्याय बक्षीस करून घेणें ' —ऋप २८७ ३ (कायदा) दान देणगी —घा१४६ —क्रिवि वक्षिसाच्या रूपानें —वि माफ [फा बख्शिश] ॰पत्र बहाल पत्र—न बक्षीस दिल्याचा लेख बक्षीस दिल्हें तें वक्षिपत्र किंवा बहालपत्र —भाअ १८३३

बा—पु १ (काव्य म पुण) बाप जनक वडील 'बधिजे साहेब अकुत हयगजहि इच्या मह्कम बा नें। —माभीष्म

११ १६ २ संबोधन (लहान मुलें किंवा तरुणाबद्दल प्रेमानें योजताना), बाबा ! बाळा ! अहो ! 'बा ! तुला चालना काळ खायाला मिळती सकळ।' 'आज्या बा न म्हणावें यद्दिवर यतो तयाहि माज्या बा।' –मोआदि ३४ ७२ ३ बहुमानार्थी मनुष्य, देव इ० च्या नांवापुढें योजावयाचा प्रत्यय उदा० गणोबा, गोंदबा, विनबा इ० ४ यश्यें परंतु आदरार्थी नामास जोडावयाचा प्रत्यय उदा० वाघोबा, नागोबा, वेडोबा [स पाद–पाअ–बाअ–बा पाद=श्रेष्ठत्व दर्शक पदवी उदा० गोविंदपाद –भाअ १८३५। म्ह० बाचा बा गेला मी बोंबलता भोंड गेला **बा इत्वर्णे**–अक्रि (अश्लील) मध्यें पडून बिघडविणें, भलतीच गोष्ट करणें, घाण करणें **मागून पुढून बा च नवरा**–१ मुलाचें लग्न करण्याची वेळ आली असता आपलेंच लग्न लावणाऱ्या विधुर बापाबद्दल योजतात यावरून २ (ल) आपमतलबी मनुष्य

**बा**—स्त्री (गा) आई, म्हातारी स्त्री [बाई]

**बाआगळा**—वि (त्यापेक्षा) वरच्या दर्जाचा, अधिक चांगला, उत्तम 'येथें असला धोतरजोडा मिळेल म्हणून काय विचारतोस, याचा बाआगळा मिळेल' [बा=बाप+आगळा=पलीकडचा]

**बाइक्या, बाइल्या**—वि १ नर्मीं बायकांबरोबर असणारा, रांडयाराबाजी २ नामर्द, पुरुषत्वहीन ३ बाईलबुद्धया, बायकोच्या तंत्रानें चालणारा [बायको, बाईल]

**बाइणी**—स्त्री वायदा, तगादा जैसा समर्थु आणि ऋणिया। मार्गी आला बाइणिया।' –ज्ञा १८ २५२

**बाइनवार**—क्रिवि (ना) अनुक्रमानें [बाईन=अनुक्रम]

**बाइ(य)लर**—पु तापक, वाफेच्या यंत्रातील पाण्याची वाफ ज्या भागात बनत तो भाग [इ बॉयलर]

**बाइलीचें पान**–न विड्याच्या पानाची एक जात जनीचें पान पहा

**बाई**—स्त्री १ सामान्यत स्त्रियांच्या नांवापुढें आदरार्थी योजण्याचा शब्द 'रमाबाई आली आणि आकाबाई गेली' २ वडील जाऊ, आई, मोठी बहीण, परकी प्रतिष्ठित स्त्री ३ स्त्रीशिक्षक, मास्तरीण शिक्षकीण ४ मैत्रीण, सखी 'अगाई हा बाई! त्वरित वरि जाईल पडुनी।' –र २१ ५ (बायकी) पादपूरणार्थक उद्गार 'दिलेन् धाडून् बाई पैसे' ६ (ल) रमली ७ –ओंवर अंगावर उठणाऱ्या वटी, फोडया (क्रि० येणें) [स भगवती–बआई–बवी–बाई किंवा भवती–बअई=बाई] म्ह० बाई आल्या पगान आणि दोवा बमर वोनत **०बाई**–उद्गा (बायकी) आश्चर्य, धिक्कार, कमारी इ० दर्शविणारा उद्गार 'बाई, बाई! हाये माली' **बायाबापडीचा**–वि दुबळया व निराश्रित स्त्रीचा

**बाई(इ)ल**—स्त्री १ पत्नी, बायको, लग्नाची किंवा पाटाची स्त्री 'न म्हणे बद्दल याण कीं ठवा रामदास बाईल त्याला।' –मोकर्ण ३९ ३२ २ (पाटावर) ठेवलेली स्त्री, रक्षा [बाई] म्ह० लहानपणीं आई आई, थोरपणीं बायला बाई **०काम**–न गृहिणीचें काम, घरकाम, घरधंदा **०काम्या**–वि केवळ घरकाम किंवा बायकी काम करणारा, त्यात हुषार (पुरुष) **०खाऊया**–वि १ स्त्रीलंपट, अति संभोगी, रंडीबाज २ बायकोमाऱ्या, ज्याच्या पुष्कळ बायका मेल्या आहेत असा [बाईल+खाणें] **०खाया**–वि बाईलखाऊया अर्थ २ पहा [बाईल+खाणें] **०गाठ**–स्त्री बायकी गाठ, सामान्य गाठ, साधी गाठ [बाईल+गांठ] **०पिसा**–वि बाईलवेडा पहा **०पिसें–वेड**–न अत्यंत स्त्रीलंपटता, संभोगाबद्दल आसक्ति, रंडीबाजपणा **०बडगा–बिडंग**–पुन मुलेंबाळें, गुरेंढोरें, चीजवस्त इ० मोठें कुटुंब, खटलें, पसारा (व्यापक अर्थानें) **०बंदा–बाधा–बुद्धया**–वि स्त्रीच्या, बायकोच्या तंत्रानें चालणारा, स्त्रीवश, बायकोचा गुलाम असलेला **०बुद्धि**–स्त्री १ बायकी ज्ञान, शहाणपणा, अक्कल, समजूत २ बायकी ममलत, सल्ला, मत, विचार ३ (ल) थोते व अपरिपक्व विचार [बाईल+बुद्धि] **०बोल्या**–वि जनानी आवाजाचा (पुरुष) [बाईल+बोलणें] **०भाड्या**–वि बायकोवर पैसे किंवा नोकरी मिळविणारा [बाईल+भाडें] **०भुला**–वि स्वतःच्या बायकोचा पराकाष्ठेचा शोकी, स्त्रीलंपट, स्त्रीवेल्हाळ [बाईल+भुलणें] **०माणूस**–न १ बायकोमाणूस, स्त्री २ भार्यासक्त किंवा रंडीबाज मनुष्य ३ षंढ, नपुंसक **०माऱ्या**–वि १ बायकोचा जीव घेणारा २ बाईलखाऊया अर्थ २ पहा [बाईल+मारणें] **०वेड**–न बायकोचें वेड, कामुकता, उत्कट कामवासना [बाईल+वेड] **०वेडा**–वि स्त्रीलंपट, विषयवासनेनें भुलून गेलेला, रंडीबाज [बाईल+वेडा] **बायला–ल्या**–वि बाइक्या पहा

**बाईस**—स्त्री कारण [अर बायस]

**बाउला–ली–लें**—पु पुतळा, बाहुला–ली–लें 'कां तृणाचा बाउला।' –ज्ञा १८ ४३८ [प्रा बाउल्ल]

**बाऊ**—पु भीतिदायक वस्तु, लहान मुलांना ज्याची भीति वाटते अशी कोणतीहि वस्तु प्राणी इ० उदा० साप, विंचु किडा, भूत, वागुलबोवा वाघ जनाव इ० 'रडतो बाळें म्हणती बाऊ। हा मुखमीरूक बाधिजया।' –भारा बाल ९ ७३ [बाबा] (बाल) **०करणें करून ठेवणें–सांगणें–दाखविणें**–क्षुद्र गोष्टीला नसतें महत्त्व देऊन भीति दाखविणें भयप्रदर्शनार्थ हलकी गोष्ट फुगवून सांगणें **०दाखविणें**–भीति दाखविणें, भिवविणें, सक्तीची भीति घालणें **०वाटणें**–भीति वाटणें 'ज्या लोकमताचा पुष्कळांस बाऊ वाटतो '–आगर

**बाऊट**—स्त्री (कु) वृक्षाची छाया, झाडाची छाया, आश्रय

**बाऊड**—पु १ (खो) रानमाजर, अरण्यमार्जार २ बाऊ पहा

**बाऊल**—न बाहु, बाहुला, बाहुटा, बाहुला [स बाहु]

**वाऊळ**—स्त्री १ (राजा) डोंगरावर, सडकावर वरीच माती असलेली सखल व पसरट व एक भातपिकाची जमीन. हिची भाजावळ करावी लागत, व बोळ, खारी २—न (कु) नदीकाठची माती पाळ भरण्याची भरईची जमीन, मळई

**वाएस**—स्त्री (राजा चि) बायको, पत्नी [वाईफ]

**वाक वांक**—पु १ (हिं) वक्रता, वळण, बांकण, वाक २ डोंगरावरील वळणें असलेला रस्ता ३ (ल) भांडण, मनांतील तेढ, विषाद, वकनाव 'त्याचा व आमचा अलीकडे वाक पडला आहे' ४ एक प्रकारचा मंजीर [स वक्र, हिं वांक] ॰दार–वि १ वाक, वाकडेपणा असलेला, तिरकस, वांकलेला २ (ल) वकनाव असलेला, वांकडें असलेला ॰दारी–स्त्री १ तिरकसपणा, वांकडेपणा २ (ल) वकनावाची स्थिति, भांडण, वांकडें

**वाक**—पुन व्यायामाची लांबट व टेंगणी चौकी, व्यायामाचें साधन [स्वीडिश व जर्मन वाक, पोतु बँको]

**वाक**—न नदीच्या भाटीवर होणारें दाट व नाचें एक झाड

**वांकफांड**—न उलडीचें आडवें लाकड लांकूड [वक्रकांड]

**वॉकडे**—पु (गो) बात, थाप, गप्प

**वांकडा**—वि धाडसी, साहसी, वाका, दडेल, उरफाट्या काळजाचा भीति न बाळगणारा, दबला न जाणारा [वाका]

**वाकणें**—अकि १ वाकणें, वाक येणें, असणें, खाली झुकणें, ओणवें होणें, नमणें २ (ल) बेमुर्वतखोरपणानें वागणें, मित्रत्व सोडून असणें, वांकडें अगर वैमनस्य असणें (वाक्यांत ह्या क्रिया पदाला ऊन प्रत्यय लागून पुढें दुसरें क्रियापद येतें जसें—वाकून असणें-वागणें-वर्तणें-चालणें राखणें इ०) [हिं]

**वाकधुक**—स्त्री धाकधुक, छातींत धडधडणें, वागधुग [ध्व]

**वाकर**—न (व) खाज, करंज्यांत घालावयाचें पुरण ॰वडी-स्त्री एक खाद्यपदार्थ, पक्वान्न, करंजी

**वाकर-रा-रां**—वि (चि वों) जरा, थोडें, थोडावळ

**वाकरु**—पु (महानु) विनोद 'तुजसी करा वाकरु।' –धवळे उत्तरार्ध १०

**वाकस**—स्त्री चिपाड, चोइटी, चोथा 'रस चोखून घेईंजे। वाकस थुकोनि साडिजे।' –एरुक्मि १४ १२८ –वि निःसत्व, रसहीन, बचव, कमजोर, निकस, गुणहीन 'उसामध्यें घेइजे रस। येर तें साडिजे वाकस।' –दा ६ ३ ९ [वेक्स]

**वाकस**—स्त्री (कों) काडयांची पेटी [इ बॉक्स]

**वाका**—पु कर्णा नावाचें वाद्य काहला (क्रि॰ वाजविणें) [स वक्र] ॰ईत, वाकेकरी–पुस्त्री कर्णा वाजविणारा (हा दक्खनात शिवा राजा अथवा मोठ्या माणसाजवळ असतो) वाकी–स्त्री लहान कर्णा

**वाका-कां**—वि १ धाडसी, शूर, धीट, पराईत (मनुष्य) 'वाका शिपाई' २ आणीबाणीचा प्रसंग 'प्रसंग वाका खरा पण तो टाळला पाहिजे' ३ बळकट, असाध्य, अवघड 'अवघड गड वाका किल्ला।' –ऐपो १५० [सं वाक=आपत्ति]

**वाकावाकी**—स्त्री भांडण, तंटा, बोलाचाल

**वाकाळी-ळ**—स्त्री एक रानटी फुलझाड, धवाळ

**वाकी**—स्त्री १ शेष, शिल्लक २ उरलेली रक्कम, शिल्लक राहिलेली रक्कम, शिल्लक भाग –वि राहिलेला, उरलेला, आणखी [अर बाकी] ॰ओढणें–१ कर्जाची रक्कम, देणें असलेली रक्कम मागील वहीवरून चालू वहीवर घेणें २ (व) अडखळत बोलणें ॰ठेवणें–मर्यादेंत असणें, ताब्यांत राखणें ॰न ठेवणें–१ भीड मुर्वत न ठेवणें, मर्यादा न राखणें, सर्व कांहीं करून चुकणें २ फडशा फडणें ॰थकणें–लोकांकडचें येणें तुंबणें ॰पूज्य करणें–देणें असलेली सर्व रक्कम फेडणें, देणें-घेणें पुरें करणें ॰चा–वि शिल्लक राहिलेला, उरलेला ॰दार–वि ज्याकडे बाकी येणें आहे असा (कूळ, रयत) ॰साकी–स्त्री शिल्लक (रक्कम)

**वाकुटणें**—अकि (राजा) कोमेजणें, वाळणें, सुकणें, टवटवी नाहींशी होणें [वाळकुटणें?]

**वाकू**—पु (गो) तावडा बगळा [स बक]

**वाकू(को)स**—वि निःसत्व, नीरस, बचव, वाकस

**वाकेराव**—वि (गु) लढाईखोर, फाकडा, डौलानें वागणारा, चालणारा [वाका]

**वॉक्स**—पु (इ) नाटकगृहांत सर्व कुटुंबाकरितां किंवा मित्र मंडळीकरितां प्रेक्षकांच्या जागेंत मुद्दाम केलेली जागा [इ]

**वाखर**—पु १ पुरण, सारण (करंज्या-सांटोऱ्या घालण्याचें, खोबरें, खसखस गूळ किंवा साखर इ०चें बनविलेलें) वाखर पहा 'वाखराचें वाण। साङ्ग हें ज्वू जवण।' –तुगा ८०५ २ (व) पाटवडींत भरण्याचा मसाला, मक्याचे दाणे किसून केलेली उसळ किंवा कोहाळ्याच्या मोठ्या फोडींची मसालेदार भाजी ॰वडा–पु (व) हरभऱ्याच्या पिठाचा वाखर घालून तळलेला वडा

**वॉखरणी**—स्त्री (गो) एक शेतांतील काम [वखरणी?]

**वाखल्ल, वाखलें**—न (गो) अडगळ ठेवण्यासाठीं भिंतींत किंवा भिंतीखालीं ठेवलेली पोकळ जागा, वळद, भवार

**वाखळा**—पु (व) जाडचें सामान

**वाग**—न (कों व) वांक वळण, वक्रता, लवण 'फडा पुच्छ वाकुडा वाग।' –एभा १२ ३८३ [स वक्र] ॰ट–वि किंचित् वक्र ॰णें–अकि १ (कों) वाकणें, लवणें, झुकणें, वाकडेंतिकडें होणें २ (ल.) शरण येणें, हार जाणें ॰वचें–अकि (गो) वाकणें

**वाग, वागदोर**—पुस्त्री वाग्दोर, लगाम, कासरा [हिं

बाग—पुस्त्री १ बगीचा, उद्यान, उपवन -२ -न (गो.) माडांचें भाट, नारळीचें आगर ३ पुणें-मडईंतील गाळेवाले दरसाल एक जेवण फाळापर्यंतें करतात तें. [फा. बाग़्] ॰पाडणें-(वो) बागेतील सर्व नारळींवरील नारळ काढणें ॰बगी(गि)चा-पु पुरवाग, मळा, आगर [फा बाग़्] ॰वान्-वाला-पु १ बागाईत करणारा माळी, बागेचें काम करणारा २ फुलें, फळें, भाजी इ० तयार करून व विकून त्यावर आपला निर्वाह करणारी जात [फा ] ॰शाई-स्त्री घराभोंवतीं केलेली ल्हानशी बाग [बाग+शाई] बागाइतदार-पु अव. बागांची लागवड करणारे, बागांचे हक्कदार मालक बागाइती-वि १ फळझाडें व भाजी पाला यांची लागवड केलेली किंवा लागवडीस योग्य असलेली (जमीन, शेत) याच्या उलट जिराईती २ सभोंवार पुष्कळ बागाईतजमीन असलेला (गाव) ३ बागाईत जमिनीवर काढलेलें (पीक) ४ बागेच्या जमिनीसंबंधीं बागाई(य)त-स्त्रीन विहिरीच्या अगर पाटाच्या पाण्यावर केलेली फुलझाडांची, फळ झाडांची किंवा भाजीपाल्याची लागवड, पाटस्थळ, बागेची जमीन, लागवडीस योग्य असलेली जमीन, बागेंतील उत्पन्न 'भायतें आहे पाटस्थळ। जागा वहीत केवळ। बागाइताचा अम्मल। कोण्ही कद जाणेना।' -मन्त्र ४०२ [फा बाघात्, बाग़्चें अव]

बांग—स्त्री १ कोंबड्याचें आरवणें (विशेषत सकाळचें) २ गुराख्यांचा एक खेळ ३ (मुसलमानी) प्रार्थनेला बोलावण्यासाठीं करावयाचा पुकारा, निमाजासाठीं केलेला पुकारा (क्रि० देणें) 'कोठें मशजीद (मशीद) आहे तेथें स्मरण करून बांग देतात व कोठें देवालय आहे तेथें घटा वाजवितात' -वाड-सनदा १५० [फा बाग़्] ॰सलवात-पु (मुसलमानी) प्रार्थनेला बोलाविण्यासाठीं मुअझ्झिन् मशिदींतुन जो पुकारा करितो तो

बागई—वि ल्हान-मोठें 'तर्फ नादगाव मरूड येथील बागई घरटिपेची पाहाणी' -वाडबावा १ २०५.

बागट—न तल्वारीला तुच्छतादर्शक शब्द

बागड—नपु (व) मिसळण

बागडखार—पु. काच वितळविण्यासाठीं किंवा बागड्या करावयास उपयोगी पडणारा खार [बागडी+खार]

बागडणें—अक्रि आनंदानें नाचणें उड्या मारणें, खेळणें (कुत्री-मांजरीचीं पिलें, कोंकरें इ० नीं) बागडा-वि (काव्य) खळकर, नाचणारा, उड्या मारणारा 'वेडीं बागडीं भाविकें मागणें।' -मुसभा ७ १०

बागडा—पु समुद्रातील ल्हान व पाढरा मासा याच्या जाव बागडा व करटा बागडा अशा दोन जाती आहेत बांगडी पाग-न असले मासे पकडण्याचें जाळें

बागडिया—न गाणें, गीत 'दिंडी पताका मकरद। नाना बागडियांचे छद।' -ज्ञागा २२१ [बाग-वाघ]

बागडी—स्त्री चेष्टा, चाळे, क्रिया, खेळ, क्रीडा 'पाया पडती बेंगडी। हात वळती मुरकुडी। परवेपणा बागडी। नाचविजेल।' -ज्ञा १३ ५७०. -पु माकडाचे खेळ करणारा इसम, बहुरूपी [बागडणें]

बांगडी—स्त्री १ चुडा, कंकण, बायकांनीं हातात घालावयाचें काचेचें किंवा सोन्याचें वलय (क्रि० भरणें, घालणें) २ दोरीचें वटोळें किंवा कडोळें ३ (राजा) मळसूत्राचा पेंच, उसाच्या चरकातील नवरी ४ भिक्षेकऱ्याची एक जात किंवा त्यातील एक व्यक्ति ५ बैलगाडीच्या चाकाच्या तुब्याच्या दोन्ही तोंडांना वाहेरून बसविलेली लोखंडी मायणी ६ वटाट्यातील एक रोग, चक्र ७ उसाची एक जात ८ फोनोग्राफची तबकडी, प्लेट (बाप्र) ॰थंड होणें-(व) अत्यत शातता होणें (बायकांची निजानीज) ॰फुटणें-१ पति मरणें, वैधव्य येणें, (ल) माणसें मरणें (पति मेला असता स्त्रिया बांगड्या फोडतात त्यावरून.) 'नऊ लाख बांगडी फुटली' -पेशव्यांची बखर २ फजीती होणें, नक्षा उतरणें, हानि होणें बांगड्या भरणें-नामर्द होणें, पराक्रमशून्य होणें (दुसऱ्याचे बायकोस) बांगड्या भरणें-उसन्या वस्तूवर पैसा खर्च करणें, कांहींहि परत मिळणार नाहीं अशा ठिकाणीं पैसा वेंचणें, खर्च करणें ॰वाढणें-वाढवणें-(बायकी) बांगडी फुटणें (फुटणें हा शब्द अशुभ समजून त्याबद्दल वाढणें, वाढवणें हा योजितात) ॰मखर-न मध्यें एक व बाजूला चार मिळून पाच पाच बांगड्याची किनारी असणारें मखर [बांगडी+मखर] बांगड्या भरलेला चौक-बांगड्याचा ल्हानसा ओटा 'महाराणीसाहेब यांचें न्हाणें झाल्यावर स्वारी बांगड्या भरलेल्या चौकावर श्रीमहाराज सरकार याज समवेत बसते' -प्रऋतिकृत्यादर्श पृ ८ ॰प्रिंटिंग मशीन-न (मुद्रण) प्रिंटिंग मशीनचा एक प्रकार, अल्बियन हँडप्रेस ॰सिंगापुरी-स्त्री एक रेशमाची जात

बागडुली—स्त्री (गो) ल्हान बागडा मासा

बांगडो मारणें—(काशी) (यात्रेकरूंच्या बोलण्यात रूढ) टिचकणें, टिचकी मारणें

बागदार—स्त्री १ गुप्ती २ विळी [फा]

बागधारी—स्त्री घोड्याची चाल -अश्वप १ ११४

बागनेट—स्त्री बदुकीस खोंवावयाची सगीन [इं बेयोनेट]

बागंबरी—पु घोड्याचा एक रग -अश्वप १ २८

बागभूक—स्त्री भीतीचा दचका भागभूक पहा

बागर—पु (राजा) अड न बडविलेला बैल, रेडा, साड

बांगरषष्ठी—स्त्री चपाषष्ठी, मार्गशीर्ष शुद्ध षष्ठी [बांगर+षष्ठी]

बांगराळें—न बागडीला वर्तुळ आकार देणारा लाकडी ठोकळा [बागडी+आलय]

बागलकोटी—वि बागलकोट येथील (रुपया, नाणीं, वस्त्रें)

**वागा**—पु १ (प्रा) आकार, मार्ग, वृत्ति 'जाणिजे आचरितेनि वागें।' –माज्ञा १३ ७४४ २ सवय 'परि योधाचेन मेळें। पाणी उजू पण वाकुडें जालें। रवी दुर्जेण आलें। तोय वागें।' –माज्ञा १५ ३३८ [का वगे=रीत, मार्ग]

**वांगा**—स्त्री (नागपुरी) वांग, वाव, आग भासडणें, चमक निघणें

**वाँगो**—पु (गो) कळी, कमलिनीचा कंद, योंड

**वागी**—स्त्री वळण, वाक [वाग] ०वळ–न कप, कापरें 'माया आदरी मिरों। वागीवळ।' –माज्ञा १३ ७१७ ०व–वि वाकलेला, वाकडा ०वर्णे–सकि वाकविणें

**वागी**—वि बडखोर, स्वामिद्रोही, उपद्रवी, दरोडेखोर 'शहानवाज खान वागी होऊन दौलताबाद बळाऊन बसला आहे' –रा १ १५० [अर बाघी]

**वागु**—स्त्री वाग, मार्ग निघे ऐसा वायु। पडता का दवा।' –अमृ ७ ८० [का वगे=रीत, मार्ग]

**वागुरडा**—पु एक किडा, झुरळ

**वागुल**—न (व) रवय

**वागूल**—पु रानमाजर, बाऊल

**वागूल, वागूल बावा**—पु १ मुलाना भय दाखविण्या साठीं कल्पिलेला एक भयकर प्राणी, भीति वाटण्याकरिता उभा केलेला पुतळा, आणिलेलें सोंग 'कृष्णा राही रे उगला। नाहीं तरी सागेन त्या वागुला।' –भन ३३ २ (ल) पोकळ भीति 'जो तो या लोकमताच्या वागुलबोवाला भिऊन दडून बसेल तर कोणत्याही समाजाला उन्नतावस्था येणार नाही' –आगर ३ वागूल बागुल्या, ल्हान मुलाचें प्रेमानें ठेवलेलें टोपणनाव [स्लान्हानिक गेगु=दव वगु=भूत]

**वागेसरी वागेश्री, वागेश्वरी**—स्त्री १ एक राग यात षड्ज तीन ऋषभ, कोमल गाधार कोमल मध्यम, पचम, तीव्र धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात आरोहात पचम वर्ज्य, जाति षाडव–सपूर्ण वादी मध्यम, सवादी षड्ज ह्याच्या दुसऱ्या प्रकारात पचम स्वर अजिबात गाळतात, जाति षाडव–षाडव तिसऱ्या प्रकारात पचम स्वर आरोहात व अवरोहात घेतात जाति सपूर्ण–सपूर्ण ह्यापैकीं पहिला प्रकार विशेष रूढ आहे गान–समय मध्यरात्र २ सोनाराची शेगडी, काळम्मा 'मध्वनाथ म्हणे वागसरीपुढें। सोनें वरवें कुडें निवडतें।' –मध्व ४९८ [स व्याघ्रश्री] ०धारजणी असणें–(ल) विशेष परिश्रम किंवा बुद्धिमत्ता याशिवाय श्रीमत होणें

**वागोवणें वागोवें**—सकि (गो) वाकविणें [स नम्र]

**वाग्या**—वि (व) मूर्ख, लोकात इकडे सहज फसणारा, भित्रा [हिं भागना=पळणें]

**वाघेकरी**—वि (को) पूर्वापार काहीं हक्कावर नसून नवीन येऊन गावात राहिलेला, वतनदार नव्हे असा, उपरा

**वाघोडा**—पु मुलाचा एक खेळ

**वाच, वांच**—पु १ भयाची धडकी भीति, दरारा (क्रि० खाणें) 'प्रथम मी वरीन असें म्हणत होता, पण मग लागलाच वाच खाल्ला' २ आदरयुक्त भीति, दरारा (क्रि० खाणें, घेणें) [वाचकणें] ०कणी–स्त्री एकदम भीति घेणें, दचका, गोंधळात पडलेली स्थिति, बुचकळ्यात पडणें ०कणें–अकि घाबरणें, दचकणें, भीति, दरारा, तिरस्कार इ० चा परिणाम मनावर एकदम होणें, गोंधळात किंवा बुचकळ्यात पडणें, चकित होणें, विचकणें ०कावि(व)णें–सकि एकदम भीति दाखविणें, भिवविणें, भेदराविणें

**वाचकुटणें**—अकि १ नासणें, कुजणें, बिघडणें, आवणें (फळें, दूध, खाण्याचे पदार्थ इ०) २ कुपथ्यामुळें दुखण्याचा प्रकोप होणें, भडकणें नेत्ररोगामुळें डोळे किंवा एखाद्या विकारानें इतर अवयव अधिक दुखू लागणें

**वाचकें**—न १ (माण) रुद तोंडाचें भाडें, मडकें २ गाठोडें, बोचकें, ३ ल्हान पोतें, ल्हान गड्डा

**वाचट, वाचटणें**—वाचोट व वाचोटणें पहा

**वाचटणें**—अकि वाचकणें, एकदम भिणें, दचकणें

**वाच(स)टु**—पु १ (महानु) धक्का, २(ल) परिणाम नेला 'या बोलाचा वाचटु। न साहे उद्धवदेव सुभटु।' –भाए ७१

**वाचडा**—पु वासडा पहा

**वाचणूक, वाचणी**—स्त्री १ कज्जा, कलागत, वाचावाच २ बरळणें, भलतेंसलतें बोलणें, बडबड [स वाक् वच्=बोलणें]

**वाचणें**–अकि १ भाडणें, आरडाओरड करणें, तडणें, खडाजंगी करणें २ बरळणें, बावचळणें, असबद्ध बोलणें **वाचरट–ट, वाचारा**–वि बडबड्या, वाल्हा, पाल्हाळ लावणारा, बोलण्यात ताळतत्र नसलेला **वाचळणें, वाचलणें**–अकि १ देहभान विसरणें, गोंधळून जाणें, शुद्धि न राहणें २ निसवणें, स्वच्छंद आणि बहुतेकी होणें ३ हलेपित बरळणें अद्वातद्वा बोलणें [स वाचाल]

**वाचावाच, वाचादाची**–स्त्री जोराचें भाडण, हमरीतुमरी, वाग्युद्ध, उत्तरप्रत्युत्तर [वाचणें]

**वाँचो**—पु (गो) ओठाची कड, काठ

**वाँचावर्णी**—स्त्री (गो) शस्त्रानें टोंचणें [बोचणें]

**वाची**—स्त्री (वे) लाकूड तासण्याची तासणी, वावस

**वाचुकणी, वाचुकणें**—वाचकणी, वाचकणें पहा

**वाचुटणें, वाचाटणें**—वाचकुटणें पहा

**वाचो(चु)ट**—न १ कुपथ्य, अपथ्यकर खाणें २ कुपथ्याचा दुष्परिणाम, कुपथ्यानें वाढलेला विकार ३ (धुरामुळें) दृष्टीची मंदता

**बाचोट**—वि शिळापाका, बेचव, नीरस [ बासट ]

**बाच्छाई**—स्त्री बादशाही, सार्वभौमत्व 'शिव बाच्छाई तक्त येट ठेविली हट।' -ऐपो ४३५ [ फा बादशाही ]

**बाज**—स्त्री १ खाट, खाटलें, बाजलें २ (गो) पलंग [ स वट् ] **बाजट, बाजलें**–न लहान खाट ॰घट–न १ लहान खाट २ बाजेची दोरी. –पु ३ ( वों ) चौरंग

**बाज**—पु भय, भीति, दरारा, वचक ( क्रि॰ खाणें ) 'बड मनुष्यें आणील बाजा (बाटा)। मार देतील टाकून बाजा(भीति)। दक्षिण दर्शी मरेल राजा। क्षेत्रभंग होईल।' -अफला २४

**बाज**—पु बहिरीससाणा, श्येन पक्षी [ फा बाज़् ]

**बाज**—पु पीक ( विशेषत फळें व फुलें यांचें ), बहार, बहर, वार [ वे स वाजयति ] म्ह॰ कडव्या झाडास बहु बाज **बाजणें**–अकि बहार, पीक येणें, फळें धरणें, फुलणें ॰दार–वि भरपूर पिकणारें, बहारदार, खूप फळणारें ( झाड, पीक )

**बाज**—न ( नाविक-हट ) तीन त पाच पर्यंत शिडें असणारें गलबत.

**बाज**—न तंतुवाद्यातील मुख्य तार या तारेवर डाव्या हाताची बोटें टेवून वाद्य वाजवितात [ स वद्–वादन ]

**बाज**—कर्तृत्व दाखविणारा प्रत्यय, करणारा हा हिंदी व फारसी शब्दांना लागतो उदा॰ दारू-दुरें-अक्कड-दगल-बाज [ फा बाज़्=खेळाडू ]

**बाज**—क्रिवि उलट, उलट पक्षीं 'बाज गुन्हाई माझें वतन घेऊन' –रा १५१६ [ फा बाज़् ]

**बाज**—क्रिवि नंतर 'बाज बरसात याचें पारिपत्य करू' -होके १२ [ अर बाद ]

**बाजकें**—न लहान गाठोडेवजा बांधून, बंद करून पाठवयाचा किंवा आलेला माल याचें अर्धे ३ पहा [ हिं ]

**बाजगीर**—पु कर वसूल करणारा [ फा. ? ]

**बाजत बाज(जि)द्**—क्रिवि १ शिवाय, आगली 'मी एक पोसा देईन बाजत कांहीं देणार नाहीं' २ नंतर पुढें 'बाजत बरसात ममन्त मनदास आईल' -मराचियोशा ६८ ३ पर्यंत सलाम लिहिल्यानंतर हा शब्द लिहितात उदा॰ 'सलाम बाजत सलाम'=अनेक नमस्कार [ फा ]

**बाजदादन**—वि परत पत्नीसंबंधी 'प्रत मजकूरचे हिस्सी व जदादन याचें लिहून दणें' -पाठ-दुसर बाजीराव ५ ३१४ [ फा ]

**बा-जमियत**—वि सैन्य 'गुलाम बा-जमियत हजर होत' -रा ५ ११२ [ फा ]

**बाजरघाटा**—पु अपुरें पीक काढण्यापूर्वी ज्या जमिनींत बाजरीचें पीक घटल्या ती जमीन [ बाजरी+घाटी ]

**बाजरा-री**—पुस्त्री बाजरीच्या मोठया दाण्यास बाजरा व लहान दाण्यास बाजरी म्हणतात, एक खाद्य धान्य, सजगुरा [ हिं ]

**बाजवट**—पु बाजूबंद नावाचा दागिना [ बाज=बाजू+वत् ]

**बाजा**—पु १ वाद्यें वाजविणें, सुरसनई, समेळ इ॰ वाद्यांचें एकदम वादन किंवा गजर २ बॅंडबाजा ( क्रि॰ करणें, होणें, रडणें, ओरड करणें ) [ हिं, सं वाद्य ] ॰करणें–(ल) बोंब मारणें, ओरडणें

**बाजांगूळ**—स्त्रीन ( वों ) बाड्गूळ पहा

**बाजार**—पु १ मंडई, हाट, पण्यवीथिका, दुकानें मांडून क्रयविक्रय जेथें चालतो तो, पेठ, गंज ( बाजार, हाट व गंज यांच्या अर्थांत थोडा भेद आहे बाजार म्हणजे रोज किंवा आठवड्यानें किंवा नियमित वारीं भरणारा हाट म्हणजे फक्त नियमित वेळींच भरणारा बाजार व गंज म्हणजे बाजारपेठ. २ खरेदीविक्री, क्रय विक्रयाकरिता जमलेला समुदाय ३ (ल) प्रसिद्धि, बोभाटा, बभ्रा, गवगवा ४ (ल) गोंधळ, पसारा, अव्यवस्था, अव्यवस्थित कुटुंब किंवा घर ५ (ल कु ) मासळी [ फा बाज़ार ] म्ह॰ बाजारात तुरी भट भटणीला मारी (बाप्र) ॰करणें–पाहिजे असलेली वस्तु बाजारात जाऊन विकत आणणें, घेणें ॰मांडणें–अनेक पदार्थ इतस्तत अव्यवस्थितपणें पसरणें ॰भरविणें–अनेक माणसें–ज्यांचा काहीं उपयोग नाहीं परंतु घोटाळा मात्र होतो अशीं–एके ठिकाणीं गोळा करणें ॰भरणें–(ल.) कलकलाट करणें, गोंधळ माजविणें, पसारा पसरणें **गेला बाजार तरी**–किमानपक्षीं, निदान, कमीतकमी, बाजार होऊन गेल्यावर विकला तरी 'गेला बाजार तरी त्या पागोट्याचे पाच रुपये मिळतील' **बाजारच्या भाकरी भाजणें**–नसत्या उठाठेवी करणें, लुडबुड करणें, विनाकारण मध्येंच तोंड घालणें **(घडयांचा) बाजार पिटणें**–सर्वत्र [illegible] करणें, सर्वच मूर्ख माणसें जमणें, टमरग राज्य होणें **बाजारांत पाच पायलींनें (विकणें मिळणें)**–अत्यंत स्वस्त दरानें, मंदी भाल्यानें (नकाराथी योजना) **उभ्या बाजारांत** भर बाजारात, सर्वांसमक्ष ( जाहीर करणें, सांगणें ) सामासिक शब्द– ॰अफवा–अवाई–गप्प–वातमी का निराधार बातमी, कंडी, निराधार वार्ता, चिल्मी गप्प [ फा बाजार+अर अफवा, अवाई, गप्प ] ॰करी–वि बाजारात विकणारा किंवा विकत घेणारा ( मनुष्य ), दुकानदार किंवा गिऱ्हाईक [ बाजार+करी ] ॰दार–वि (नाग) [illegible] [ फा ] ॰चलन चलनी–वि बाजारात चालू असलेले, चालणारें (नाणें) ॰निरख–पु १ बाजारभाव बाजारातील दर –वि भाव [illegible] 'बाजारनिरख भाव' –क्रिवि प्रसिद्धपणें, सर्व लोकांत, उघडपणें करून [illegible] ( [illegible] ) ( क्रि॰ करणें ) '[illegible]' ॰पट्टा–पु (गुराचा बाजार) [illegible] १३

भाणेप्रमाणें वापलेली रक्कम ०फरकी-र्गी-र्की बाजारांत विक्री साठीं देणाऱ्या मालावरील सरकारी पट्टी (पसाभर धान्य घेणें) ०भट्टा-पु प्रमाण मानलेल्या माण्याशीं बाजारांतील इतर नाण्यांचे दर, प्रमाण ०बसका-पु बाजारांतील दुकानांवरील कर -बाडमा ९७० ०बसर्या-बसणी-बुणगी-बुंदगी, बाजारचीराट, बाजारीण-वि वेश्या, कसबीण [फा बाजार+मं उपवरानी] ०बस्थ्या-वि (ल) निर्लज्ज, अडाणी व दारुण, शिवराळ व भांडखोर, अगम्य ०बुणगें-न १ फौजेबरोबर असणारी अवांतर माणसें, फौजेबरोबर असणार दुकानदार इ० गैरलढाऊ लोक, कार खाना २ कामाशिवाय जमलेला मनुष्यसमुदाय ३ (ल) फट कुऱ्यांचा अगर विघोटर्यांचा तट्टा, बलवार, निपटारा, सामुग्री [फा बाजार बुन्गाह्] ०बैटक-स्त्री बाजारांतील किंवा यात्रेतील दुकाना वरील कर ०भरणा-भरती-पुस्त्री १ बाजारांत पक्त ठेवण्याच्या किंमतीची परंतु मोलहीन, कुचकामाची वस्तू, लोगीरभरती २ (ल) नीच व निरुपयोगी मनुष्य ०भाव-पु बाजारांत चालु असलेला दर, बाजारनिरख ०महशूर-वि बाजारांत लहानापासुन थोरापर्यंत सर्वांना माहीत असलेला, गाजावाजा झालेला, प्रसिद्ध ०वाडा-पु १ बाजार भरण्याची जागा, मंडई २ (ल) अव्य वस्थित कुटुंब किंवा घर ०शिरस्ता-पु बाजारांतील सामान्य वहिवाट, चाल, (रिवाज दर इ० चा) [बाझार+फा सरिश्तह्] ०हाट-स्त्री बाजारपेठ, बाजारखरेदी बाजारी-वि १ बाजारा संबंधीं, बाजारचा, पेठेंतील २ ऐकीव 'कागदी पत्रींचें वर्तमान नव्हे बाजारी आहे' -ख ८ ३९७६ ३ (ल) नीच, हलकट, असभावित, लुच्चा ४ सामान्य, साधारण, भिकार, वाईट (वस्तु)

बाजिंदा—वि १ खळाळ, लुच्चा; हट्टी, खोडकर 'रडे एकचि हा हरि मोठा बाजिंदा।' -निर्गुणाचा पाळणा २ धूर्त, निष्णात, निपुण, फसवणूक करणारा (निंदार्थी) फाडा, बहादर, जहांबाज, फाविंदा ३ बजवय्या [फा बाझन्दा]

बाजी—स्त्री १ पत्ते, गंजिफा, सोंगट्या यांचा खेळ, क्रीडा, २ (ल) सरशी, बाणा, बाजू, डाव 'एकवेळ बाजी बिघडली म्हणून पराक्रमी पुरुष स्वस्थ बसत नाहींत' -ख ११ ६१०० ३ (पत्त्याचा खेळ) रंग, बाजू ४ हात किंवा वाटलेले पत्ते, जिंकलेला डाव ५ खेळाची समाप्ति ६ (ल) ममत्व. 'यासाठीं अवघ्यांनीं साहित्य पुरवून बाजी सेवटास न्यावी' -पेद ५ २४ ७ (ल) बाणा ८ घोड्याची एक चाल (क्रि० धरणें चालणें, येणें, जाणें, उभारणें) ९ (ल) सवय, व्यसन अशा अर्थी शब्दाला जोडून उपयोग उदा० दारू-सट्टे-बाजी इ० [फा बाझी] ०अंगावर येणें-देणें-घालणें, हटविणें ०कार-वि कर्ता, उत्पा दक 'सर्वांचे सम्मत या करण्याचे बाजीकार रघुनाथ विठ्ठल' -रा ७ ३९ [फा]

बाजी—पु १ एक नांव २ (कु) धनगरास मारावयाची हाक

बाजीग(गा)र—पु गारुडी, जादुगार -वि ठकवणारा 'माहीत बाजीगार होऊन ..' -मं ३५७०. [फा बाझीगर्]

बाजी(जे)गरी-गारी-गिरी-स्त्री १ गारुडीविद्या, चेटूक मंत्र तंत्र, नजरबंदी, हातचलाखी, इंद्रजाल 'माया मिथ्या बाजीगरी। दिसे साचाचिये परी।' -दा ६ ८ २४ २ पत्ते, सोंगट्या खेळणें, द्यूत, जुगार -वि १ रिकामा, कुचकामी, निकस, वाईट (वस्तु, पदार्थ) २ (ल) निरर्थक, पोकळ, मूर्खपणाचें (भाषण, वागणूक, उद्योग), वरकरणी, ढोंगी, बेजबाबदार (माणूस) [फा बाझीगरी]

बाजीद—वि लाचार, दीन बजिद अर्थ ३ पहा 'बाजीद होऊन ..' -बाड्याछ १ ८४

बाजीराई-रावी—स्त्री दुसऱ्या बाजीराव पशव्याप्रमाणें थाटमाट आणि विलास ०धोतरजोडा-पु हातहात रुंद रेशीम काठी धोतरजोडा बाजीरावनाना-पु (व्यं) श्रीमंत मनुष्य बाजीरावाचा नातू-पु १(थोरले बाजीराव पेशव्याचे नातू दुसरे बाजीराव यांना आयतें राज्य मिळालें असतां त्यांनीं तें घालविलें यावरून) श्रीमंत परंतु मूर्ख व मिजासखोर माणूस बाजीरावाचा बेटा-पु (ल श्रीमंत नानासाहेब पेशवे यांच्या नांवावरून) गर्भश्रीमंत

बाजु(जू)बंद—पु. १ दंडाला बांधण्याचा स्त्रियांचा दागिना बाजूबंद जोडी हातसर।' -तुगा २९६९ २ (फुलमाळी) दंडाला बांधण्यासाठीं केलेली फुलांची माळ [स बाहु=बाजु+बंध]

बाजू—स्त्री १ बाहु भुज २ भाग, पैलू (वस्तूचा) कड काठ किनारी, मर्यादा 'त्रिशेन चौकोन इ० कांच्या बाजू' ३ एखाद्या पदार्थाचा कोणत्याहि एखाद्या विभागाच्या विरुद्ध अस लेला भाग ४ (ल) पक्ष, फळी, कड, तर्फ चढाओढीच्या सामन्यांतील एक पक्ष (क्रि० राखणें, सामाळणें) ५ मोठी सत रंजी, जाजम (पूर्वी खोलीच्या एका बाजूला पुरेल अशा सतरंजीला म्हणत) ६ मदतनीस, साहाय्यकर्ता, आश्रयदाता, सहाय्यक 'यशवंतराव बाजू साग ज्या मर्दाला।' -ऐपो ७९ ७ (पत्त्याचा खेळ) खेळांतील रंग, हात, गंजिफांतील एका रंगाचीं १२ पानें; बाजी ८ गाडीच्या साटीचीं लांबीच्या बाजूला असलेलीं दोन लाकडें त्यांच्या उलट करोलें=सांटींतील रुंदीचीं लाकडें ९ सकट अडचण विघ्न पेंच [स बाहु, फा बाजु] ०मारणें-आपल्या पक्षाची सरशी करणें, स्वीकृत पण यशस्वी करणें ०राखणें-अब्रू सभाळणें, नांव राखणें, फजिती किंवा दुर्लौकिक न होऊं देणें ०राहणें-अब्रू किंवा नाव राहणें ०वर बसणें-अंगावर येणें-फजिती होण्याची वेळ येणें पराभव होण्याचा रंग दिसणें ०चा देखावा-पु (इमारत) पार्श्वनिदर्शन ०मार णारा-मारून नेणारा-वि घेतलेला पक्ष यशस्वी करणारा, आपला पक्ष सिद्धीस नेणारा ०स-क्रिवि एकीकडे

**बाजे**—वि काही, अवांतर, इतर, परक्या, किरकोळ 'बाजे मराठे कृष्णराव यास कलमी केले' –रा १० १६७ [फा बअझि] ०**खर्च**–पु मुख्य हिशोबाबाहेरील खर्च, किरकोळ खर्च; वरकड खर्च ०**लोक**–पुअव लष्करातील बिन लढाऊ लोक, सटर फटर लोक [हिं] ०**वतनदार**–पु जोशी, उपाध्या, जंगम, सेटया, पोतदार, काजी, मुलाणा, पाटील, मुजावर, कुंभार, सुतार, कासार, न्हावी, तेली, महार, चांभार, मांग, परीट, मेहतर इ० वतनदार –मसाप २ १३८

**बाजोट**—न (ना) पलंग हा नवारीनें विणलेला किंवा रिफाचा असतो. [बाज]

**बाजोड**—पु (व) ढेंकूण, खटमल [बाज]

**बाझ**—पु (कों) पीक (फळें किंवा फुलें यांचें), बहर [स वृध्-वर्ध् बाज] ०**णें**–अक्रि (कों) फळें, फुलें धरणें, लाग बहर येणें, वाजणें ०**घट**–वि (कों) ज्यास पुष्कळ लाग येतो असें, पुष्कळ फळें, फुलें देणारें, (झाड)

**बाट**—पु १ अपवित्रपणा, विटाळ, बाटणूक, स्वजातींत वावरण्याची अयोग्यता (बाटण्यामुळें) (क्रि० पडणें, असणें) २ डाग, कलंक, दोष, ठपका, दोष देण्याचा प्रसंग, वेळ (क्रि० ठेवणें, पडणें, असणें, लागणें) –वि. १ लबाड, लुच्चा, लबाडींत व हलकटपणांत हुशार, धूर्त 'बलीसेंच पोर बाट मोठें। थोरपण असुन बह्याड खोटें।' –भज १०५ २ बाटगा, माडगा, दांडगा, उच्छृंखल, तगेंच कडक, तल्लख, शिरजोर, आवरण्यास कठीण (मनुष्य घोडा, बैल इ०) [स भ्रष्ट, हिं] ०**गा**-**बाडगा**–वि १ बाटलेला, भ्रष्ट, पतित, आचारविचारशून्य, स्वजातींत वावरण्यास अपवित्र, अयोग्य २ (हलकटपणाच्या व नीचपणाच्या कामांत) हुशार, धूर्त, कुशल, चलाख ०**गेला**, **बाटगेला**–वि बाटगा पहा ०**गी**–वि १ बाटलेली २ व्यभिचारिणी ०**णूक**, **बाटणी**–स्त्री भ्रष्टता, भ्रष्ट होण्याची किंवा केला गेल्याची क्रिया, विटाळ [बाटणें] ०**नाट**–पु विटाळ, बाटगेपणा, भ्रष्टता (व्यापक) (क्रि० पडणें, होणें, असणें) [बाट+नाट] ०**वडा**, **बाटोडा**–पु बाटाबाट सर्वत्र भ्रष्टाकार, जिकडेतिकडे झालेली भ्रष्टता, (सामा) बाटणूक **बाटाबाट**–स्त्री बाटवडा पहा पवित्र व अपवित्र यामध्यें भेद न पाळल्यानें किंवा व्यभिचारामुळें झालेला भ्रष्टाकार **बाटीव**, **बाटचा**–वि बाटलेला, भ्रष्ट झालेला, धर्मभ्रष्ट **बाटणें**–अक्रि. धर्मभ्रष्ट होणें (दुसऱ्या जातीशीं अगर धर्माच्या मनुष्याशीं वैषयिक संभोग, अन्नव्यवहार किंवा निषिद्ध पदार्थ सेवन यामुळें) स्वजातीशीं व्यवहार करण्यास अपवित्र व अयोग्य असणें, (एखादी वस्तु) उपयोगास अयोग्य किंवा अपवित्र होणें **बाटविणें**–सक्रि विधिपूर्वक धर्मभ्रष्ट करणें, दुसऱ्या धर्मांत नेणें, अमंगलता आणणें, भ्रष्ट करणें (वस्तु किंवा मनुष्य), (गो) बाटींचें

**बाट**—न मोतीं तोलण्याचें वजन व त्याचा समूह जसें–१ आणा=१ तांदूळ वजनाइतका ४ आणे=पावरती, १६ आणे=१ रती, २४ रती=१ टांक, १ टांक=२२ क्यारेट इ० वजनाचा गट –जनि (पारसि शब्द) ९

**बाट**—पु (कों) एक जातीचा मासा

**बाट**—पु गज, सच (वस्तूचा) –के ११ १० ३५

**बाटली**—स्त्री कांचेची शिसी, कुप्पी [इं बॉटल]

**बाटी**—स्त्री (महानु) निर्माल्य झालेली माळ 'जि तुझिये मुकुटीचिया बाटी।' –ऋ १५७ [बासर=शिळें ?]

**बाटी**—स्त्री (माळवी) मैदा, दूध, मीठ तूप यांचें मिश्रण करून त्याची (गोवरीच्या) विस्तवावर भाजलेली आहारोटी, गाखर.

**बाटु(टु)क**—न जोंधळयाचें कणीस निसवण्यापूर्वीचें ओलें ताट, चिपाड, ओला कडबा 'चारितो सरस बाटुक यातें।' –विगवि २१ –वि (व) आखूड, तुटकें 'बाटुकनाक्या' [तुटकें]

**बाटुक**—पु (व) खाऊ

**बाटयोंचें**, **बाटयोंचें**—सक्रि (वो) (पदार्थांवर) बुरा येणें, केणशी येणें [बाटणें]

**बाठ**, **बाटी**, **बाठी**, **बांठी**—स्त्री आंब्यातील कोय (आंतील बीजासहित कवच) [हिं]

**बाठ**—स्त्री (कों) आंब्यातील कोयीचें नुसतें कवच **बाठळ**, **बाट(ठा, ठ्या)ळ**–वि बाठ झालेला, कोय पक्की झालेला (आंबा). **बाठळणें**, **बाठाळणें**–अक्रि आंब्यात बाठ पूर्ण तयार होणें, आंबा पक्का होणें

**बाठ**—स्त्री (नाविक) रांजण, मोठें मडकें [का ओट्टे]

**बां(बा)ठा**—पु १ (कों) आंब्यातील कोय (कवच बीजासह) २ (ल) आघातामुळें शरीरास आलेलें टेंगूळ ३ जटा, गांठ, केंसाचा किंवा तंतूचा झालेला गुंताडा, काथ्याकरितां कुजत घातलेल्या चोडांत राहिलेला कठिण भाग –वि धट्टाकट्टा, दांडगा, मजबूत दृढ, निढावलेला [का ओट्टे] म्ह० साठा आणि बाठा

**बाठा**—पु (जुन्नरी) खेंकडा (नर)

**बाठूक**—न (कों) आंब्याच्या बाठीसारखें वळकट, जोरदार व टेंगणें माणूस किंवा जनावर, बळकट, कसलेलें शरीर [बाठा]

**बाड**—न टांचणाची वही, साग्रंथ, निरनिराळ्या शास्त्रीय (वैद्यक, ज्योतिष इ०) ग्रंथांतील निवडक भागाचें किंवा उध्दृत केलेल्या वेंच्याचें पुस्तक सत्रैसग्रह [स बाढ=मोठें]

**बाड**—स्त्री कड किंवा धार (शस्त्राची किंवा हत्याराची), (मूळची धार असल्यास क्रि० देणें, चिरणें इ० व पुन्हा धार तीक्ष्ण करणें अशा अर्थी क्रि० लावणें असें योजतात) –स्त्रीन १ (ल) कड, हद्द, तंबूभोंवतालचें आवरण (डार, निवडुंग इ० चें किंवा कनातीचें), तंबूची कनात, पडदा तंबू (क्रि० चिरणें) (सामान्यत)

कुंपण (क्रि० घालणें) २ शिपायाची रांग ०मारथ-(गो) थापा देणें

बाड—स्त्रीपुन (ल) एखादें धाडसी कृत्य करण्याकरितां खोटया आश्वासनानीं एखाद्याला उत्तेजन देणें, चेतविणें, अशा तऱ्हेचें उत्तेजन किंवा प्रोत्साहन (क्रि० देणें) —न १ तरवार इ०चें म्यान, २ थाप, गप्प, निरर्थक गोष्टी, चकाट्या, थापा (—अव बाडा) (क्रि० मारणें, झोंकणें, हाणणें, हाणणें, फेकणें, सांगणें)

बाड—(व) (कापूस वटण्याचे जिनिंग मशीन येण्यापूर्वी अशा जागीं पूर्वी हातरीवर कापूस वटीत असत परंतु हल्ली गुरें बांध तात यावरून) मखळ, आवार, मोकळी जागा, गोठा, कापसाचें भारें दाबण्याची जागा —स्त्री (गो) स्थावर संपत्ति

बाड—वि धूर्त, लबाड [अर बयाझ् हिं बाड] बाड असणें-(व) गाडीचें चाक चाकोरीच्या बाहेर असणें

बांड—वि १ रोगामुळें खंवट व खुरटलेलें (पीक किंवा बारीक झालेलें धान्य, डाळ वगैरे) २ बळकट, तेजस्वी, धाकट्या, जवान 'राज्यव्यवस्थेतील मोठ्या जागा विलायतेंतील तरुण बाडास मिळतात' —टि १ ३१९ (मनुष्य) (याच्या मागें कधीं तरणा शब्द येतो किंवा येत नाहीं) ३ जाडेंभरडें वस्त्र किंवा कापड ४ (प्राय) बड, बडखोर, बडया [का उडिग उडिगी उडगी=रिकामा, निरुपयोगी]

बांड—पु १ सुती व हलक्या किंमतीचें लुगडें, सुताडा, उणाख लुगडें (किनार सुती असलेलें) २ कांदा, नागदवण इ० झाडास येणाऱ्या तुऱ्याचा दांडा, पोगाडा (फुलाचा किंवा झाडाचा) ३ बादुक, कणसावाचुन असलेलें जोंधळ्याचें ताट, ज्यावर रोगामुळें कणीस आलें नाहीं किंवा ज्याचें कणीस गुरानीं खाल्लें आहे किंवा कापलें आहे असें जोंधळ्याचें अगर बाजरीचें ताट ४ जळाऊ लाकडाचे धाटोळे तुकडे, न फोडलेले लाकडी ओंडके ५ —स्त्रीन धान्य न होता केवळ कडबाच होणारी जमीन, ज्यातील पीक खराब झालें आहे किंवा गुरानीं खाल्लें आहे असें शेत, पीक ६ वांग्याची एक जात [हिं]

*बॉड—(गो) कपाळ ०भद्रु—न मस्तकरण*

बॉंड—पु १रोखा, दस्तऐवज, कायद्यानें बांधून घेतल्याबद्दलचा लेख, करारपत्रक २ विद्यार्थ्याचा विसा. [इं.]

बाडकीन—न (मुद्रण) अशुद्ध टाईप काढण्याकरतां दाभणाच्या आकाराचें एक हत्यार [इं]

बाडगा—वि १ उमेठ, निर्दय, आडदांड, जुलमी, उन्मत्त, अत्याचारी, शिरजोर 'जावा नणदा बाडग्या सासरासासु मोटी निर्दय।' —होला ९९ २ आवरण्यास कठिण, उच्छृंखल, स्वैर, हट्टी (मनुष्य, पशु) ३ बाटगा, भ्रष्ट, बाटलेला [बाटगा] बाड गेला-वि (अशिष्ट), दांडगा

बांडगा-गें—पुन खोगिराचा किंवा गुटीचा पाठीवरून बांधावयाचा पट्टा, पाठबंद. याच्या उलट उराटी-टी=छातीवरील पट्टा

बांडगी—स्त्री १ स्वयंपाकाच्या उपयोगी, तांब्याच्या आकाराचें मातीचें भांडें २ (निदार्थी) तोंड [हिं]

बांडगूळ—न बांदें, बांदागूळ, झाडाचें वरट झाडावर वाढणारें दुसरें लहान झुडुप, परोपजीवि वनस्पती याच्या पुष्कळ जाती आहेत [सं वंदा]

बाडणें—अक्रि (व) फोफावणें [बाधणें ?]

बांडफरीद—पु १ (निदार्थी) ब्रह्मचारी २ सोदा, लुच्चा, भटकभैरव, उडाणटप्पू माणूस [बाडा+अर फर्द=एकटा]

बाडबिछा(शा)द, बाडबिछाना, बाडबिछायत—स्त्री पुस्त्री एकंदर सामानसुमान, चिरगूटपांघरूण, सटरफटर वस्तु वेरे-राहुटया इ० 'बाडबिछाद त्याचे हातास लागली' —ख ५ २६१५ [हिं बाड+बिछायत]

बाडस—पु खांबाचा टेंकू, स्तंभपीठ [बाड]

बाडा—पु कनातीचा परीघ 'बाडा बारा तेरा कोसाचा वसला' —ना ७१०८ [बाड]

बांडा—वि १ पाढऱ्या, काळ्या किंवा तांबड्या रंगाचा परंतु वर निराळ्या रंगाचे पट्टे किंवा ठिपके असलेला (पशु, कपडा), काळा-पाढरा २ (सामा) बढ, बंडखोर, बंडया ३ भांबुड, तोटका [हिं] ०भुरका—वि काहींसा बांडा, किंचित् बांडा चांडा, बांडेभाई, बांडुकला—पु (ना) (निंदार्थी) मुसलमान

बॉडॉ—पु (गो) लहान नारळ [बांडा=आखूड]

बाढाळ—वि (व) नाठाळ, उनाड 'हरणा बैल अरा बाढाळ आहे' [बड]

बाडी—स्त्री १ आवार, परसु पडीतजमीन २ कुंपण, ताट, भिंत ३ (व) मळा. [सं वाटिका हिं]

बाडी—वि १ बाडविषयक-संबंधी (औषध, वही) २ शास्त्र पूर्णपणें न शिकता सुतते त्यांतील उतारे पाहून तुटपुंजें ज्ञान संपादन केलेला (विशेषत ज्योतिषी, वैद्य). [बाड]

बांडी—स्त्री १ पिकाची खराबी, नुकसानी, नापिकी पीक नुकसानी पहा २ (व) कणीस बाहेर न पडता वाढ राहिलेलें ताट, बाद ३ (व) लूट, टंचाई नपूर. 'पोळीची बांडी झाली.' ४ (ना) कमरेपर्यंत लांब व अर्ध्या बाह्यांचा कोट ५ (ठाणें) पोहरा, मडकें, ताडी साठविण्याचें मडकें ६ (व) सुताची लाटी ७ (ल) रंग-गुजा [बांडा=आखूड]

बॉडीगार्ड—पु शरीररक्षक, हुजऱ्या, हुजूरदफ्तम [इं]

बाडुक—पु (कु) बेडूक [सं भेक]

बाळत झाली आहे त्याला सोहेर फिटेपर्यंत (दहा दिवस) म्हणतात २ बाळतखोली ०**चुडा**-पु बाळतिणीचा सोहेर फिटल्यानंतर तिला भरावयाच्या बांगड्या ०**निंब**-पु निंबाची एक जात, बड्डु निंब ०**पण**-न १ प्रसूति २ बाळतिणीची चाकरी, सुश्रूषा ३ (ल) एखादें कार्य होऊन गेल्यावर त्यासबंधीं पुढें करावयाची व्यवस्था ०**बोळ**-पु काळा बोळ, हा एका झाडाचा वाळलेला डिंक असून बाळतिणीला देतात **बाळंत(ते)र, बायंटेर**-पुन (गो) बाळतपण **बाळंत रोग**-पु बाळतिणीस होणारा क्षय रोग, सूतिकारोग याचीं लक्षणें-ज्वर, अतिसार, ग्लानि, शूळ, अशक्तपणा इ० हा रोग कष्टसाध्य आहे ०**विडा**-पु बारशाला किंवा त्यानतर बाळतिणीस तिच्या इष्टमित्रानीं, नातेवाईकानीं द्याव याचा विडा, ओटी, खण, कुंची, बाळलेणें इ० ०**शेप-शोप**-स्त्री शेपेचा एक प्रकार, यापासून औषधी तेल निघतें ही स्निग्ध व गोड असते पानथरी, जंत व मूळव्याध या रोगावर व वात कफावर उपयोगी आहे [स शतपुष्पिका, हिं सोयासोयके बीज] **बाळंतीण**-स्त्री नुकतीच प्रसूत झालेली स्त्री बाळत **बाळं(ळां)तें, बाळवर्तें**-नअव बाळतिणीच्या मुलाचीं आणि तिचीं वस्त्रें इ० 'त्रिभुवनपाळा बाळात्याचें पांघरवीजे लुगडें वो।' -मध्व २३

**बाळंदा-धा**-पु १ मुलें वाढविण्यात, त्याची जोपासना करण्यात भोगावा लागणारा हरएक प्रकारचा त्रास किंवा काढाव्या लागणाऱ्या खस्ता २ हरएक प्रकारचा त्रास देणारीं मुलें गुरें, बायका इ० खटलें, ३ लहान मुलाचें लेणें, अगावर घालण्याचे दागिने [स बाल+धा=धारण करणें]

**बाळदिंड**—न (तजा) कळीचें काल [फा बाळेदिङ्ग बाळे=केळें+दिङ्ग=काल]

**बाळदी**—वि बैल किंवा गाय याच्या कातड्याचा (जोडा) याच्या उलट म्हसरी ०**जोडा**-पु उंची जोडा, अधोडी जोड्याहून उच्च प्रतीचा जोडा

**बाळ(ळी)बुगडी**—स्त्री दागदागिन्याबद्दल व्यापक अर्थाचा शब्द बाळी व बुगडी

**बाळबोळ**—क्रिवि तोंडोतोंड, काठोकाठ पूर्ण माप भरून (क्रि० घालणें, भरणें, भोजणें, मापणें)

**बाळवणें**—सक्रि (त) चोरणें 'आमचें पुस्तक कोणीतरी बाळवलें' [फा बाला]

**बाळवागी**—स्त्री बेलवांगी पहा

**बाळसंतोष**—पु भिकाऱ्याचा एक वर्ग किंवा त्यातील एक व्यक्ति हे भिकारी बाळसंतोष हा शब्द मोठ्यानें म्हणून जुने कपडे मागतात याच्या अगावर नाना रंगाचीं वस्त्रें असतात 'बाबा बाळसंतोष, बाबा बाळसंतोष नाम घेता हरती दोष।' -दावि ५०१ [स बाळ+संतोष] (बाप्र) उघडाबोडा बाळ संतोष-वि १ निर्धन २ ज्यास कोणी मागेंपुढें नाहीं असा

**बाळसांगाडा**—पु (मल्लविद्या) आपल्या एका पायावर जमिनीवर असलेल्या जोडिदाराचा घोटा धरून पाय उचलून आपला पाय जोडीदाराकडील पायाच्या आतील घोट्याकडील बाजूनें घालून जोडीदाराच्या पायाचा पंजा आपल्या जागड्यात धरून व आपला गुडघा जमिनीवर टेंकून जोडीदारास मारणें [बल्लगाड=माणसाला जोरानें दाबून अडकवून ठेवणें, यावरून झाला असावा]

**बाळसें**—न १ मूल साधारणत एक वर्षाचें होईपर्यंत त्याच्या अंगावर दिसणारी पुष्टता, तान्ह्या किंवा लहान मुलाचा गुबगुबीत पणा, लठ्ठपणा (क्रि० येणें, चढणें) 'ऐसें रंकरू एक। प्रसवली हे दख। जयाचें तिन्हीलोक। बाळसें गा।' -ज्ञा १४ १०६ २(ल) टवटवी, तजेला, नवीनपणा, कांति (तारुण्याची किंवा आरोग्याव स्थेची) [बाळ] ०**दार**-वि गुबगुबीत, गुबगुबीत, लठ्ठ, बाळसें घेतलेला, गोंडस

**बाळसावणें, बाळसणें**—अक्रि १ गुबगुबीत होणें, लठ्ठ होणें, बाळसें येणें (तान्हें किंवा लहान मूल) २ (विशेषत बाळ सणें) माता होणें, (ल) मूल होणें 'बाळसलीस आता पोरपणा करू नको' ३ (विशेषत बाळसणें) पोरकटपणा करणें, मुलाप्रमाणें पोरकटपणानें वागणें [बाळसें किंवा बाल]

**बाळा**—स्त्री बाला, तरुण स्त्री, नकतेंच लग्न झालेली लहान मुलगी, तारुण्यावस्थेस पूर्ण आली नाहीं अशी स्त्री जैसें न साग णेवरी। बाळा पतीसी रूप करी।' -ज्ञा १५ ४६८ [स बाला]

**बाळा**—पु बैलाला लडिवाळपणानें किंवा प्रेमानें लावण्यात येणारा शब्द [बाल] **बाळ्या हाकणें-मारणें-देणें**-धावणें, पळणें, (मोटकरी मोट भरली म्हणजे बैलानीं ती ओढावी म्हणून बाळ्या असा लांबेचा शब्द उच्चारतो त्यावरून -मोल) बाला हाकणें (म्हणज फसवून पळून जाणें हा शब्द) व बाळा हाकणें हा शब्द एकच असावा

**बाळा**—स्त्रीअव क्षुद्रदैवतें 'आखमाता मायराणी। बाळा बगुळा मानविणी।' -दा ४ ६ १६

**बाळा**—पु कानाचे पाळ्याचे भोकात घालण्याचा वर्तुळाकारी आकाराचा दोन्ही बाजूनीं रत्नजडित असा पुरुषाचा दागिना

**बाळो**—वि बाहळा वाडा तावड्या अगर काळ्या रंगावर दुसऱ्या रंगाचे पट्टे किंवा ठिपके असलेला (बैल गाय इ०)

**बाळो**—पु (गो) शाई अगर कोणत्याहि पातळ रंगाचा थेंब अगर ठिपका

**बाळो**—पु (गो) एक प्रकारचा मासा, (कर्लीचें) पिल्लू

**बाळाडचें-बाळाडप**—सक्रि (गो) ओलाडणें

**बाळांत घर-चुडा-निंब-पण-बोळ-रोग-विडा-शेप-शोप-बाळातीण-बाळातें**-बाळत बाळत घर पहा म्ह० बाळातीक वैजीण ही जायच =बाळतिणीला सुईण ही पाहिजेच

**बाळांदर**—न (गो) झाडावर राहणारा मुंगसासारखा प्राणी हा पुढीस असलेल्या पातळ चामडीच्या योगानें पक्ष्यासारखा उडून जातो

**बाळाणेनसीं**—क्रिवि (महानु) सज्जामध्यें, ग्यालरीत, माडीवर 'बरुनि शृंगाररचना । बैसली बाळाणेनसीं ।'-भाए ३७८ [स अलिंद आलिंद]

**बालिगा**—पु तरणा एडका, मेंढा (विशेषत मुंज खेळणारा) २ (ल) जवान तरुण ३ (ल) खूप मोठा दगड

**बाळी**—स्त्री (काव्य) कन्या, मुलगी, तरुण स्त्री नऊ पाहसी भीमकबाळी।'-एरुस्व ८ २७ [स बाला] **बाळीभोळी**-वि भावडी 'तेथें जावें तें बाळीभोळीं।'-दावि २८१

**बाळी**—स्त्री कर्णभूषण, कानातील एक अलंकार ०**बुगडी**-स्त्री बाळयाबुगड्या इ० बारीकसारीक दागिने

**बाळें**—न (राजा) म्हातारचळ म्हातारपणचें भ्रमिष्ठासारखें किंवा मूर्खासारखें आचरण [बाळ] **बाळेणें**—अक्रि खुळा बनणें, म्हातारचळ लागणें, वेडा होणें, झोपेंत बडबडणें [बाळें]

**बाळेला**—वि वेडसर झालेला 'शोधी वनीं, प्रभु गमे श्री विरही जैवि वृद्ध बाळेला।'-मोवन ११ ५८ [बाळ]

**बाळेणें**—अक्रि विस्तार पुष्कळ होऊन फळें कमी लागणें (फळभाजी इ०स)

**बि**—अ (कुण) सुद्धां, हि 'मी बि गलों', [स अपि, प्रा वि]

**बिक**—न १ बळ, सामर्थ्य शक्ति 'गुणा सगुणपणाचें बिक। बहुवस एय।'-ज्ञा १ ३८ २ सौंदर्य, शोभा 'योवनभारभर बिक दाट। सघन योगलीळा।'-दावि ११ ३ तेज शोभा -शर ४ डौल, ऐट 'हय रथ गज बहुनादी उद्धर बसुनि मिरविती बिके।'-देप ६७ [स अभिल्या-भिल्या-बिक-राजवाडे]

**बिकट**—वि १ कठिण, अवघड, (अनेक अर्थांनीं उदा० फिरण्यास, डोंगर चढण्यास काम करण्यास, धडा-हिशेब समजण्यास, गोष्ट घडण्यास इ०) 'विकट वाट वहिवाट नसावी धोपटमार्गा सोडु नको।'-अफला ५९ २ त्रासदायक ३ दुर्बोध ४ अजिंक्य ५ दु साध्य ६ भयंकर, निकराची, रसाकसीची (युद्ध लढाई इ०) 'अमृतरायाच्या लोकांनीं। विकट केली खणाखणी।'-ऐपो ८६ [स विकट तुल० का बिक=घट्ट+कट्टु= बांधणें निकट्टु]

**बिक(के)ण**—स्त्री (गो कारवारी) फणसाच्या गऱ्यातील बी फणसाची आठोळी बिगट [बीं]

**बिकणी**—स्त्री (गो) वायणगात बी विस्कटण्याची क्रिया

**बिकलम**—न १ लेखक कारकुनाकडून लिहविलेल्या पत्रावर शेवटीं यजमान स्वत सहीबजा जीं चार अक्षरें, रेघ इ० काढतो तें मालकाचें हस्ताक्षर २ कधीं कधीं लेखाच्या, पत्राच्या शेवटीं लेखक हा शब्द लिहितात -क्रिवि कलमवार, तपशीलवार [फा बि+कलम] ०**जुलूम**-वि जुलमानें लिहिलेलें 'आपणास नेऊन रजावंद नसतां लेहून घेतलें मग आपण बिकलमजुलूम म्हणून दहशात नाऊन गैरहजीर होऊन तुमचे भेटीस आलों'-रा १० ४२०

**बिघुण, बिबुड**—पु (गो) ढेकूण [ढेकुण द्वि]

**बिंग**—न (शब्दच स) १ दोष, उणीव, उणेपणा व्यंग न्यून, कमतरता २ गुप्त गोष्ट, गुह्य, रहस्य (वाईट अर्थानें) [स व्यंग] ०**बाहेर काढणें-पडणें**-गुप्त गोष्ट, रहस्य उघडकीस आणणें, येणें 'खाडिलकरी मेनकेनें मात्र त्या भगवताचें बिंग बाहेर काढलें'-नाकु ३ ४१ **बिंगा**-वि सदोष, अपूर्ण, उणा, व्यंगयुक्त 'वांहीं कर्नाटदेश सेंगा, जगला परि बिंगा।'-राग १०५ [स व्यंग] **बिंगें**-न १ दोष, उणपणा, कमतरता न्यून (कोणत्याहि गोष्टीच्या उत्कृष्टपणास किंवा पूर्णतेस जरूर असलेल्या एखाद्या गोष्टीचा) अभाव बिंग पहा (क्रि० पाडणें, काढणें पडणें) 'त्यानें प्रयोजन चांगलें केलें परंतु खूप धाणेरें होतें एवढें बिंगें पडलें' २ कोणतेंहि गैरशिस्त, नीतिभ्रष्ट वर्तन, कृति [स व्यंग]

**बिंग**—पु (कों) एक प्रकारचा मासा

**बिगट**—वि कठिण, अवघड, (विरू) विकट पहा **बिगटध्या**-वि हेकट, तिरसट, व्यवहारास कठिण

**बिगट**—न (गो) फणसाची आठोळी बिकण पहा

**बिगटणें**—अक्रि १ (प्र) बिलगणें, चिकटणें २ अगदीं जवळ येणें, गळ्यात पडणें [का बिगिट=घट्ट असणें]

**बिगटी**—स्त्री (विरू) बिग्की पहा

**बिगड, बिग(गा)डणें, बिगडाबिगड, बिगाड**—बिघड, बिघडणें इ० पहा

**बिगर**—शअ शिवाय, खेरीज वाचुन 'तुमच्या बिगर हें काम होणार नाहीं' [अर फा ब-धैर, हिं बिगर] ०**इयत्ता**-स्त्री (इयत्तेवाचून) उजळणी शिकणा या मुलाचा वर्ग, बालवर्ग, शिशुवर्ग, बिगारी

**बिगार**—स्त्री १ मोबदला किंवा मजुरी न देता सरकारनें किंवा सरकारी अधिकाऱ्यानें करवून घेतलेलें काम वेठ २ सक्तीनें काम करावयास लाविलेल्या इसमानें जनावरानें वाहून नेलेलें ओझें ३ (ल) निष्काळजीपणानें कसेंबसें केलेलें काम इच्छा नसताना केलेलें काम ४ सक्तीनें, नाखुषीनें केलेला उपकार [फा बेगार-री] म्ह० बैठेसे बिगार भली=रिकामें बसण्यापेक्षा दुसऱ्याचें काम केलेलें बरें ०**खातें**-न बिगारीनें करविलेल्या कामाचा बिगारी लोकांचा हिशेब ठेवणारें खातें ०**धन**-वि (व) फालतु **बिगारी**-पु १ वेठीस धरलेला माणूस, सक्तीनें कोणतेंहि काम करावयास लाविलेला इसम २ हमाल, मजूर कुली

**विगिविगी, विगा विगीन**—क्रिवि (कुण) त्वकर त्वकर 'न्यारिचा वकुत होईल मैतरणी विगिविगी चाल।'—यशोधन [स वेगेन, तुल० का विगि, व्यागे=त्वकर]

**विघडणें**—उक्रि खराब करणें, नुकसान करणें, सडविणें, नासविणें —अक्रि १ खराब होणें, वाईट होणें, नासणें २ (ल) वैमनस्य, वेबनाव उत्पन्न होणें, सोईनें न वागणें. ३ (शरीरप्रकृति) नादुरुस्त होणें ४ वेगळें होणें 'ते दोन्ही जडता न ते विघडती आश्चर्य वीरोत्तमा।'—आसेतु ३४ [स विघटन]

**विघडाविघड**—स्त्री १ सर्वसाधारण खराबी, नुकसान २ खराब झालेली, नाश पावलेली स्थिति (वस्तु, मसलत, कामकाज इ०ची) [विघडणें]

**विघा(घ)ड**—पु १ खराबी; नाश, नासाडी, वाईट, नुकसानकारक स्थिति 'जैसें दुध पवित्र गोड। परी लवण स्पर्शता परमद्वाड। तेवी तूतें घडून विघड। आलें आहे महाराजा।'—नव १६ १५१ २ वेबनाव, भांडण, वितुष्ट, वैमनस्य 'का वीं तू प्रणयें विघाड लटिका जेन्हा मशीं दाविती।'—केक ७१ [स वि+घट्]

**विघाडणें**—(विकृ) विघडणें पहा

**विघा**—पु १ जमिनीच्या मोजणीचें परिमाण, वीस पाड किंवा चारशें चौरस काठ्या हें परिमाण निरनिराळ्या प्रांतात भिन्न आहे पुण्या-मुंबईकडे ३९०० चौ यार्ड, गुजराथेंत २९५० चौ यार्ड व बंगालमध्यें १६०० चौ यार्ड म्हणजे एक विघा होतो २ वीस पाड जमीन [स विग्रह] **०विघोटी**—स्त्री विघा शब्दाची द्विरुक्ति विघा पहा **०वणी विघवण**—स्त्री १ विघ्याच्या मापान केलेली जमिनीची मोजणी २ विघ्याच्या मापानें बसविलेला शतसारा, फाळा, तरमवदी [विघा] **विघोटी**—स्त्री (तिरस्कारार्थी) विघा

**विचकटणें**—उक्रि १ (ग्रा) (जमीन) वरवर उकरणें, खणणें २ (विकृ) विचकटणें पहा

**विचकणें, विचकटणें, विचकावणें**—अक्रि घाबरणें, दचकणें, भुजणें, एकदम भीति वाटणें भयभीत होणें 'चित्तनीं विचकता मन। सविवेक बुध्दिबळें जाण।'—एभा १४ ५०१ [स वि+चक्, हिं बिचकना]

**विचकणी, विचकावणी**—स्त्री दचकणी, सभ्रांत स्थिति भिणें विचकणें (धातुसाधित नाम)

**विचका-क्या**—वि सहजासहजीं बिचकणारा, दचकणारा; बुजरा, बुजरट [विचकणें]

**विचकाव(वि)णें**—उक्रि भिवविणें, भीति दाखविणें, भयभीत करणें, दचकाविणें [विचकणें] **विचकावणी**—स्त्री एकदम भिवविणें, दचकाविणें [विचकाविणें]

**विचवा-चा**—वि १ तल्लख, हुशार, तरतरीत (मूल) २ चपळ, चलाख, तुरुतुरु धावणारें (घोडें) ३ (व्यापक) जलद, भरभर चालणारी, फर्डी (लेखणी) [विचवा]

**विचरें**—न एक प्रकारचा मासा पाक पहा

**विचल**—स्त्रीपु १ विघाड, (चागल्या गोष्टीचा वाईट गोष्टींत) बदल, फेरफार २ माघार, कच (क्रि० खाणें) [स वि+चल]

**विचलणी**—स्त्री १ रस्ता सोडणें, आड जाणें, बाजूस वळणें २ योग्य, सरळ किंवा सम्य सरणी सोडून त्याच्या विरुद्ध सरणीस लागणें [विचलणें] **विचलणें**—अक्रि १ सरळ मार्ग सोडून वाईट मार्गानें जाणें, गैरशिस्त, दुर्वर्तनी बनणें, विघडणें २ भ्रमिष्ट होणें, खुळावणें, बेहसर होणें ३ माघार खाणें, वचनभंग करणें, करार सोडून मागें हटणें ४ विसरणें [स विचलन, हि बिछलना]

**विचवा, विचोवा-वा**—पु ज्याला मध्यें खांब नाहीं असा डेरा, तबू 'क्षण एक आपानीं आराम केला। विचोव्यात भाल्नीं गाठिलें।'—अफला १७ —पेद १८ १७३ [फा बीचोबा]

**विचवा**—पु १ विंचवाच्या आकाराची लहान, वाकडी कट्यार 'विचवा लवगी गुरगुज साग सोटा वरची पेंक्ती।'—ऐपो १०९ २ (ल) लहान परतु भरभर चालणारी लेखणी (मुळात रूढ) ३ लहान परतु हुशार, तरतरीत माणूस ४ पायाच्या आगठयात घालावयाचें वळें ५ डोंगराळ प्रदेशात होणारें एक लहान झाड याचा आकार विंचवाच्या नांगीप्रमाणें असतो (ठाकुर लोक त्यास कोंबडा म्हणतात) [स वृश्चिक, हिं बिछुआ] —वि विचवा पहा

**विचारा**—वि. १ गरीब, अनाथ, दीन २ दुर्बळ, बापडा, कींव करण्याजोगा ३ क्षुद्र, पामर ४ निरपराधी [फा, तुल०हि बे स चार=गमन]

**विछ्ञात-द**—स्त्री (विकृ) विशात पहा

**विछाइ(य)ती विछायत**—वि १ दुकान न घालता आपला माल पेठ, बाजार यात विकण्यास नेणारा २ रस्त्याच्या कडेला किंवा घराच्या पायरीवर माल मांडून विकणारा (उदमी, व्यापारी), गैर दुकानदार, फेरीवाला 'बिछायती वाणी'—बाडसमा ३ १३५ 'अडत मजूरी, व्याज वगैरे जे जे खर्च आम्हास घ्यावे लागतात त्याची खुलासेवार माहिती आमच्या विछाइत लोकाकरिता दिली आहे —मुव्या (प्रस्तावना) १ ३ (व) माल खरेदीसाठीं गावोगाव फिरणारा (अडत्या दलाल) ४ (अडत) ज्याला उसाकरिता पेंड वगैरे घेण्यासाठीं आगाऊ पैसे देतात तो (शेतकरी) —वि अशा तऱ्हेच्या व्यापाऱ्यासबधीं, व्यापारविषयक (माल इ०) [विछायत]

**विछाई(य)त**—स्त्री १ बसावयासाठीं आथरलेलें जाजम सतरजी इ० बैठक —सभासद ५८ २ मालमत्ता ३ शेज, बिछाना [अर बिसात]

बिछा(छो)ना—पु निजण्यासाठीं पसरलेली गादी, हंथरूण इ० भेरधन, सेज, शय्या [ स वि+च्छद् हिं बिछाना ] बिछाने मजला—पु (नाविक) मल्लाहांच्या उपयोगाकरितां झुलते बिछाने टांगण्याचा मजला, हा तोफामजल्याखालीं असतो (इं) बर्थडेक बिछोन्यावरच जिरणें—(व) रोगी अतिशय अशक्त होऊन स्थान उठण्याजोगाही शक्ति नसणें, अंथरुणाला खिळणें

बिछायत—स्त्री (सतरंजी, जाजम इ०) जमिनीवर पसरणें किंवा आंथरणें [ बिछाविणें ] बिछ(य,वि)णें—सक्रि १ (सतरंजी, जाजम गादी इ०) जमीन, प ग इ०वर पसरणें, आंथरणें, घालणें 'मेरी महालामध्यें दिस पल्ग बिछाऊन। शेजारी निजले दोघे लई प्रीत लाऊन'—पला ७९ २ पाडणें, चीत करणें, जमीन दोस्त करणें, लोळविणें ३ लपवून टाकणें स्वल्प करणें, फस्त करणें [ हिं बिछाना, बिछवाना ]

बिजक—न (मालावरोबर पाठविलेली) किंमत इ०ची तपशीलचिठ्ठी, अडपी, आवरणी बीजक पहा [स बीजक]

बिजणें—न बीं विखरणें, रुजत घालणें —मनको [ बीज ]

बिजन—स्त्री कत्तल, नाश, कत्तलाम —वि निष्प्राण, ठार 'आपल्या साठ बायकांस एकएकीस बोलावून आणून तरवारीनें छाटून बिजन कल्या '—ऐपुले ६४ [ फा बी+जान्-प्राण ]

बिजेवस्ती—स्त्री (व) मार, मारकूट

बिजरद—पु सवसर्व थीं —मुख्या ११० १५०

बिजली—स्त्री १ वीज, विद्युत् २ विजेसारखी तेजस्वी, तडफदार व सुंदर स्त्री ती बिजली आपल्या हातीं यईल तर काय बहार [स विद्युत्, प्रा विज्जु विज्जुली, हिं बिजली]

बिजला—स्त्री मुलांच्या अकेंटुवर्टे नांवाचा खेळ खेळताना आसलेल्या घरात टाकण्यासाठीं घेतात ती दगडाची चीप, खापरी किंवा लाकडाचा तुकडा

बिजवई—स्त्री (खा) बी—बियाणें [ बीज ]

बिजवट—न १ पुरुषाचें प्रजोत्पादक वीर्य रेत २ बीज उत्पत्तिकारण, ताणा 'बिजवट चांगलें असलें म्हणजे पोर चांगलें होतें' ३ संतान, संतति वळ अळी, (घोडा बैल इ०ची) अवलाद 'हा घोडा काटेवाडी घोड्याचें बिजवट आहे' [बीज+वट प्रत्यय ]

बिजवड—न १ ज्याच्या बीजापासून जो झाड तो (आंबा लता इ०) 'हा आंबा वनछोडाचा बिजवड आहे' २ बीज, अवलाद बिजवट पहा —पु शेताची पुन्हां परणी; एक पीक कापून घेतल्यावर पुन्हा त्यांतच केलेलें पीक (क्रि० करणें) —पुन एकाच जमीनींत काढलेल्या पहिल्या पिकाचा दुसऱ्या पिकावर जो साधकबाधक परिणाम होतो तो, पूर्वीच्या पिकाचा जमिनींत भरशिट राहणारा गुणधर्म, बिवड 'तागाचा बिजवड सर्वांत चांगला' [ बीज ]

बिजवर—पु १ दुसऱ्यांदा लग्न करणारा, कलेला पुरुष आजन्म ब्रह्मचर्य पाळलें नाहीं तरी निदान बिजवरांचे पुनर्विवाह बंद केले पाहिजेत '—टि ४ १४४ 'पेन्पांचा गोंडा पटीवर लोळे। बिजवराची बायको मांडीवर लोळे।'—पुणडीचा उखाणा २ ज्याचें लग्नाचें वय होऊन गेलें आहे असा पुरुष, पूर्ण प्रौढ मनुष्य [ बिज+वर ]

बिजवरा—पु (विजेच्या चंद्राप्रमाणें) लहान मुलांच्या आणि स्त्रियांच्या कपाळावरील एक दागिना (याला जोडून बिंदी शब्द येतो) 'भाळीं सुंदर शोभतो बिजवरा भांगीं सुकुफाफळें।'—अकक २, अनतमीतास्वयंवर ४४ [बीज=द्वितीया ]

बिजा—वि दुसरा [ सं द्वितीय, प्रा बिइज्ज गु बीजो ] म्ह० दुजा, बिजा, तिजा बिजाईत—वि दोन वेळां व्यालेली (गाय, म्हैस इ०), दुजाईत [गु] बिजावळी—स्त्री वगळेपणा, भेद भिन्नता, अंतर 'तैं तन्हि गा सुधर्मा। बि(बि)जावळी आत्मया कर्मा। अपाडें जैसी पश्चिमा। पूर्वेसि कां।'—माज्ञा १८ २६९

बिजाकार—पु ताणा, बिजवट, खाण, उत्पत्तिस्थान, उगम [स बीज+आकर]

बिजाक्षर—न (महानु) रहस्यमय मंत्र 'मि होडेचा पांचाक्षरी। परा-याचेयां बिजाक्षरीं।'—भाए ७७१ [स बीजाक्षर]

बिजागरी, बिजागरें—स्त्रीन दार, खिडकी पेटी इ० चें झांकण उघडतां व लावतां यईल अशा रीतीनें तें जोडण्याची साधिपट्टी, ही नरमादीहून भिन्न असते इ हिंजेस

बिजाळू—वि बीं पेरून केलेलें, बीयानें तयार केलेलें रूढ असें (झाड, रोपटें) [ बीज+आळू प्रत्यय ]

बिजि(झि)क—न एक प्रकारचा पत्त्याचा खेळ, पाट यात दोन, चार किंवा सहा असे इसम खेळतात व दोन किंवा चार पत्त्याच जोड घेतात [इ बेझिक्]

बिजें—न १ आगमन, येणें (क्रि० करणें) 'तुवा मित्रा पाशीं करें बिजें।'—कुमुरा ५ १७ २ गमन, जाणें 'वर्षाकाळ सरल त्यावरि बिजें कीजे मना मानल्या।'—निमा ४ ३५ 'देवें एय करें बिजें।'—शिशु ७२५ [स व्रज्,प्रा वच्च, गो वचणें]

बिजेबारें—न १ (वों) वधू आणि वर यांच्या राशींत सबंध राशिमहतानें—बारा राशींचें अंतर असणें, द्विर्द्वादशक २ (ल) हाडवैर, उभा दावा [ बिजा+बारा ]

बिजोरा—पु एक दागिना बिजवरा पहा

बिझाईत—स्त्री मालमत्ता [ अर बिझाअत्, बिसात् ]

बिट—पु बिटा पहा 'चालता चालता किंवा ओझें वाहता वाहतां बिट बासेल—निघेल—बाहेर पडेल'

**विटका**—पु वायुविकृतीमुळें हात, पाय इ० मध्यें येतो तो पेटका, वळ

**विटका**—वि १ अगदीं लहान आकाराचा, खुटका (आंबा, पेरू, कणीस, नारळ इ०) २ लहानसा, टुमदार, लहान व सुरेख, छकुला, चिमणा, पिटुकला, विट्टा (पदार्थ, मूल)

**विटकी**—स्त्री १ गू, शेण इ० दुर्गंधी पदार्थाचा लहानसा गोळा २ (गहू, बाजरी, मका, जोंधळा इ० चें) लहान कणीस, तुरा ३ अगदीं लहान जातीचा आंबा ४ लहान आंबा, पेरू इ० फळ ५ अगदीं ठेंगणा मनुष्य, ठेंगू, खुटका मनुष्य ६ (खा) दूध विरजण्याचें अगदीं लहान मडकें [? पिटकें तुल० स विड= तुकडा प्रा दे विट=बेटा, लडका]

**विटकी**—(गो) प्रवासी सामानसुमान ०उभारप-क्रि गाशा गुडाळणें

**विटारणें**—अक्रि १ (अशिष्ट) खोडकर, व्रात्य, द्वाड होणें (मुलें, गुरें यांच्या संबंधीं प्रयोग) २ नाश पावणें, बिघडणें, अव्यवस्थित होणें (जमीनजुमला, कारभार इ०) [स विष्टा, म विष्ट]

**विटिंग वाघणें**—क्रि (सोनारी) मण्याचीं दान टरफलें एकमेकावर अशा तऱ्हेनें बसविणें कीं त्याचे सांधे एकमेकांशीं भिन तील व अशा तऱ्हेनें जुळवून झाल्यावर तीं सवाण्यांत धरून स्लेटपाटीवरच्या चऱ्यात फिरवून दाबून घेणें

**विटी-ट्टी**—स्त्री १ विटकी अर्थ १ त ५ पहा २ सागर गोट्याच्या खेळांत एक सागरगोटा वर उडवून जमिनीवरून एकदम उचलून घेतलेल्या दोन सागरगोट्याची जोडी ३ (नदभाषा) शभर 'आज मी विट्टी भुरके (रुपये) हुंडी करून पाठविले' ४ दारूनें भरलेली कागदाची सुरळी ५ (कों) एकावर एक रच लेल्या नाण्याचा एकत्रित समूह चळत 'विसावेसाव्या विंऱ्या लावल्या'—चैत्रावळ (महाराष्ट्रशारदा जून १९३५) ६ कागद वगैरेच्या विशिष्ट संख्येची गड्डी ७ पिवळ्या कण्हेराच्या फळा तील बीं [विटकी]

**विटोरी**—स्त्री १ गहू, जोंधळा, बाजरी, मका इ०चें अगदीं लहान कणीस, विटकी २ दारूचा लहान तोटा, बाण, विरी ३ (विटीदांडूचा खेळ) लहान विटी ४ शेणाचा लहान पोहो ५ लहान लेखणी वगैरे [विटी]

**विटो-ट्यो**—स्त्री (गो) मुलींचा एक खेळ

**विट्टा**—पु मलविसर्जनाची इच्छा नसता किंवा प्रयत्न न करता गुदावाटे भीति, अति कष्ट इ० कारणामुळें बाहेर पडलेला मळ ०घासणें-ताणणें-मोकळा होणें-बाहेर पडणें-निघणें-१ हागणें २ (ल) गाळण उडणें, अति श्रम, भीति इ०नीं सुचेनासें होणें, जीव नकोसा होणें, रागणें इ० 'सुंभे टापरीं विगार वाहतां वाहतां विट्टा वासला।'—अफला ६८ [? स विष्ठा]

**विट्टा**—वि लहान, छोटा विशेषत लहान मुलांना म्हणतात विट्टी, विट्टू अशीं नावेंहि आहेत [विटका]

**विट्टी**—स्त्री (व) कणकेचा जाडा पानगा, बट्टी

**विंड**—पुनस्त्री घराच्या गवती छपराच्या कोपऱ्यांना पानें, गवत इ०चा घातलेला पेंढा (क्रि० बांधणें) [स पिंडा]

**विंडका-पु** गठ्ठा, भारा. 'विंडका घेऊन कुणाकडून आलें' [विंडा] **विंडकें**—न गवत रोपटीं, काटक्या इ० चें जुडगें, लहान विंडा [विंडा अल्पार्थी]

**विडगौ**—पु १ (महानु) दुर्ग २ समूह 'शमदमाचा करूनि मेळावा। इंद्रियांचा विडगौ जिणावा।'—भाए २१२. [का विडिय=समूह]

**विडती**—स्त्री १ पेंच, पंचाईत, अडचणीची स्थिति, संकट, कचाटी २ दोहोंकडून संकटप्रसंग येणें 'पुढें वाघ मागें अस्वल अशा विडतींत सापडलों' [का विडते=अवकाश, अवसर]

**विडविडणें**—अक्रि गिडवडून जाणें, लिडविडणें 'राघवणी सुलीपुढें। पन्हे उन्मादती खातवडे। तैसीचि यें नाकाडें। विड विडती।'—ज्ञा १३ ५६२ [वदबदणें]

**विडलवण**—न एक प्रकारचें मीठ, काळें मीठ, पादेलोण [स विटलवण बीड+लवण]

**विडवई**—पु १ तळाचा रक्षक, छावणीचा अधिकारी २ हितकर्ता, तारक, कैवारी 'जन्मा येऊनि तया लाभ झाला। विडवई भेटला पांडुरंग।'—तुगा २३३६ [का बीडु=तळ, छावणी]

**विंडा**—पु १ (दोरी, सुत इ० चें) वंगोळें, गेंडोळें २ (गवत काटक्या इ० चा) भारा, गठ्ठा 'पनावळीचे किती विंडे आहेत?' ३ खडक, जमीन इ० वरचा उचवटा, टकाड ४ ढोंग राचा सुळका, कडा ५ (समासांत) सौंदर्यवाचक पद उदा० राजविंडा=राजासारखा विंड असणारा [स पिंड, हिं बींडा]

**विडा(ढा)र**—न घर, वसतिस्थान (विरू) बिऱ्हाड पहा 'आणि वायुसि एके ठायीं। विढार जैसें नाहीं।'—ज्ञा १२ २११ [का बीडार(बीडु=भार)] ०करू-करूं **विढारी**-वि दुसऱ्याच्या घरीं बिऱ्हाडानें उतरणारा, राहणारा 'एहीं येवोनि विढारकर। का वो जाहला।'—कथा १ ११ १०३

**विडाल-ळ विडाल(ळ)क**—पु मांजर 'कीं मूषकालागीं विडालक। येसे टपत तयापरी।'—रावि १ १०८ [स विडाल, विडालक]

**विडी**—स्त्री १ कैद्याच्या पायांत अडकविण्याची शृंखला, कडी सांखळी वेडी २ पायांत घालावयाचा चांदीचा एक सांखळ्या-वाळ्याप्रमाणें दागिना, वलय 'नाना ते विद्युल्लतेची विडी। कीं ते अग्निज्वाळांची वेवळ घडि।'—स्वादि ९ ५ ३ ३ (ल) पाश, बंधन, लोढणें, पायगुता, अडथळा, विघ्न ४ (कुलाबा) चाकांत ठोकतात तें बाटोळें लोखंडाचें पचपात्रें, वगवी

[हिं] (वाप्र) रुपेरी विडी=(ल) नोकरीचाकरी सेवावृत्ति (पगाराच्या शृखलेनें नोकरी करणाऱ्या माणसाचें स्वातंत्र्य मर्यादित असतें यावरून) सवामणाची विडी -स्त्री १ अतिशय जड अशी पायातील शृखला २ (विवाहित स्त्रीचें पुरुषावर जन्मभर ओझें राहतें यावरून ?) पत्नी, बायको 'अठरावें वर्ष पुरें होऊनहि पायात सवामणाची विडी टोकली नाहीं असे मुलगे आता पूर्वीपक्षा जास्त सापडतील' -निच

**विडी**—स्त्री धूम्रपानार्थ केलेली, तबाखू भरलेली टेंभुरणी इ० च्या पानाची कागदाची नळी, (विरू) विडी

**विडी**—वि बीड नावाच्या धातूची बनविलेली (तोफ इ०) 'तिनशें तोफा थोर अखंडी। पचरसी आणि विडी लखडी।' -ऐपो १२५ [बीड]

**विडी**—वि बीड शहरासबधींचें (कापड इ०) [बीड=एक निजाम हद्दींतील गाव]

**विंडी**—स्त्री गवती छपराच्या कोपऱ्याना घातलेला गवताचा पेंढा, विंड पहा (क्रि० बाधणें)

**विडीस**—न आमिष [स बडिश प्रा विडिस]

**विंडोळें**—न विंडा गुडाळी (विरू) मेंडोळें पहा

**विणकूल**—न (गो) बारीक मोंक

**विणणी, विणणें**—(विरू) बेणणी, वेणणें पहा

**विणद**—पु १ रस्ता, विदी, वाट मार्ग २ (ल) (महानु) जवळपणा सान्निध्य, समीपता 'मीळे मुनींची मादी। तरि निंदास्तुतिची होय गवादि। म्हणौनि करुणाच्या विणिदीं। न रीगावें तुवां।' -माए १८५ [विदी=वाट]

**वितणें**—अक्रि १ जवळ येऊन ठेपणें अगदीं जवळ येणें 'लग्न तर सयावर वितलें आणि साहित्य तों झालें नाहीं' २ गुदरणें कोसळणें (सकट, धोका कर्तव्य पेंच इ०) 'तो प्राणावर वितलें तरी खोटें बोलणार नाहीं' ३ सुरू होणें (लढाई भाडण, वाद इ०) ४ घडणें, होणें घडून येणें (अनिष्ट गोष्ट वृत्तात इ०) 'तरी अन्यस्थानीं वृत्तात वितला। तो म्यां का नणिजे।' -वि ४ ३५ ५ ठसणें, बिंबणें (मन, अंत करण, भावना इ०वर) 'गुरूचा उपदेश ह्या शिष्याच्या मनात वितलो' ६ गोट्या व कवड्या याच्या खेळांतील एक पारिभाषिक शब्द [स वृत्-वर्तणें, हिं बीतना, म वतणें]

**वितप(फ)शील, वितप्शील**—क्रिवि बारीकसारीक बाब तीसह सविस्तर विस्तृत तपशीलवार [फा वि-तफ्सील]

**वितमाम**—क्रिवि पूर्णपणें तमाम पहा [वि+तमाम]

**वि-तर्जुमा**—क्रिवि नियमानुसार -रा १५ २७१ [फा वि+तर्जुमा]

**वितेन वितानमीत**—स्त्री (कारागिरी) चढाच्या चार रकान्यापैकीं पहिल्या रकान्याच्या मध्यापासुन चवथ्या रकान्याच्या मध्यापर्यंत ओढलेली आडवी रेघ [फा ?]

**वित्त, वित्त(त्तो)म**—वि १ खरी, बरोबर, निनचूक २ खात्रीलायक, नक्की, खात्रीची (बातमी, खबर इ०) [अर बातम] ०बातमी-स्त्री १ नक्की बातमी २ सविस्तर, पूर्ण माहिती, बातमी 'अरबांच्या हालचालीची वित्तबातमी समजण्यास मराठ्यास कांहींच मार्ग नव्हता'

**वित्तू**—पु एक कवड्याचा खेळ -मखपु १२५

**विथर**—वि (प्रां) गैर बेशिस्त, अव्यवस्थित (भाषण, वर्तन) **विथरणी**-स्त्री बुकणें, विथरणें (धातुसाधितनाम) पहा [विथरणें] **विथरणें**-अक्रि १ प्रतिकूल होणें, बिघडणें, उलटणें, फिसकटणें (काम, धदा, मार्ग इ०) २ (ल) गैरशिस्तपणें वागणें; वाईट मार्गास लागणें 'हा सोईनें वागता आहे तों बरा एकदा विथरला तर शमरास ऐकणार नाहीं' ३ (सोईनें वागण्याचा) चागला स्वभाव सोडून दुर्वर्तनी, खोडसाळ बनणें (जनावर) -सक्रि प्रतिकूल करणें, (स्नेह, आज्ञाधारकता, पुण्यमार्ग इ० पासून) पराङ्मुख करणें, वाईट पदास लावणें [हिं बिथरना, तुल० स वितर्जन]

**विंद**—पु (अशिष्ट) १ बिंदु थेंब २ पुरुषाचें वीर्य किंवा त्याचा एक थेंब ३ अश्रु 'नेत्रावाटे वाहे विंद। याचा डोळा लागेना।' -एकनाथ, कृष्णपदें [स बिंदु]

**विंद**—न (वे) प्लेगची गाठ [स पिंड म विंड]

**विंदगा**—पु (व) पाणी भरण्याची ल्हान घागर, कळशी बिनगा पहा [का बिंदगी]

**विंदडी-ली**—स्त्री १ (कापूस, कापड इ०चा) ल्हान गट्ठा; गाठोडी, बस्ता २ (गवत, पाला, काटक्या इ०चा) ल्हान भारा [विंडा अल्पार्थी, स बिंदु]

**विंदडें**—न (कं) (व्यापाऱ्यात रूढ) लुगडीं, कापड इ०चा गट्ठा 'विंदडी विंदडें सोडा' [विंडा]

**विंदलों**—पु (गो) मातीचें भाडें, ल्हान कलश, विंदगा

**विंदलें, विंदली**—नस्त्री १ ल्हान मुलाच्या मनगटात घालावयाचा पाटलीसारखा एक सोन्याचा दागिना २ (राजा) ल्हान बिंदु अनुस्वाराचें, विसर्गाचें टिंब [बिंदु]

**विदवा**—पु (प्रा) धाब्यावर पसरावयाची (विशेषत विटाच्या भट्टींतील) धूळ, धुराळा, माती

**विदा**—वि १ पाठविलेला, रवाना केलेला २ जाण्यास परवानगी दिलेला (पाहुणा) (क्रि० करणें) [अर विदाअ]

**विदा, विदाई-की-गी, विदायकी, विदागिरी**—स्त्री १ रवानगी, पाठवणूक, रवाना (क्रि० करणें, घेणें) 'तुम्हासही

बवैदी चालल्यान इजा याची सबब आमच्या खावदानीं आम्हास रूमशामहून विदा करून पाटविलें '-पाब १६ २ निरोप देणें, बोळवण 'नारू येरे झाले म्हणजे तुझी विदागी करू '-पेदसमा ४ ३ निर्यात, बाहर पाठविणें ' येल्ची मजकुराची विदा विला यतेस करणार '-दिमरा २७९ ४ निरोप देतांना, पाठवणी कर-तांना संभावना म्हणून दिलेलें पारितोषिक, देणगी, अहेर, बोळवणी 'नतर विड देऊन विदागिरी केली '-रा १२१९५ ५ गुणिजनाना त्याच्या गुणाची चहा करण्यासाठीं दिलेलें बक्षीस, देणगी [अर विदाअ] **विदा करणें**-१ पाठवणी, बोळवण करणें, निरोप देणें २ काढून टाकणें.

**विदाती**—वि नवीन 'तरी तुम्ही मुसलमानी कामकाज महजबाप्रमाणें विलाहूरवत करून हक रस्वाजिमा विदाती असाम्या वगैरे '-वाडमा २१०६ [अर विदा, बदायत्=प्रारभ]

**विदानं(न)द**—(वाप्र) जाणोत, जाणारें कीं, त्यास कळावें कीं, आज्ञा कीं याअर्थी शब्द [फा वि-दान-द]

**विदावनी, विंदी, विनी**—स्त्री १ (कों) कपाळपट्टी २ दारास दिलेली वरची आडवी पट्टी ३ दाराची मधली उभी पट्टी

**विदी**—स्त्री १ (खेड्यातील, गावातील) रस्ता, गल्ली बीद पहा 'इद्रियग्रामींचे राजविदीं।'-ज्ञा ७.१०६ २ (ल) गावातील रस्त्यातुन वाहणारें घाणेरडें पाणी 'परि गगच्या सवर्यी। विदी आणि महानदी। ऐक्य तेवीं माझ्या बोधीं। शुभाशुभासी।'-ज्ञा १८.१२५२ [स वीथि, का बीदि] **विदोविदी**-क्रिवि १ रस्तोरस्तीं, गल्लोगल्ली 'हरिच्या हा कैसा पडियल्या छदी। हिंडली विदोविदीं बाजारेंसी।'-ब २९४ २ सर्वत्र, चोहोंकडे 'नद धावे विदोविदीं। गौळी हुडकती सादोसादीं।'-ह २१२४

**विंदी**—स्त्री १ स्त्रियाच्या कपाळावरील मोत्याचा एक अलकार २ सैन्याची आघाडी, विनी 'ज्याचा नगाऱ्याचा घोडा पुढच्या विंदीस, निशाणाचा हत्ती पुढच्या विंदीला'-सासइ ७ [स विंदु=भुवयामधील भाग, फा बीनी=नाक]

**विंदु**—पु १ थेंब, टिंब, लेखणी इ०नीं उठविलेला ठिपका, अनुस्वार किंवा विसर्गबोधक चिन्ह २ मध्यबिंदु, केंद्र. ४ (भूमिति) ज्याचे भाग करता येत नाहींत किंवा ज्याला स्थिति असून महत्त्व लांबी रुंदी इ० नाहीं तो ५ घोड्याच्या कानाच्या खालीं सहा अगुलावर जो भाग असतो तो, कानाचा पृष्ठभाग [स] **विंदूचा सिंधु करणारा**-वि १ (ल) (एका थेंबाचा समुद्र करणारा) कवि २ अलकारिकपणानें अतिशयोक्ति करणारा माणूस **विंदु कुली, विंदुकलें**-स्त्रीन १ विंदु, थेंब वाटोळें चिन्ह २ चद्र विंदु [विंदु अल्पार्थी] **विंदुली**-स्त्री चद्रविंदु विंदुकली पहा **विंदुलें**-न १ कण -शर २ विंदु, थेंब ३ शून्य, पूज्य 'मग जातीं ज्याची पडे विंदुलें। केव्हा भाव होती मज मीनलें।'-ज्ञा १४६१ [विंदु] **विंदें**-न (अशिष्ट) पुरुषाचें वीर्य किंवा वीर्याचा एक विंदु, विंद पहा

**विंदुकली**—स्त्री १ झाडाच्या पादीवर उगवणारी दुसऱ्या प्रकारची वनस्पति, बाडगूळ -कृपि ६९३ २ (कों) डिकशी (मोहोरलेली)

**विंदूल**—न (गो) मातीचें भांडें, ल्हान विंदलें

**विंदोरी**—स्त्री (खा) पालखी इ० वहनाची (आतील मूर्तीसह) मिरवणूक

**विंद्र**—न राजचिन्ह, चिन्ह. -शर [स. विरुद]

**विंद्रावनी सारंग**—पु (सगीत) एक राग ह्या रागात षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल मध्यम, पचम, कोमल निषाद, तीव्र निषाद, हे स्वर येतात गाधार व धैवत वर्ज्य जाति औडुव-औडुव वादी ऋषभ, सवादी पचम गानसमय मध्यान्ह ह्याचे अवरोहात धैवताचा अल्पप्रयोग विवादी या नात्यानें क्वचित् होतो

**विधी, वीध**—स्त्री रस्ता, गल्ली विदी पहा [स वीथि]

**विन**—पु मुलगा, पुत्र, शब्द याचा उपयोग फक्त कागदीं पत्रीं करतात जसें-रामभट विन कृष्णभट [अर इब्न, फा बिन्]

**विन**—क्रिवि (अ) शिवाय, खेरीज वाचून, विना हा शब्द पुष्कळ वेळा नामाच्या मागें लावतात जसें-विन अपराध-घोर-तोड-दिक्कत इ० (आ) कधीं कधीं हा शब्द क्रियापदाच्या भूतकालाच्या रूपापुढें येतो जसें-'मी रुपये घेतल्याविन जाणार नाहीं' (इ) कधीं कधीं हा शब्द (राहित्याचा बोध असताहि) निरर्थक म्हणून योजतात जसें-विन पैशावाचून मौज [स विना] ०**आफत** क्रिवि (जमाबदी) काहीं अडचण किंवा हरकत न आल्यास (कामगिरी करता यईल) ०**कव(दे)ली**-स्त्री दुकाशीं खेळात जुगल्यानतर कदली पडावी ती न पडल्यानें झालेला पराजय -वि ज्याला कदली पडली किंवा पडत नाहीं असा (खेळणारा, खेळ) **विन कदलीवर येणें**-(ल) माडणाला सुरवात करणें, तिरगीमिरगीवर येणें, चिरडीस जाणें ०**कामी-खाली**-क्रिवि (ना) विनाकारण, व्यर्थ ०**खोट**-क्रिवि १ निःसशय २ बिनधोक ०**घोर-धोक**-क्रिवि भीति, शका किंवा कचर न बाळगता, निश्चित 'मुलानें ससार सभाळल्यानें मी आता विनघोर झालों' ०**जोड**-वि १ जोड नसलेलें, एकसंधी २ अद्वितीय ०**जोरी**-वि १ (बुद्धिबळें) दुसऱ्या मोहऱ्याचा किंवा प्याद्याचा आधार नसलेलें २ मारामारीचा (डाव) ०**डाकिल**-वि १ विन डाकाचें, एकसंधी, अराड २ (ल) शुद्ध 'विनडाकिल दागिन अमारिक प्रभाकराचे टरले।' ऐपो २२७ ०**तकार**-क्रिवि तकार न करता, मुकाट्यानें निमूटपणें ०**तोड**-स्त्री सोंगट्याच्या खेळातील दुसऱ्याची एकहि सोंगटी न मारता येणारी हार, पराजय -वि १ ज्यावर उपाय किंवा इलाज चालत नाहीं असा, आणीबाणीचा 'प्रसग विनतोड आहे'-चप्र ६ २ बरोबर लागू पडणारें, बिनचूक ३ सर्वोत्कृष्ट, अप्रतिम विनतोड पहा ०**दाद**-

क्रिवि दाद न लागतां, धेधडक, प्रतिकाररहित ' त्याजवर धनवान लोक अनेक वेळा जुलुम बिनदाद करू शकतात ' -नि ५० ०दिक्कत-क्रिवि १ बेधडक, अविचारानें, बेलाशक ' घरच्याधरीं बसून जगात चाललेल्या ल्हान मोठ्या गोष्टींवर बिनदिक्कत टीका करण्याची प्रो गोळ्याची हौस अनावर आहे कीं ' -टि ४ ३३७ २ बेफिकीर बिनघोर पहा ०घोर-क्रिवि बिनघोर पहा ०पोटी-वि पगार किंवा मजुरी घेतल्यावाचून केलेली, निर्वेतन (नोकरी, मजूरी) -क्रिवि पोटाला न मिळता (नोकरी करणें) ०भाड्याचें घर-न (उप) तुरुंग बंदखाना ०मजुरी-वि १ पगार न घेता केलेली बिनपगारी (नोकरी) २ श्रमाचे काम, मजुरी इ० माफ असलेली साधी (कैद टेप सजा) ०मोजचा या-वि १ ज्याबद्दल हिशेब द्यावा लागत नाहीं असें २ सरकारात रुजू न झालेलें न नोंदलेलें (घर, शेत इ०) ३ बेजबाबदार, बिनहिशेबी (बदरी माणूस) ०रेघ-रेषा-रषी-वि रषा किंवा वेसर नसलेला (आंबा) ०वार(री)स-वि वारस, कायदेशीर हक्कदार किंवा मालक नसलेला ०वारसा-पु वारसाचा किंवा इतर हक्काचा अभाव निवारसा पहा ०शर्त-क्रिवि कांहीं अट न घालता ०शाई-स्त्री (ना व) शिस्तपेनसील ०सूट-क्रिवि १ (बे) विचार न करता एकदम बेछूट २ सूट मोकळीक न देता ०हुली-स्त्रीवि फाशाच्या खेळातील एक पारिभाषिक शब्द हूल म्हणून सांगट्या खेळण्याचा एक प्रकार आहे

**बिनकूल**—क्रिवि (कु) (प्र) बिलकूल मुळींच अगदीं [अर बिल्कुल्]

**बिनगा बिनगी**—पुस्त्री मातीची तावें इ० धातूची विशिष्ट आकाराची कळशी ल्हान घागर बिंदगी पहा

**बिनवाजा**—पु (ना) बेंडवाजा पहा

**बिन(ना)सणें**—सक्रि बिघडविणें नासविणें खराब करणें नुकसान करणें नाश करणें -अक्रि १ बिघडणें, नासणें, नुक सान दुखापत होणें, खराब होणें २ (ल) नादिष्ट बनणें; तन्हेवाईक स्वैर अवखळ होणें (माणूस जनावर) ३ वाईट मार्गात शिरणें दुर्वर्तनी होणें ४ वाकडें येणें, बिघाड उत्पन्न होणें वितुष्ट येणें वदनाव होणें बाधा येणें ५ निष्फळ होणें व्यर्थ होणें फसणें, फिसकटणें (युक्ति बेत उद्योग योजना) [स वि+नश् हिं विनास] **बिन(ना)सणी**-स्त्री बिघडणें नासणें

**बिना**—पु समासामध्यें बाजूच्या कोऱ्या जागेंत लिहिलेली टीप प्रकरणाचा मथळा [बिनी तुल० अर बिना=पाया मूळ]

**बिना अलिग्यह**—आणि यावर -आदिलशाही फर्मानें [फा]

**बिनाइगी**—स्त्री बनार्‍ हें एक मर्दानी खेळांतील बोथाटी सारखें परंतु थोडें निराळें हत्यार आहे लगी बाण बोथाट्या दाट। बिनाइट्याचा खळखळाट।' -ऐपो २२६ [तुल० हिं बनैटी=हातात धरून फिरविण्याची, दोन्ही टोकास पेटलेली मशाल]

**बिनाखी**—स्त्री १ काळजीपूर्वक व बारकाईची पाहणी, तपासणी, चौकशी (क्रि० करणें) ' इमला अजमासें बिनाखी ' -वाडमा २ १७५ २ अशा तऱ्हेनें चौकशी करून झालेला निश्चय, ठराव ३ (किंमत खर्च इ० चा) अजमास किंमत (क्रि० करणें) [फा बीनाई]

**बिनावर**—शअ साठीं, करिता ' बिनावर मुलाजिमत शोर साहेब आले ' -पदमव ११६ [फा बिनावर्]

**बिनावरान**—शअ म्हणून, प्रमाणें ' तरी बिनावरान माल मात मनास आणून तुम्हास कौल महंमत केला आहे ' -रा १७ ३३ [फा]

**बिनामी**—वि १ खोटें, बनावट २ दुसऱ्याच्या नावावर केलेला (व्यवहार) बेनामी पहा [हिं] ०व्यवहार-पु आपल्या पैशानें आपल्याकरितां, फक्त दुसऱ्याच्या नावानें मिळकत विकत घेणें सरकारच्या किंवा सावकाराच्या धाकानें मिळकतीचा बचाव व्हावा म्हणून बहुश बिनामी व्यवहार होतात

**बिनी**—स्त्री १ सैन्याची आघाडी, म्होरप, बिन्दी ' घाय गुदे थोरात पाढर ल्गड होते बिनीला।' -ऐपो १९१ २ पागोट्याचें केळें, कपाळावर येणारा पुढचा भाग ३ दार, खिडकी इ० च्या चौकटीचा वरचा भाग ४ दार, खिडकी इ०च्या दोन फळ्यांतील फट बुजविण्याकरिता एकीस जी उभी पट्टी ठोक तात ती ५ समासात लिहिलेला सारांश किंवा प्रकरणाचा ल्हान मथळा बिना पहा ६ नाकावरची टोपी, नासात्राण ' टोपास बिन्या वगैरे बावन्न बिरदें सिद्ध होऊन गोटाबाहेर निघाले ' -भाव ५६ [फा बीनी=नाक] ०वर असणें-सर्वांच्या पुढें असणें

**बिनीचा**—वि १ पुढचा; आघाडीच्या भागाचा २ (ल) मुख्य, अग्रगण्य पहिल्या प्रतीचा (सैनिक गवई चोर, सोदा, भामटा) ०दार-वि (नाक असलेलें) बळीच्या खालच्या बाजूस पुढें आलेला भाग असलेलें बिनी किंवा केळें असलेलें(पागोटें) [फा] ०पट्टी स्त्री नासात्राण, घोणात्राण -राभवको ४ १६ ०वाला-पु १ बिनीतील शिपाई इसम २ सैन्याच्या हालचाली व तळ देण्यासंबधानें मराठ्यांच्या सैन्याच्या आघाडीवरील अधिकारी (इं) क्वार्टरमास्टर-जनरल

**बिफरणें**—अक्रि १ स्वैर व स्वच्छंदी बनणें, भडकणें, मोकाट सुटणें २ बेशिस्त अव्यवस्थित बनणें ३ कुंठित होणें ऱ्हास पावणें (कामधंदा) बियरणें पहा [हिं बिफरना=तिरसट होणें]

**बिफळ**—न एक फळ [हिं]

**बिंब**—न १ चंद्र सूर्य ग्रह इ०चें मंडळ 'भुम्ररनाची विजुरीं। वाजतिया वायूतें जरी होकारी। कां सूर्यबिंबामाझारीं। आंधारें

शिरे।' -ज्ञा ९ १२५ २ सूर्यमंडल 'जैसें बिंब तरी थचकें एवढें। परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडें।' -ज्ञा ४ २१५ ३ आरसा, पाणी इ०च्या पृष्ठभागावर ज्याचें प्रतिबिंब दिसतें तो पदार्थ याच्या उलट प्रतिबिंब ४ राज्यादि अधिकारावर असतां परा क्रमादि गुण असोत किंवा नसोत पण ज्याच्या उपस्थितीमुळें खालच्या माणसांना शोभा येते, आवेश चढतो असा पुरुष, पदार्थ 'सरदारलोक जाऊन लढाई देतील परंतु राजाचा पुत्र उगीच बिंब म्हणून बरोबर घ्यावा' ५ (साहित्य) दृष्टांत, प्रमाण इ०नीं प्रति पादन करावयाचा विषय, प्रतिपाद्य अर्थ ६ मूर्ति; प्रतिमा 'तो घालतें ज्ञानाचें बिंब। तयाचे अवयव ते सुखाचे कोंभ।' -ज्ञा १० ७७ ७ ओंकाराची अर्धमात्रा 'तववरी तो समीरु। निराळीं कीजे स्थिरु। मग लग्नीं जैसि ॐकारु। बिंबींचि बिलसे।' -ज्ञा ८ ११६ ८ प्रतिबिंब, प्रतिच्छाया ९ (पिकलेलें) तोंडलें [स]०दान-न जन्मराशीस रवि किंवा चंद्र असतां ग्रहणाच्या वेळीं शांत्यर्थ करावयाचें सोन्यारुप्याचें बिंबदान ०प्रतिबिंबभाव-पु बिंबभूत व प्रतिबिंबभूत अर्थाचा परस्पर संबंध ०फळ, बिंबा(बी)फळ-न पिकलेलें तोंडलें 'अधर दोन्ही जाले सधर। बिंबफळें रंगाकार।' -एरुस्व ७ २८ 'भासे मनात मजबिंबफळभ्रमानें। -र १५

**बिंबाधर**-पु (काव्य) तोंडल्याच्या फळाप्रमाणें असलेले ओंठ तांबडे ओंठ -वि बिंबाप्रमाणें लाल ओंठ असणारी (स्त्री, सुंदरी) 'मधुरा बिंबाधरा।' -शारदा [बिंब+अधर] **बिंबोष्ठ**-पु खालचा ओंठ बिंबोष्ठ तळहस्तें स्पर्शोनी। श्रीधर नाम उच्चारावें। -गुच ३६ १५८ [बिंब+ओष्ठ]

**बिंब-बी**—न स्त्री नागरमोथा भातखाचरात, दलदलींत उगवणारें त्रिधारी गवत

**बिंबट**—न १ बिब्ब्याचें बोंड २ बिब्ब्याच्या आकाराचा आणि वर्णाचा ठिपका (बिबळ्या वाघाच्या अंगावरील) ३ चित्ता, बिब्या वाघ [बिबा] **बिंबटा**-वि बिब्ब्याप्रमाणें अंगावर ठिपके असलेला (वाघ, चित्ता, मांजर) **बिबटें**-न १ बिब्ब्याप्रमाणें दिसणारा ठिपका २ बिब्ब्याचें बी

**बिंबणें**—अक्रि १ (ज्ञान शिक्षण इ० मनांत) ठसणें उत रणें परिणामकारक होणें बिसवू नये सर्वथा ब्रह्मविद्या। तरी बोध बिंबोनि नासे अविद्या।' २ भासणें, उत्पन्न होणें 'तैसें सकळ हें मूर्त। जाण पां मायाकारित। जैसें आकाशीं बिंबत। अभ्रपटळ।' -ज्ञा २ १६८ ३ उमटणें -तुगा [बिंब] **बिंबित**-वि १ (शब्दश) प्रतिबिंबित, परावृत्त २ (विरू) बिंबलेलें ठसलेलें [बिंब]

**बिंबत**—स्त्री (कु) राख, बिभुत (प्र) विभूत [स विभूति]

**बिंबला-ली**—स्त्री एक प्रकारचें झाड **बिंबलें**-न बिंब ल्याचें फळ हें आंबट असून याचें लोणचें घालतात शाको ५ ४८

**बिंबली**—स्त्री (कु) एक प्रकारचें रानगवत

**बिबवा**—पु एक प्रकारचें औषधी फळ, बिब्बा ह्याचें तेल अंगाला लागलें असता उततें ह्या तेलानें परीट खुणा करतात [सं भल्लातक हिं भिलावा, ब भेला; गुज भिलामा, उत्कल भल्लि, द्रा बिडी; भिलवना, पोर्तु को बिबो] (कामावर)०घालणें-मार्गांत विघ्न उपस्थित करून काम बिघडविणें, कामांत हरकत आणणें, कुंठित करणें, मोडा घालणें **बिबव्याचें शेवतें देणें**-बिबा दिव्यावर जाळून त्याच्या तेलाचे कांहीं थेंब दुधांत किंवा लोण्यांत पाडून देणें जुलाब थांबविण्यासाठीं हें देतात शेवतें पहा **बिबवी**-स्त्री बिबव्याचें झाड **बिबवेल**-न बिबव्याचें तेल [बिबवा+तेल]

**बिबी-व्वी**-स्त्री १ बिब्ब्याचें झाड २ पिकलेला बिबा **बिबीची माळ**-बिबीच्या फळाची माळ **बिबोटी**-स्त्री बिब्याचें बोंड

**बि(बिं)बळा**—पु एक जंगली झाड चिंबळा पहा

**बिबळा बिबळावाघ बिबळ्यावाघ, बिब्यावाघ**—पु अंगावर बिब्ब्यासारखे ठिपके असलेला वाघ, चित्ता

**बिबा-ब्बा**—पु १ भेरा; भिलावा बिबवा पहा २ (ल) चिडखोर गृहस्थ 'चिडका बिब्बा चोडला, तेलांत जाऊन बुडला' ०घालणें-(कामात) अडचणी उपस्थित करणें, (काम) बिघडविणें ०चिडणें-(ल) रागावणें ०फासणें-(ल) मोडा घालणें अडचणी उपस्थित करणें नाहीं तर, न जाणों, ती यायचीच तिकडे बिबा फासन' -मोर १० ०येणें-बिब्बा अंगावर फुटणें, उतणें **बिबेल**-बिब्याचें तेल **बिबोटी**-बिब्याचें बोंड बिबट अर्थ १ पहा

**बिबों-चो**—पु (गो) सुकण्यापूर्वीची काजूची बी कोंवळा काजू ओला काजू गर

**बिबों**—पु (गो) लुगडयाचा ल्हान चौकोन, घडी

**बिब्री-ब्री**—स्त्री एक झाड याच्या साल-पानापासून डिंक निघतो व तो कातडी कमविण्याच्या उपयोगी आहे

**बिबी व्वी**—स्त्री १ कुलीन मुसलमान स्त्री २ थोर मुसल- मान गृहस्थाची बायको [फा बीबी] **म्ह०** बिबी आये उमरी तो मिया चले क्बरी

**बिभु(भू)त**—स्त्री (कु गो) अभिमंत्रित राख अंगारा भस्म [स विभूति]

**बिंबूड**—नस्त्री बींबूड पहा [बी+बुडणें]

**बिम्मा-भी**—(राजा) (विरू) बिबवा-वी पहा

**बिभ(भि)त्स**—वि (अप) बीभत्स पहा [स बीभत्स] ०दृष्टि-स्त्री (नृत्य) किळसवाणी गोष्ट पाहिली असता पापण्या व डोळयाच्या दोन्ही कोपऱ्यातील भाग आकुंचित होतात तसें करणें हा बीभत्सरसाचा अभिनय होय

**बिभास**—पु (संगीत) एक राग ह्याचे दोन प्रकार आहेत पहिल्यात षड्ज कोमल ऋषभ, तीव्र गांधार, पंचम कोमल धैवत

हे स्वर लागतात जाति औडुव-औडुव वादी धैवत व संवादी गांधार गानसमय प्रातःकाळ दुसऱ्यांत षड्ज, कोमल ऋषभ, तीव्र गांधार तीव्र मध्यम, पंचम, तीव्र धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात जाति संपूर्ण-संपूर्ण वादी धैवत व संवादी गांधार गानसमय प्रातःकाळ 'सप्तस्वर षड्राग रागिणी विभास आळविलों।' -देप ८५

विमीतक—पु १ एक प्रकारचें झाड किंवा त्याचें फळ २ (विरू) बिब्बा, त्याचें झाड [स]

विमूत—स्त्री राख, लाकूड इ॰ची राख, कपाळावर लावण्याचें भस्म, विभूत [सं विभूति] म्हू॰ विभूतीचें मूठ रेडयाच्या गांडींत

विम—पु (गो) एक प्रकारचें गवत

विमा, विमेदार—विमा, विमेदार पहा [हिं]

विमारी—स्त्री आजार बिमारी [फा बीमारी]

विमुरी—स्त्री दुतोंडी जातीचा एक साप, मांडुळ [हिं बे+बी+मुख]

वियंबी—स्त्री (राजा) कोंवळया आंब्याची खारवून टेव लेली कैरी, वेहवी [बी+आंबा]

वियपणी—न (राजा) पिकलेलीं कोंकंवें फोडून त्यांतील गिराचें करतात तें सार, पन्हें [बी+पाणी]

वियाणें—न १ लागणीसाठीं ठेवलेलें उसाचे दांडे, बेणें २ मनुष्य, पशु इ॰ चें उत्पत्तिकारण, बीज, (गुणदोष वगात उत्पन्न करणारें) 'आमचे घरचे गुराचें वियाणेंच असें आहे कीं जें गुरूं होतें तें दुधाळ होतें' [स बीज] वियाणें, वियावळ—नस्त्री मुद्दाम चांगलीं म्हणून पेरावयासाठीं ठेविलेलीं बीजें, बी वियाण्यास नसणें—पूर्णपणें संपणें, खलास होणें, पत्ता होणें

विरकांडी—स्त्री (विणकाम) विणकऱ्याचा घोटा [भिरें+कांडी]

विरकुंड-डें—न (विरू) विरखुडें पहा

विरखूल—न १ ल्हान तोंडाची व फुगीर पोटाची बाबूंची पाटी २ बुरखूल पहा

विरखं(कं)ड-डें विरखडा—नपु (विरू) विरखुडें पहा

विरखडणें—उक्रि ओरखडणें (कागद, भिंत इ॰), रेघोटया, चित्र इ॰ काढून चितारणें -अक्रि घाईघाईनें वडेवाकडें लिहिणें, (श्लोक, वाक्य इ॰) खरडणें [विरखडी]

विरख(खु)डी—स्त्री १ निष्काळजीपणानें काढलेलें चित्र आकृति कागद भिंत इ॰वर ओढलेली रेघोटी 'त्या नकाशावर विरखुडया ओढल्या' -बाळ २ ४० २ ज्यास वळण नाहीं असें घाईघाईनें लिहिलेलें वाकडेंतिकडें अक्षर भरकटून लिहिणें [भिरें+खोडणें]

विरखुंड-डें—न १ गामा, भेंड, (गोम, जोंधळ्याचें ताट इ॰चा) गीर, मगज २ दाणे काढून घेतलेलें कणसा, जोंधळा, बाजरी यांचें कणीस, बिगुल विरखुंडा-पु विरखुड अर्थ २ पहा

विरगावणें—अक्रि (व) रागावणें, वियरणें

विरजणें—अक्रि (व) येऊन टेपणें, तयार होणें 'तो तयें येऊन विरजला तेव्हां आम्हास विचार पडला' [विराजणें; स वि+राज्]

विरंजी—स्त्री (ना) तारखिळा, चूक.

विरंजी—वि पितळी -दिमरा २ १६५ [फा बिरंज् = पितळ]

विरजुमाल—क्रिवि एकत्र, एकवट समाईकीत असलेलें शेत, जमीन, मालमत्ता इ॰ [अर बर्=जमीन+जुम्ला=समुदाय] विरजुमाली-वि एकवट, समाईक असलेलें (शेत घर इ॰)

विरडा—पु विरडें अर्थ १ पहा

विरडी-डीं—स्त्री भिजत घालून मोड आणलेला पावटा किंवा वाल विरडें-डें-१ मोड आलेल्या पावटे, वाल इ॰काची उसळ २ (यावरून) कोणतेंहि पातळ कालवण

विरडी—स्त्री १ घुसळण्याची दोरी 'वासुकीची यास विरडी। मग समुद्र मथिला कडोविकडीं।' -ह७ १८४ २ गुंडी, खिरडें 'ते कडेलीं काकणाचीं हातीं। मौक्तिकाची विरडी मुदि लानी।' -शिशु ६५९

विरडें-डें—न १ (अंगरखा, सदरा इ॰ची) गुंडी किंवा गुंडी घालण्याचें भोंक, काजें, बळसा २ (दावें इ॰च्या) वळ-ग्रांत अडकवावयाची गांठ ३ गांठ (चोळी इ॰) -भाए २३३ 'ज्याचिया कृपादृष्टीपुढें। जीवशिवाचें फिटे विरडें।' -एभा २४ ४२ ४ घोंगाळा, कोडें 'कणावेगळा कोंडा न वाढे। तेवीं पुरुषा वेगळी प्रकृति नातुडे। हें प्रकृतिपुरुषाचें विरडें। तुजवेगळें निवाडें निवडेना।' -एभा २२ ३३८ ५ (हेट) ल्हान आकाराचें कड बोळें ६ विरडी पहा

विरडें—न समूह थवा 'मागें पावलें विरडें राक्षसाचें।' -गीता ३ २१५

विरद—न (विरू) विरोद, बिरुद पहा विरदाईत—वि विशिष्ट विद्या गुण इ॰मध्यें वाकबगार (पंडित, पुराणीक, गवई, इ॰) कांहीं श्रेष्ठ गुणाबद्दल चिन्ह धारण करतो तो [स बिरुद] विरदावळी—स्त्री गुण पराक्रम, श्रेष्ठता इ॰दर्शक चिन्हांची माळ, बिरुदावली पहा

विरबल—पु १ अकबर बादशहाच्या एका हुशार व चतुर प्रधानाचें नांव २ (यावरून) चतुर व धारणी मनुष्य ३ (कु) नकटा 'ह्या विरबलाचें नांव काय ठेविलें।' विरबली—स्त्री युक्ति, खुबी 'त्यानें विरबली लढवून काम केलें' [विरबल]

**विरबाहुटी**—स्त्री १ कुकवाचा किडा, सोनकिडा, ताम्रकृमि २ (ल) छानछनेली 'ज्ञान अजन घालून डोळा बनली विर बाहुटी।' –पला १३९५ [ हिं वीरबहुटी, वीरबहूटी ]

**विरविटी**—स्त्री ज्याचा गोळा करता येत नाहीं पण जें साधारणपणें घट्ट आहे असें शेण, लोणी, कालवलेलें पीठ इ०कोण ताहि लिबलिबीत पदार्थ [ वरवट ]

**विरविर-रा**—क्रिवि. (विरू) भिरभिर पहा

**विरविरीत**—वि विरविटीरूप, ज्याचा गोळा बनविता येण्याजोगा नाहीं असें लिबलिबीत, पातळसर

**विरंबु(बो)टा, विरमु(मो)टा**—पु ज्याचे दाणे काढून घेतले आहेत असें मक्याचें कणीस, विरसुड

**विरंबोळा**—पु १ एक वन्य वनस्पति २ त्याचा कादा कदयुक्त मूळ

**विरमत**—स्त्री (गो) ब्रह्महत्या [ स ब्रह्महत्या अप ]

**विरमत**—न (कु) लचाड, आळ विरामत, वलामत पहा

**विरमुटी**—स्त्री (कों गो) चितुर, एक प्रकारचा किडा विरबाहुटी पहा

**विरयां**—क्रिवि (गो) मरचड करण्यासाठीं, इरेनें, इरेस

**विरयाऊ लागून काम करप**—इराम पेट्न काम करणें [स वीर्य]

**विरवण**—स्त्री (कों) आकृति नक्षीकाम (लाकूड, भिंत, कापड, भाडें इ० वरील) कोरीवकाम किंवा नक्षीकाम –स्त्रीन (कु) चीविरवण पहा **विरविणें**–सक्रि (सोनें, चादी, सोन्याची तार, रेशीम इ० च्या) नक्षीकामानें सजविणें, (वस्त्र इ० स) शोभा आणणें [ विरवण ]

**विरसुडणें**—उक्रि १ (खोड, फादी इ० चीं) पानें तोडून, ओरबडून काढणें, भिड(र)सुडणें पहा २ पानें (किडीनीं) खाऊन फाया पर्णरहित करणें

**विरेस्तार**—पु (गो) बृहस्पतिवार गुरुवार [ स बृह स्पति+वार, अप ]

**विराड**—न (कु गो) विऱ्हाड पहा

**विराणा**—पु बदुकीच्या दारूचा दाणा, कण [ हिं विरनी =लहान दाणा ] ०दारू, **विराण्याची दारू**–स्त्री रवदार, कणीदार बदुकीची दारू

**विराणा**—पु वीरपुरुष, वीरभद्र [ वीरराणा ]

**विराणा**—पु (गवई लोकात रूढ) तबल्यावरच्या शाईमध्यें पडणारी चीर 'विराणा मोठा पडला [तुल० का विरि=फुटणें तडकणें ]

**विराणा-ना**—वि परका तिऱ्हाईत, अनोळखी, एखाद्याचें कुटुंब, गोत, देश इ० तील नव्हे असा तो आम्हास विराणा आहे '[ हिं विराना ]

**विरादर**—पु भाऊ, भाऊबद (सनदा, रोखे, दस्तैवज इ० मध्यें वापरतात) 'नाईकवाडी कसबे मजकूर याचे विरादरीत विठोजी बिन हसाजी '–शाछ ११५२ [फा. बिरादर्] ०**भाऊ**–पु (व्यापक) जातभाई, नातलग, सगासोयरा **विरादरी**–स्त्री १ बंधुसमाज, जमात २ भाऊपण, बधुभाव ' विरादरीसारखी चाल उभय दौलतींची आहे '–रा ५ ८६ ३ भाऊपदकी 'खाशाची चोली तैनात बरहुकूम विरादरी '–वाडबाबा १ ५५ [ फा ]

**विरामण**—पु (कु) ब्राह्मण. [ स ब्राह्मण ]

**विरामत**—स्त्री खोटा आरोप, आळ (क्रि० घालणें, आणणें, येणें) वलामत, वलागत पहा [ फा बर्–आमद् ]

**विरार**—पु विकार

**विरार**—पु (महानु) स्पर्धा 'मुदिया चे हीरे। आगुळियां तेजा चे वानसरें। करिताति विरारें। एकमेकें सी। ' –शिशु ४०३

**विरियाणी, विर्याणी**—स्त्री मासमिश्रित मसालेभात, एक मुसलमानी पक्वान्न पुलावा पहा [ फा बिर्यानी ]

**विरी**—स्त्री स्त्रियाचा कानातील एक दागिना [ हिं वीर ]

**विरी**—स्त्री (गो) पोंवली, पोफळीच्या पोयचा द्रोण विरी पहा [ विरी ]

**विरीज विरीज होणें**—अक्रि (व) टेंकीस येणें, तकलीफ पावणें ' पैशासाठीं विरीज विरीज झाला '

**विरी(रु)द**—न १ विद्या–कलादि गुणात श्रेष्ठत्व असल्याचें चिन्ह म्हणून हात, दड इ०स बाधतात तो दोरा, गडा, बाहुभूषण 'उष्ट्रानीं विरिदें बाधोन। तुबरापुढें माडिलें गायन। ' –एभा ५ ८३ ' जिवाचे धास्तीनें बावन बिरुदाचे धणी, भले सर्दार, घोडे सोडून जीव जगविण्याकरिता पहाडात शिरले ' –भाव ९१ २ ब्रीद बाणा, प्रतिज्ञा, अगीं असलेल्या गुणाबद्दल वाटणारा अभिमान परी अर्जुना तुझेनि वेधें। मिया देवपणाची विरुदें।' –ज्ञा १८ १३७२ ३ चिन्ह ४ नावलौकिक, कीर्ति 'तेथोनि तीर्थी शिरोमणी ऐसें विरुद जालें। –दाव १७५ [ स विरुद ] ०चत–वि यशस्वी –शर **विरुदाई(यि)त**–वि प्रतिज्ञा करून पाळणारा बाणेदार बाणा बाळगणारा ब्रिदाईत. ' ऐसीं मिळोनि विरुदायितें। आलीं बदरिकाश्रमा समस्तें। '–एभा ४ ८० **विरु-दावलि**–स्त्री विरुदाची माळ [ स विरुद+आवलि ]

**विरुस**—वि (वे) कठिण [ का विरुसु ]

**विरोजा**—पु निळ्या हिरव्या रंगाचा एक पाषाण यास रत्न म्हणतात यात भविष्य समजण्याचा अद्भुत गुण आहे अशी समजूत आहे

**विरोबा**—पु १ (अशिष्ट) भैरव २ खडेराव, खडोबा लोक खडोबाच्या ठिकाणीं ५२ वीर आहेत अशी कल्पना करीत असल्यानें

नीर शब्दापासुन हा शब्द तयार झाला असेल [स भैरव, म बीर स वीर]

विर्ज—(कों) माशाची एक जात हे मासे आक्टोबर–नोव्हेंबर महिन्यात पकडतात

विर्जुमाल—वि (राजा कुण) समाईक, विरजुमाल पहा

विर्मत—स्त्री (गो) खोटा आरोप आळ विरामत पहा ०घेवप–(गो) आरोप ठेवणें, आळ घालणें ०फुटप–(गो) प्रायश्चित्त भोगणें

विर्मुट-टी—स्त्री (गो) एक प्रकारचें फुलपाखरू

विर्मुट-टी—स्त्री दाइ मारण्याचा एक प्रकार [स वीरमुष्टि म वीर+मूठ]

बिन्हाड—न १ रहावयासाठीं भाड्यानें घेतलेली जागा, घर, खोली इ० हें आमचें बिन्हाड हवाशीर आहे' २ एखाद्या ठिकाणीं उतरून काहीं काळ राहणें, मुक्काम, वसति वास्तव्य 'ह्या खोलीत दुसऱ्याचें बिन्हाड आहे' ३ बिन्हाडकरूचें सामानसुमान खटलें चीजवस्त ससार 'आम्हीं यथून बिन्हाड उचलून तिकडे नलें ४ तळाचा किंवा व्यापारी मडळीच्या फिरत्या स्वारीचा निराळा भाग एकाच ०नापाऱ्याच्या सामानाचा (माल, तबू गुरें इ०चा) एकत्र स्वतत्र समुदाय (तळावरील किंवा वाटवरील) ५ भाड्यानें, भाडेक याप्रमाणें राहणें आम्ही तर्ते बिन्हाडानें आहों ६ भाड्यानें दुसऱ्याच्या घरात राहणारें कुटुब, भाडेकरू ७ गुप्तपणा, स्पष्टपणें न बोलता चोरून ठेवलेला मुद्दा मजकूर घरोब्यानें बोलत असता थान बिन्हाड टेवणें चागलें नव्हे [विड(डा)दूर पहा] ०आटोपणें–१ गाशा गडाळणें निघून जाणें २ मरणें ०उचलणें–एखाद्या ठिकाणाहून आपल। चीजवस्त घेउन निघून जाणें; तळ हलविणें ०करणें १ कायमचें वास्तव्य करावयाच्या उद्देशानें आपल्या सामानासुमानासह बायकामुलासह एखाद्या ठिकाणीं राहणें २ एखाद्याच्या इच्छाविरुद्ध त्याच्या घरीं किंवा शरीरात ठाणें करून राहणें कफानें माझ्या छातींत बिन्हाड केलें आहे' **विंचवाचें बिन्हाड पाठावर** पाठीवर घर जवळ नसणें सामाशब्द– ०करी–करू, बिन्हाडू–पु १भाड्यानें बिन्हाड करून राहणारा इसम २ बिन्हाडाचा मालक किंवा रहिवाशी बिन्हाड अर्थ ४ पहा ०खर्च–पु बिन्हाड करून राहण्याबद्दल पडणारा जागेचें भाडें वगैरेचा खर्च ०बाजलें–न वाडबिस्तरा सामानसुमान चीजवस्त वगैरे (स्वामी इसमाचें); खटलें **बिन्हाड बाजलें सगातीच असणें**–घर बायकामुलें इ०पासून अलिप्त मोकळें असणें मागें पुढें वर नसणें सडेसोट असणें

बिल—न १ भोंक बीळ उदीर घुस साप इ०चें राहण्याचें घर २ श्वापदादिकाची गुहा बीळ पहा [स]

बिल—न १ विकलेल्या जिनसाची किंवा केलेल्या कामाची याद व त्याबद्दलच्या पैशाची मागणी २ कौन्सिलात चर्चिला जावयाचा कायद्याचा मसुदा, खर्डा ३ पत्रक, याद, तपशील [इ]

बिल्एकरुई—क्रिवि एकनिष्ठपणें 'तरी बिल्एकरुई ददतर चितारूढ करितील'–रा ६ ६०२ [फा बिल्+यकुरूई]

बिलकावणें—अक्रि (कु) ऐटीनें रिकामें फिरणें, चैन करणें

बिलकु(कु)ल—क्रिवि १ शिल्क न राखता पूर्णपणें, एकूण एक 'गुजारत परशराम खडेराव याजकडे वाडा शुक्रवार पेथील भोजनखर्चाचें वगैरे बिलकूल'–वाडदुबा ४२ २ अगदीं, मुळींच (नाहीं) [अर बिल्कुल्]

बिलग—वि वेगळा, निराळा; पृथक्, विभक्त बिल्ग पहा [स विलग्न, म बिल्ग हिं बिल्ग]

बिलगणी—स्त्री चिकटणें, भिडणें इ० [बिलगणें]

बिलगणें—अक्रि १ चिकटणें अगदीं जवळ राहणें, जाणें २ कवटाळणें मिठी मारणें घट्ट धरणें आवळणें ३ (ल) निश्चयानें चाल करणें धावून जाणें; (मारावें, ध्यावें, लुटावें इ० कारणासाठीं) एखाद्याच्या अगाला झोंबणें [स विलग्न, बिल्ग, हिं बिलगना]

बिलद-दी बिलदर—वि १ मुख्य प्रधान, श्रेष्ठ, पहिल्या प्रतीचा २ उच दुर्गम, बलाग, अघाग 'कशीरगड किल्ला मात बर बिलद आहे –पारसनीस ब्रप ६४ 'पहाडी किल्ला असा एका दिवसात यावा असें काहीं नाहीं, किल्ला फार बिलदर आहे' –चदचूड दप्तर १ १११ ३ (ल) पक्का अट्टल ठकबाज (लुच्चा, भामटा चोर) जसें-बिलद–चोर–सोदा–भगट–हरामी 'रमाकात कारभारी हा बिलदर लुच्चा असल्यामुळें त्याचे पक्षास बरेच लोक होते'–निच [फा बुलद]

बिलदी—स्त्री गाण्यातील एक ताल [फा बुलदी]

बिलपद—न बिलब कालात तलवार वाजविण्याचा एक प्रकार –कला १३७ [स विलवित बिलब+पद]

बिलबिल—अ (गो) माजरास बोलाविण्याचा एक शब्द [ध्व]

बिलबिलणें—अक्रि अगदीं मऊ नरम बिलबिलीत होणें (फळ इ०) [बिलबिलीत]

बिलबिला बिलबिलीत—वि १ नरम चपचपणारा, लिबलिबीत शिळें झाल्यामुळें, अतिशय पिकल्यामुळें चाळवटल्यामुळें फारच मऊ असें (फळ गर इ०) २ (ल) कष्टाच्या कामामुळें दीन गरीब झालेला; निर्वीर्य झालेला (माणूस, जनावर इ०) [लिबलिबीत लवचिक अनुकरण वाचक]

बिल्बी—स्त्री एक फळझाड

बिल्मोगरा—पु बन्मोगरा 'फोडीन मोती। घालीन चारा। दाखवीन वारा। बिलमोगरा बिल्मोगरा।'–मसाप २ २३३

नियमाला धरून खरेदीविक्री झाल्याचा लेख असा शेरा, हुंडी, करारनामा, संक्षेपत्र, खत इ०वर मारतात [ हिं वेचना=विकणें ]

**वेचरणें**—अक्रि १ ( खरूज, नायटा, इसब इ० ) पसरणें २ केस डोक्यावर अस्ताव्यस्त विखुरणें, अस्ताव्यस्त होणें [ स वि+चर् ]

**वे(वें)चळ, वेचाड-ट**—न जुवाड, झुबका 'मग अणि याचें वेंचळ। अर्धी दावी।'-ज्ञा १५ ९३ [ प्रा ]

**वेचाळ, वेचाळीस**—वि ४२ही संख्या [स द्विचत्वारिंशत्] **वेचाळीस-पुअव** वेचाळीस पिढ्या ( मातृवंशाकडील एकवीस व पितृवंशाकडील एकवीस ) ( या शब्दाचा उपयोग शपथ घेताना किंवा शिव्या देताना करतात ) 'तू वेचाळीस स्मरून बोल' **०उध्दरणें**-एखाद्याच्या वेचाळीस पिढ्याना उद्देशून शिव्या देणें ( **कागद, पत्र, लखोटा इ०वर** ) **वेचाळीसचा अंक असणें**-पत्रात मृत्यूची बातमी असणें **वेचाळीसचा अंक घालणें**-१ वेचाळीस पिढ्याना शिव्या देणें २ ( पत्रावर, पाकिटावर ) वेचाळीसाचा आकडा लिहिणें ( अशा करिता कीं पत्र ज्याच्या नावाचें असेल त्यानेंच तें उघडावयाचें आहे हें सुचविण्याकरिता )

**वेचाळी, वेचाळें-ळ**—स्त्री १ जबडा, चर्वण करण्याचे मुखाचे जे दोन भाग त्यातील खालचा विशेषत पशूसंबधीं व रागानें किंवा तिरस्कारानें मनुष्यासंबधीं बोलताना योजितात 'उणा शब्द बोललास तर वेचाळी फोडून काढीन' २ हनुवटी व खालचा ओठ यामधील खळगा बचेळी, वचळी पहा

**वेजवी**—वि व्यर्थ

**वेजें, वेंझें**—न १ युक्ति, वर्म 'चुकलया त्यागाचें वेंझें। कीं सर्व त्यागहि होय वोझें।'-माज्ञा १८ १३४ २ दुबेळकें, फाल्क [ प्रा ]

**वेजार**—क्रिवि जोरानें जोरावारीनें [फा वी+झोर् ]

**वेझोर**—पु हा दगड काहीं प्राण्याच्या शरीरात ( विशेषत इराणी रानबकऱ्याच्या शरीरात ) सापडतो ह्यापासूनहि कृत्रिम वेझोर तयार करतात बकरा, उंट मासा, साप यापैकीं ज्याच्या शरीरात सापडला असेल त्याप्रमाणें हा खडा निरनिराळ्या प्रकारचा असतो सर्पाच्या शरीरात सापडलेल्या खड्याला सर्पमणि म्हणतात खरा पौरस्त्य वेझोर अंडाकृति व अक्रोडाहून लहान असतो हा गुळगुळीत व चकचकीत असून थरांचा बनलेला असतो हा सर्व ओलावा आकर्षण करून घेतो यावरूनच याच्या अंगीं विष उतरण्याचा धर्म आहे अशी समजूत आहे -ज्ञाको ( व ) १५९

**वेट**—न १ सर्व बाजूनीं पाण्यानें वेढिलेली जमीन द्वीप २ एकाच प्रकारच्या झाडाचा समुदाय, जूट, जुवाट उदा० केळी, वेळू दर्भ इ० ३ ज्या वृक्षादिकाच्या मुळ्यास अंकुर फुटून अनेक वृक्षादि होतात असा केळी वेळू दर्भ याचा समुदाय ४ ( ल ) ( मित्र किंवा नातलगाचा ) समुदाय, गर्दी, दाटी 'बट सावताचें भारी पडलें मुकाशाचे नात्यानें गावची वेठबगार घेत गले' [ स द्वीप; का ब्यट्, सिं बेट्ु ] **वेटीं लागणें**-१ ( पोहणारा ) तडीस लागणें, उथळ पाण्यात येऊन पोंहोचणें २ (ल) ( एखादें काम ) निश्चित स्वरूपाला, रंगारूपाला, आकाराला येणें

**बेटका**—पु बक्टा, ओलविलेला गहू जोंधळा

**वेटकुळी**—स्त्री १ (वयानें किंवा आकारानें) लहान बेडकी. २ दंड किंवा पायाच्या पिंडरींतील स्नायूंच्या आकुंचनामुळें येणारा गोळा (क्रि० काढणें, उठवणें; दाखवणें) ३ बेडकुळीप्रमाणें उड्या मारण्याचा एक मुलाचा खेळ -मराठी खेळाचें पुस्तक पृ १३९

**वेटणें, वेटमोरा**—नपु सोनाराची आवटी **वेटणें**-उक्रि पत्र्यावर शिक्का उठविणें, उठणें, पत्रा दागिना इ० वर छाप किंवा ठसा उमटविणें, उमटणें, आवटीवरील ठसा धातूच्या पत्र्यावर उठवून घेण्यासाठीं तो आवटीवर ठोकणें **वेटणी**-स्त्री १ ठसा उमटविण्याची क्रिया २ सोनाराची आवटी [ वेटणें ] **वेटीव**-वि शिक्का मारलेला, ठसा उठविलेला छाप मारलेला, आवटीवर किंवा वेटणीवर ठोकलेला याच्या उलट थळीव

**वेटवनी**—स्त्री ( कैकाडी, सांकेतिक ) कुऱ्हाड

**वेटा**—पु १ मुलगा, पुत्र छोकरा २ पादपूरणार्थक शब्द वेटा किंवा वेट्याचा हा पादपूरणार्थक किंवा अलंकारिक शब्द म्हणून वापरण्याचा पुष्कळ प्रघात आहे उदा० 'काय वेटा घोडा चांगला आहे !' [ हिं, द प्रा नि', सिं बेटो ] **वेटी**-स्त्री कन्या, मुलगी ( या शब्दाचा वरील अर्थी क्वचितच उपयोग होतो परंतु वाक्यालंकार म्हणून वरप्रमाणें उपयोग करितात ) [ हिं ] **म्ह०** पहिली बेटी मालाची (धनाची) पेटी **०व्यवहार**-पु सोयरीक

**वेटाड**—न १ वेट याचें तुच्छतादर्शक रूप २ मुळ्याचें जुनाड, मुळें व तंतू याचा गुंता ३ (शेतातील किंवा मैदानावरील) तोडलेला, अलग ठेवलेला, उंचवट्याचा भाग ४ ( ल ) मोठें व लाबवर विस्तार पावलेलें घराणें, टोळी संघ, जमाव, गर्दी [वेट]

**वेठण**—न कापडाच्या गांठीभोंवतीं गुंडाळलेलें वस्त्र, वस्ता, वेष्टन [ स वेष्टन ]

**वेठी**—न अर्धवट पिकलेलें फळ

**वेठें शीत वेटें-वेठा भात**—नपु ( गो ) पेज न काढता केलेला भात ( गोव्याकडे भाताचे तादूळ शिजले म्हणजे त्यातील सर्व पाणी काढून टाकतात )

**वेंड**—न १ उटाणू गड्डू सुज स्फोट २ मोठी वेंधी, उंच वाढलेली वेंधी ३ कानू वेंडभोंवरा इ०चे मागील देंठ वोंड ४ गुदभ्रंश होऊन पश्चिमद्वारानें बाहेर आलेला आतड्याचा भाग ५ नाळचें किंवा गर्भनाडीचें वेगोळें ६ (माण) कडब्याच्या बुचड्या लावताना अगोदर धुरचीच पोटात कण्यादू असा उभा केलेला कडवा ७ (कों)

विहिरीच्या तोंडाभोवताली बांधलेला दगडी कठडा ८ (ल ) गुप्त गाठ [ हिं ] ०फुटणें-बाहेर येणें-पडणें-गुप्त गोष्ट उघडकीस येणे, परिस्फोट होणें **बेंडा बेंडया**-वि मोठी बेंडी असलेला **बेंडाळणें**-अक्रि फुगणें, फुगवटा येणें, फुगीर होणें; मेंड उठणें

**बेडका । बेंडका**—पु बडका; खाकरा, थुंकलेला कफ

**बेडका**—न (कु ) एकत्र बांधलेले दोन अखाले नारळ; नारळाची सागड

**बे(बें)डकी**—स्त्री १ लहान बेडूक, बेडकातील मादी २ दंड किंवा पायाच्या पिंडरीतील स्नायूचा जोराच्या आघातानें येणारा गोळा ३ दंड किंवा पाय यांमधील स्नायूंच्या आकुंचनामुळें स्पष्ट दिसणारा गोळा, आंगठ्याच्या मुळाचा मांसल भाग ४ घोड्याच्या पायाची गाठ [ बेडूक ] **बेडकीचें कुलूप**-न एक प्रकारचें कुलूप ह्याच्या बाहेर नळीचें कुलूप **बे(बें)डकुळी, बेंडकोळी**-बडकी पहा

**बेडग**—न (माण ) लहान लहान झुडपें तोडण्याचें हत्यार

**बेडगा**—पु (जुन्नरी) दोन फाट असलेलें लाकूड पुन्हा केलेली शेताच्या कुंपणातील वाट दुबळके, येथें यातून फक्त माणसाच जाता येते

**बेंड(द)णें**—सक्रि १ (व ना ) कोंडणें, बुजविणें, बंद करणें २ (वेंडुलाचा खेळ ) एका गोटीचा दुसरीला स्पर्श होणें

**बेडदोरी**—स्त्री ( मस्तकाम ) बगीप्रमाणें विण ला असतारी पद ( हा मिलिटरीप्रमाणें कोटपाटलोणीवर शिवतात )

**बेंडभांवरी-री**—स्त्रीपु एक प्रकारची वेल व तिचें फळ

**बेडर**—बरड पहा

**बेंडया-ड्या**—पु ( व ) कोंबडी, बदकें ठेवण्याचें खुराडें

**बेडा**—पु १ रोठा; पूर्ण पक्व झालेली सुपारी, अरोली सुपारी २ (गो ) बेडे; गोठ [ हिं बेडा=तराफा ] ०पार जाणें-असणें-होणें-करणें-(ल )-यशप्राप्ति करून घेणें, स्वतःचे हेतु सिद्धीस नेणें

**बेडा**—पु बांधकामात दोन दगडांमध्यें बसविलेला दगडाचा लहान तुकडा,

**बेडा**—पु १ (गो ) वर्षाचो ठराविक दणगी २ (ना ) परिवार; समुदाय, गावाचा किंवा जहाजाचा समूह [ बहुडा ]

**बेडा**—पु ( आदरार्थी ) दर्यावर्दी, खलाशी तांडेल

**बडागुळा**—स्त्री बाडगूळ पहा

**बेडी**—स्त्री (गो ) सुकलेली सुपारी बेडा पहा

**बेडी**—स्त्री १ शृंखला, हस्तबंधन पादबंधन, पादशृंखला २ एक पायाचा दागिना पायात घालण्याचें नवसाचें चांदीचें कडें ३ ( सामान्यत हाताची हात किंवा हत ह्या शब्दांना जोडून) हात कडी हातखोडा ४ (ल ) बंधन लोढणें आड्डे ब्याद, लचांड प्रीतिचि ते बडी कसी । साडनी दुरि जो करासि झोंबे डिकसी । -मोराम ४१९ ( आपल्या हातानें आपल्या पायात ) बेडी घालून घेणें-आपण होऊन आपल्यावर संकट ओढून घेणें ०सुटी-स्त्री (माण ) घोडयाचे पुढील पायाच्या गुडघ्यावर गोम असणें [ हिं ]

**बेंडू**—वि ठेंगणा पण धष्टपुष्ट ( मनुष्य, पशु )

**बेडूक**—पु मंडूक, बेडकी हा गोड्या पाण्यांत राहणारा प्राणी आहे याचें अंग गार व गिळगिळीत असून आकारानें लहान, डोळे बटबटीत जबडा मोठा, जीभ उलटी ओठाच्या बाजूस चिकटलेली असते रंग भोंवतालच्या वस्तूंशी असे असा पालटणारा असतो हा डरांवडरांव असा आवाज करतो बेडकाचे विषावर शिरशीचें बीं निघारी निवडुंगाचें चिकांत वाटून त्याचा दशांवर लेप लावतात -वारा २७०७ [ सं दर्दुर, मंडूक, सिं डेडरु ]

**बेडें**—न १ (को ) गाईंची वाट २ (राजा ) बेडें, बेळी दुबेळकें, कुंपणाच्या आत जाण्याकरितां केलेलें दुबेळक्याचें दार, कुंपणातील वाट 'भवबाधियांचें बेडें ।'-गीता २ १८३८

**बेडया, बेरडया**—अनेव ( व कुण ) जोत्या; जातीं; जुपण्या ( बैलांना जुंवास जोडण्याकरिता )

**बेणका**—पु मोरवणाच्या दोन्ही चुन्हींत बाहुलीत घम विलेला लाकडी तुकडा काढूक

**बेणणी**—स्त्री तण काढण्याची बेणण्याची क्रिया शेतातील अगर अंगणातील गवत उपटून टाकण्याचें काम, निंदणी भाग लणी [ बेणणें ] **बेणणें**-सक्रि १ शेतातील निरुपयोगी गवत इ० काढणें आगलन काढणें २ ( वऱ्हाडच्या दक्षिण भागात ) बीं पेरणें

**बेणवाजा**—पु इंग्रजी तऱ्हेचें एक वाद्य [ इं बँड+म वाद्य]

**बेणा-णी-णें**—वि उघडा दिसू लागलेला, वरील आच्छादन दूर केल्यामुळें दिसणारा ( क्रि० पडणें ) 'पाणी ओहोटलें म्हणजे खडक बेणा पडतो ' [ फा बीना=पाहणें ] **बेणावणें**-अक्रि गैरविल्हेस पडलेला पदार्थ इ० दिसू लागणें, तोंड दाखविणें उगवणें; उमटणें (माणूस, दुर्गुण इ०) 'सध्याकाळीं माघारा यतों म्हणून गेला तो पंधरा दिवसांनीं बेणावला

**बेणारी**—पु पलीकडच्या विठोबाच्या पूजेच्यावेळीं मंत्र म्हणून कल्हापूजा घेणारा इसम -शर

**बेणें**—न बियाणें पेरण्याचें बीं [ बियाणें ]

**बेणें**—न (खा ) दरवाज्याच्या फळीला मजबुतीकरता मारलेली आडवी पट्टी

**बेत**—पु १ योजना, रचना; नमुना युक्ति २ कारण, उद्देश, हेतु मसलत ३ पद्धत, रीति व्यवस्था, मांडणी, टापटीप ४ रूप आकार रूपरेषा, वळण, आराखडा ( पुढील कामाचा काढलेला योजलेला ) [ स हेतु हिं ] **बेताचा, बेताबेताचा**-वि १ रीतीचा पद्धतशीर योग्य व ठराविक नमुन्याप्रमाणें असलेला

२ मध्यम साधारण, प्रमाणशीर, योग्य प्रमाणाचा, योग्य किंमतीचा ३ जुळता, जुळणारा, जमणारा; माप, चालीरीती, स्वभाव इ०शीं जुळता ४ अल्पस्वल्प, अगदीं थोडा, तात्पुरता, क्षणिक, अर्धवट 'त्याचा ईश्वरावर वेतावेताचाच विश्वास आहे' -दि ४ ३१४ **वेताचर असणें**-निश्चय, ठराव व्यवस्था, वेत, योजना, नियम याना धरून असणें, नियमाप्रमाणें असणें **वेत बात**-पु व्यवस्था टापटीप **वेतवार**-क्रिवि पद्धतशीरपणें, नेम स्तपणानें **वेतावेत**-क्रिवि माप, आकार, लम्हा इ० बाबतीत तनाक्त जुळणारा २ (क) ततोतत जुळणें **वेत्या**-वि नेहमीं भल तेच वेत, योजना करणारा, युक्त्या लढविणारा **वेतणें**-सक्रि १ माप घेणें व कापणें (अगास घालावयाचे कपडे) २ मुस्कटात मारणें थोबाडीत मारणें **वेतकी**-स्त्री १ माप, आकार रूपरेषा इ०ची आखणी, मोजणी (अंगात घालावयाच्या कपड्याची) २ कपडा मापाप्रमाणें फाडणें कापणें **वेतनीचा**-वि जमणारा, जुळता (मापानें, बनावटीनें इ०) (वेताचा ह्या अर्थी उपयोग) **वेतीव**-वि १ वेताप्रमाणें कलेलें, योजनेनुसार असलेलें २ मापाप्रमाणें वेतलेले, कापलेले (कपडे) **वेतविणें**-सक्रि १ माप घ्यावयास लावणें २ तोंडात थप्पड, चपराक लगाविणें 'तोंडावर जेव्हा दोन वेतविल्या तव्हा कबूल झाला'

**वेत**—पु वेताची छडी, वेत [स वेतस्] **०ऊंस**-पु उसाची एक जात, हा ऊस बारू किंवा वेताप्रमाणें दिसतो

**वेतणें**—क्रि विंतणें, प्रसग येऊन पोंचणें

**वेताळ**—पु (कों) तामसी देवता, भुताचा राजा, वेताळ

**वेताळ, वेताळीस**—वि वेचाळ, वेचाळीस पहा

**वेताळामण**—पु (व्यापार) एक माप या मणानें वजन १५६८ सुर्ती रुपय असतें -मुन्या १०२

**वेती वेतीन**—स्त्री सोंगट्याच्या खेळातील एक दान दुफाशी खेळात दोन्ही फाशावर तीन तीन (प्रत्यक्ष दोन दोन) पडणें 'बाई वे तीन बोल्ली।'-ऐपो ३३ [वे+तीन]

**वेतुम**—पु (गो) काचा घट बसविण्यासाठीं केलेला राधा, लारी [पोर्तु]

**वेतो**—पु (गो) साधी पेटी

**वेधु-धू**—वि दांडगा, अडदांड, जवान, बळकट 'वरी भीम सेन वेधु। तो जादला असे सेनानाथु।'-ज्ञा १ १२० वेंद्र]

**वेधूड**—वि कुरूप विद्रूप वेडावाकडा, ओबडधोबड

**वेंद वेंदाड**—स्त्री दलदल, ओलाव्याची जागा

**वेदड-डा**—पु सैन्याबरोबर असलेली लुटारू जात, चोरीचा धदा करणारी एक जात 'वेदड घालिती छापे वाट चालेना तिळ भर।'-ऐपो १२१ [वेरड]

**वेंदर-री**—स्त्री एक झुबकेदार गवत

**वेंदर, वेंदलु**—न (गो) आंबा, फणस यावरील बाडगूळ, वृक्षादनी

**वेंदरी**—स्त्री एक फळझाड

**वेंदरी**—वि वेंदर गावीं बनविलेला किंवा त्या गावासबधींचा (पिकदाणी, गुडगुडीचा पेला व इतर लोखंडी जिन्नस इ०)

**वेंदरी**—स्त्री जोतें बांधताना जे तीन बाधकामाचे थर घाल- तात त्यातील अगदीं खालील किंवा पहिला थर त्यानतरच्या दोन थराना पेटी व पाटथर अशीं नावें आहेत वेंदरीतील दगडांना वेंदरी खाडकी असें म्हणतात

**वेंदरीशाळू, वेंदरशाळू, वेंदरी**—पुस्त्री शाळूचा प्रकार

**वेंदाड**—न मुळाचा झुबडा, झुपाड (दूरवर पसरणाऱ्या गव ताच्या मुळ्याचा उदा० हरळी, कुंदा, मोळ, दर्भ इ०) —वि (जमीन-शेत-रान-जागा इ० शब्दाशीं समास होऊन उपयोग) बारीक गवत असलेली, वनस्पतींचा मुळवा असलेली, बारीक सारीक झुडपाची, पाळें व मुळ्या यानीं भरलेली

**वेंदू**—पु १ मेंदू २ मगज, गाभा, फळातील गीर ३ विल विलीत झालेलीं फळें, मास इ० ४ (झुरळ, विंचू इ०चा) चेंदा मेंदा, ल्हा, जखमेंतून बाहेर येणारें मास [मेंदू]

**वेंदूर**—पु पोळा, एक सण निरनिराळ्या देशाच्या चाली प्रमाणें आषाढ, श्रावण किंवा भाद्रपदातील अमावास्या या दिवशीं बैलाची पूजा करून याना शृगारून त्याची मिरवणूक काढतात

**वेंदल**—न (गो) परावजीवी, दुसऱ्याच्या आधारावर पोसला जाणारा, आईतखाऊ

**वेना**—पु बयाणा —वि उघड स्पष्ट —शर

**वेने-इस्रायल**—पु मुंबई इलाख्यातील ज्यूधर्मी जात व व्यक्ति

**वेपटी**—स्त्री (व) बोळ 'वपटींत घर गिळालें'[वे+पट्टी]

**वेपरवा**—पु मोत्याचे सर एकत्र करून केलेला, डोक्यास एक बाजूस घालण्याचा बायकाचा दागिना

**वेपार**—पु व्यापार, उदीम [स व्यापार, हिं वेपार]

**वेपारी**-पु व्यापारी, दुकानदार, दवघेवीचा धदा करणारा.

**वेफाटी**—स्त्री (व) वेळी, वेडें पहा

**वेंबकाचा खेळ**—पु (गो) भाकरीचा खेळ

**वेबरी**—स्त्री (गो) बेडकी

**वेंबट**—न १ मोठी वेंबी, उच वेंबी २ वेंबी या शब्दाचें तुच्छतादर्शक रूप ३ जनावराची बेंबी [वेंबी]

**वेंबटणें, वेंबणें**—अक्रि (राजा) बासरू किंवा मेंढरू यानीं भयामुळें वें वें असें ओरडणें आक्रोशणें 'मुकपणें वेंबात।'-एभा २१ २२९ [ध्व किंवा स विद्=आक्रोशणें]

**वेवदो**—पु (गो) दारूवाज **०जावप**-दारूबाजीनें गुंगी यणें

बेबल—न (कु) सुताराचें एक हत्यार

बेबली—स्त्री एक फळझाड बेबलें—न बेवलीचें फळ

बेवहार—वि बहारदार, बहारीचा, सुंदर 'बेवहार गुलाबी तरू मोती सरू चपक मोगरा।'—पला ४,२२ [फा]

बेंबळ-ल, बेंबळें—वि १ ढिला, नि शक्त, लुळा, निर्जीव २ विव्हल, क्षीण 'सर्वांगा कांपळा आला। अति सतापु उपनला। तेव बेंबळ हातु गला। गांडिवाचा।'—ज्ञा १.१९७ [स विव्हल]

बेंबळणें—अकि १ भेदणें, फुटणें, तुकडे होणें २ विव्हल होणें.

बेवा—पु एक प्रकारचें फुलपाखरू

बेंबारा—पु लोभाटा, एखादी गोष्ट उघडकीस येणें [बोंब]

बेवारा—पु बेवारा पहा

बेबावचें—सकि (गो) भिवविणें, भीति दाखविणें

बेंबावणें—अकि बेंबटणें पहा [बे]

बेंबी—स्त्री लहान मुलगी, कुकुवाळ, लकरू [इ] ०कॅप—लहान मुलाची टोपी [इ]

बेंबी—स्त्री नाभी, पोटाला ज्या ठिकाणीं गर्भनाल जोडलेला असतो तो पोटाचा अवयव [स नाभि] ०चा देंठ पिळणें-पिळून दुखूं लागणें नाभीच्या देंठापासून कळवळा येणें-माया येणें—अतिशय कळवळा येणें ०चें उखळ होणें-(ल) चम चमीत खाण्यानें व सुखाच्या राहणीनें लठ्ठ होऊन दोंद सुटणें. ०च्या देंठापासून—क्रिवि अगदीं अतःकरणापासून खऱ्या भावानें ०पासून जोर करून बोलणें—शक्य तितक्या जोरानें बोलणें सर्व शक्ति खर्च करून बोलणें ओरडणें

बेबुदी—स्त्री बेगमी साठा, समृद्ध [फा बिहबुद्]

बें बें—नक्रिवि बासराचें मेंढराचें ओरडणें (क्रि० करणें)

बेबे बेबो—पु (गो) बेडूक

देबेरी—स्त्री (गंजिफाचा खेळ) डावाचीं पानें वाटून झाल्यावर एखाद्याला सुल्या अथवा राजा आला नसेल (व कोणास पानें देणें नसेल) तर तो डाव न खेळता पुन्हा गन्त करून पानें वाटणें

बेंबरचें—सकि (गो) झोंपेंत बरळणें [ध्व]

बेर—पु (आगरी कों) एक प्रकारचें जाडेभरडें गवत

बेर बेरणी—स्त्री (राजा) दुसरी नागरणी (पहिली नागरट उभी झालेली असली म्हणजे दुसऱ्यानें आडवी नागरणी करतात या दुसऱ्या नांगरणीला म्हणतात), उखळणी [बेल्दोन]

बेर—न (माण) पाभरीच्या नळीचें धान्य पडण्याचें जमिनीवरील भोक

बेर—स्त्री (व) वागणें

बेरकट—न १ वाईट व बरीच्या योगानें घा झालेलें तेल किंवा तूप २ बरी ओशट पदार्थातील मळ —वि बेरी असलेलें, रेंदाचें, मळानें युक्त (तेल तूप) [बेरी+कट] ०णें—अकि. समई दिवा, तेगांचें भांडें इ० तला-तुपांतील बेरीमुळें वाईट होणें भांडें, दिवा इ०वर बेरी बसणें बेरकूट, बेरकुटणें—बेरकट व बरकटणें पहा

बेरकट—वि बहिरट, कमी ऐकू येत असलेला [बहिरा]

बेरका, बेरकी—वि १ लुच्चा, हुषार, चलाख, धूर्त २ मिश्रबीजाचा [का]

बेरकी—स्त्री एक प्रकारचें गवत

बे(बै)रंग—न (ना) तिकीट न लावलेलें, नॉटपेड पत्र

बेरजून काढणें—कि (बे) बेंचून काढणें

बेरट—न १ रेंदा, बेरी असलेलें तेल तूप, गाळ, घाण इ० असलेलें तेल, तूप २ (खा) लोणचें ।

बेरड—पु धवबाईक लुटारू किंवा त्याची जात, रामोशी, चोरी हा उपजीविकेचा धंदा असणारे लोक, याची वस्ती कर्ना टकांत अधिक आहे [बेडर, तुल० का बड्डर] बेरडाई, बेरड गिरी-बेरडाव-वें—स्त्रीन बेरडांचा लुटारूपणा, बेरडाची पुंडाई (क्रि० सुरणें, माजणें, मातणें, उठणें)

बेरढ—स्त्री गोंधळ, मिश्रण, सर्वगोलकार, पचमेळ

बेरड—स्त्री लीख (विरू) (अव बेरडा) लिखा, उवाचीं अंडीं (कि पडणें, होणें)

बेरडी—स्त्री (ना व) बैलाच्या गळ्यातील जातें, जुपणी

बेरणें—अकि १ (ना) पसरणें, [illegible]शवणें, जिकडेतिकडे होणें (फक्त दाट उगवणाऱ्या गवतास उ[illegible]शनच उपयोग) २ आडवी नांगरट करणें

बेरसा—वि दांडगा, विचारशून्य [illegible]रसा गाढव माय ना बहिण। भुक चरीविण भलतेंचि।'—तुगा ४१[illegible]

बेरहट्टी—स्त्री घोड्याचा एक रोग, व्रण, [illegible]यावर्ण —अश्वप २२६१

बेरी—स्त्री १ ओशट पदार्थातील मळ, तेला[illegible]पांत असणारा मळ, घाण इ० चरकट २ गुळाची मळी

बेरीज—स्त्री १ मिळवणी, निरनिराळ्या स[illegible] एकत्र करून झालेली सख्या मिळवणूक, जमा २ मिळवणी कराव[illegible]याची क्रिया, दोन किंवा अधिक सजातीय संख्या एकत्र करणें [illegible] क्रि० घणें करणें) [फा बरीज] ०भरता—स्त्री ठराविक संख्या [illegible]री होण्या करता (भरण्याकरिता) केलेली भरती इष्ट संख्या द[illegible]खविण्या करिता त्यांतीत घातले ती खोटी भर

बेरू—वि (व) सुनशी मनात डाव धरणारा

बेराजा—पु एक औषधोपयोगी पदार्थ [फा बिरोजाह्]

बेल—पु बिल्ववृक्ष शंकराला बेल प्रिय असल्यामुळें हें झाड पवित्र मानलें जातें याला त्रिदलें येतात या झाडाचीं फळें पानें, साल व मुळ्या औषधी आहेत २ बेलाच्या झाडाचें पान —न

बेल्फळ [स बिल्व] ०घालणें-(व) (ल) विनाकारण गावात भट करणें ०काचरी-स्त्री. कोवळ्या बेलफळाचे वाळविलेले कातले, काप (हे औषधी आहेत) ०पत्र-न बेलाचें (त्रिदल) पान (घरावर, मालावर, पदार्थावर) ०पत्र ठेवणें-वस्तूवरचा हक्क सोडणें ०पत्री रुपया-पु बेलाच्या पानाच्या छापाचा रुपया ०पानी टीक-टिका-स्त्री स्त्रियाचा गळ्यात घालण्याचा एक दागिना, या दागिन्यातील प्रत्येक पेटी बिल्वदळासारखी असते बिल्वदळी टिका असेंहि म्हणतात ०फळ-न. १ बिल्व वृक्षाचें फळ २ बेलफळाच्या आकाराची तपकिरीची डबी या फळाच्या कवचीची केलेली, तपकीर इ० ठेवण्याची पेटी, डबी इ० ०भंडार-पु १ दवावरील बेल व भडार हातानें उचलून करण्याचा शपथ-विधि २ अशा रीतीनें घेतलेली शपथ, देव साक्ष ठेवून घेतलेली आणभाक (क्रि० काढणें, उचलणें) [बेल+भडार=हळदीची पूड] ०वात-स्त्री तीन सुताची पीळ घालून केलेली, चार बोटें लाबीची वात, ह्या वाती एक लक्ष करून देवापुढें जाळतात

बेल—पु घोड्याला होणारा एक रोग —अश्वप २ २९०

बेल—न (व) पिकाच्या दोन ओळी, राग

बेलकडें—न (कों) खेकडा, कर्कट

बेलका-कें—पुन (कु) हळद, कुकू इ० पदार्थ ठेवण्यास उपयोगी पडणारा पोखरलेला नारळ, बेलें, बेला

बेलखरूज—स्त्री मोठे फोड येऊन चिघळते व मोठीं चक दळें पडतात अशी ओली खरूज

बेलटी—स्त्री (कों) टाळकें, डोक्याबद्दल तुच्छतादर्शक शब्द 'तूं लवाडया करतोस परतु तुझी बेलटी फोडून टाकीन'

बेलटें-टी—न (कों) नारळ, डाकें याना तुच्छता-तिरस्कार दर्शक शब्द, करटी, नरोटी [बेलफळ]

बेलणें—न (व) लाटणें 'पोळ्या लाटण्याकरता मला बेलणें आणून दे' [हिं. बेलन]

बेलतवस, बेलतौस-तवसें-तौसें—स्त्रीन एक रानवेल व तिचें फळ

बेलतेल—न. जवसाचें उकळलेलें तेल [इ बॉइल्ड+म तेल]

बेलदा—पु (कु) समुद्रखेंकडा

बेलदार—पु १ पाथरवट, खाणींतील दगड खणून काढणारा, खणत्या, दगड फोडणारा कर्नाटकातील हा धदा करणारी एक जात २ (व) मातीचें काम करणारा गवडी [फा बेल्=कुदळ+दार]

बेलफाटा—पु (व) लाकडास फुटलेला दुसरा फाटा

बेलभाण—वि. (गो) दुरस्त करता न येणारें

बेलवटी—स्त्री कृपण, बधन, खोळ 'आनंदें वोसडिली सरी। तणें बाधेसि पडली बेलवटी।' —एभा ९ ४२४

बेलवल—स्त्री उचवट्याची जमीन

बेलवांगी-घागें—स्त्रीन टमाट्याचें झाड व फळ

बेला—पु नारळ, बेलफळ इ० आतून कोरून तयार केलेलें पात्र, डहु [हिं] बेल्यांत मडक्या भरणें-(ल.) गोंधळ करणें, गडबड करणें, धुमाकूळ घालणें

बेला, बैला, पेला—पु १ (कों) ओझें उचलण्यासाठीं एका काठीच्या मध्यावर बसविलेली एक ल्हान चौकट असलेलें साधन २ अशा साधनानें एका मनुष्याला पेलेल, वाहून नेता येईल इतकें ओझें, (विशेषत) काटीचा भारा

बेलाक्सूर—वि १ निःशक २ अविचारी, साहसी. —क्रिवि निःशकपणें, बेलाशक, बेधडक, अविचारानें बिलाक्सूर पहा [अर बिलाकुसूर]

बेलापुरी रुपया—पु बेलापूर येथें पाडलेला अकुशी रुपया तील एक प्रकारचा रुपया

बेलाशक—क्रिवि बेधडक, निःशकपणें, निष्काळजीपणें, निर्धास्तपणें, अविचारानें [अर]

बेलिफ—पु नाझरच्या हाताखालचा एक कामगार, समन्स लावणारा व बजावणारा शिपाई, कारकून [इ]

बेलिया—पु १ मोगऱ्याच्या जातींतील एक फुलझाड २ त्या झाडाचें फूल ३ त्या फुलापासून काढलेलें तेल, अत्तर [हिं]

बेली—स्त्री १ करवटी, नरोटी, नारळीपात्र २ तावडया व काळसर सुताच्या चौकटी असलेलें लुगडें ३ (गों) चिकट गुळाची (गुळपापडीची) वडी बेली-ल्या-वि तावडया व काळ्या रगाच्या सुताच्या चौकटी असलेलें (लुगडें), तावूस व काळसर तावूस (रग)

बेली—पु (जुनरी) खेकड्याची जात ही सर्वांत ल्हान असून डोंगरात अगर मपाटीवरहि असते ह्या जातीच्या खेकड्याचा रग पाढरा असतो बेली धावात (बिळात) आहे'

बेलें—न. राजे इ० बडे लोक बाहेर निघाले म्हणजे धर्म कर ण्याकरता जो पैसा, पैशाची पिशवी बरोबर घेतात ती [फा. बला] ०बरदार-पु वरील बेलें (पैसा किंवा त्याची पिशवी) जवळ बाळगणारा मनुष्य [फा]

बेलें—न बेला, भाड्याप्रमाणें उपयोगी पडणारा, गुऱ्गुडीच्या उपयोगी पडणारा पोखरलेला नारळ, डहु

बेल्ही—स्त्री कोळपें, पिकांतील गवत काढण्याचें हत्यार

बेल्हीं—नअव नागराचे तास, पाणी साचावें म्हणून नागरानें पाडलेले खोल चर

बेवड—स्त्री १ बीजाची मेसळ, मुख्य बियाण्याच्या बरोबर पेरलेलें दुसरें धान्य, दुसऱ्या धान्यावरोबर त्याच जागीं पेरलेलें उपधान्य २ पीक चागलें येण्यासाठीं एक वर्षाआड एक दुय्यम

पीक काढतात त्यास वेवड म्हणतात. 'तंवाखूचा वेवड पिकाला चागला.' ०करणें–ताग, उडीद, कारळे यासारखें पीक करून तें जमीनींत गाडणें; जमीनींत सेंद्रिय द्रव्यांचा सांठा वाढविणें. विवड पहा.

**वेवडा**—पु देशी दारू.

**वेवरा**—पु. वेवारा पहा.

**वेवलकरी**—वि विवलकरी पहा.

**वेवाई**—न. (कों.) रंईच्या मागून पोटमांडणीपर्यंत भिंती चढून काढलेला पोटमाळा; दुपाखी व चौपाखी यांच्या दरम्यानची छपराची रचना.

**वेवीस**—वि. बावीस ही संख्या. [ हिं ]

**वेश**—वि. चांगलें, छान; योग्य; उत्तम; ठीक; युक्त.-क्रिवि. योग्यपणें; चांगल्या रीतीनें; युक्तपणें; चुरचींचें, घाईट नव्हे अशा रीतीनें. [ फा ] ०खासा–वि. फार चांगलें; उत्कृष्ट; अगदीं योग्य. [ फा. वेश+अर. खासा ]

**वेशमी, वेश्म**—क्रिवि नांवानें; नावें (दस्तऐवज, अर्ज, करारपत्रें इ० मध्यें फक्त याचा उपयोग करतात). 'दस्तक वेशमी नारायण चौगुले.' [ फा. व+इसम+इ=बिस्मि=च्या, नांवाचा माणूस ]

**वेशाक**—नकी. शाकेनेशाक ह्या शब्दावद्दल मराठे वगैरे अडाणी लोकांच्या तोंडी असलेला शब्द.

**वेष, वेषक, वेषखासा, वेस, वेसक**—वेश इ० शब्द पहा.

**वेष्ट**—स्त्री (ना. व.) वांडुली. ०लावणें–वेशावून दाखविणें 'मला वेष्ट लावतोस?'

**वेसक**—न. स्थान, बैठक [ बसणें ]

**वेसकट**—न (कों.) फाटक (पावसाळ्यांतील, तात्पुरतें, कटिरी झुडपाचें केलेलें).

**वेसन**—न १ हरभऱ्याच्या डाळीचें पीठ २ पिठलें. ३ हरभऱ्याच्या पिठाचें केलेलें पक्वान्न, लाडू इ० [ हिं ] ०तोरणें –साखरवड्या–नकी. वेसनाचीं निरनिराळीं पक्वान्नें.

**वेसनेकड**—न. रहाटगाडग्याच्या सुळकुंड्यास मारलेलें आडवें लाकूड.

**वेसवेरो**—वि (गो) अत्युत्तम [ वेस+वेंर ]

**वेसर**—न. नासापुष्प; नाकांतील एक अलंकार; नथ, चमकी मोहोरणी, बुलाख इ० 'तेही वेसरयुक्त फार मिरवे त्या ओष्ठ बिंबावरी।' –निमा १.२५ [ हिं. ]

**वेस्मी**—वेशमी पहा

**वेह(ह्रा)डणें**—अकि (आंबा, फळ, कणीस इ०) झाडावर पिकून तयार होणें.

**वेह(हे)डा, वेहाडा**—पु एखाद्या खात्यांतील नोकरचाकर, त्यांचा पगार, हुद्दा इ० बद्दलचें तपशीलवार पत्रक; अंदाजपत्रक; नेमणूक; सरकारी नियम इ० सरकारी अधिकाऱ्यासाठीं बांधून दिलेले, सरकारी कामकाजाच्या वहिवाटीचे नियम. 'सालमजुरीं गडबडीमुळें वेहेड्याचे नेमणुकेपेक्षां जास्ती लोक ठेवणें.' –वाड-समा ४.२. [ हिं. ] **वेहडापार**–क्रिवि. पत्करलेलें कार्य कसेंहि करून शेवटास नेऊन. (क्रि० करणें; होणें)

**वे(ब्या)हडा, वेहेडा, वेहाडा**—पु. एक औषधी झाड व त्याचें फळ. (फळांना हेळ्याचीं किंवा धटिंगाचीं फळें म्हणतात). याचें झाड फार उंच वाढतें व विस्तारहि फराच होतो. फळाच्या आंत मगज असतो त्यानें गुंगी येते. याचा टेंह खोकल्यावर औषधी आहे. या झाडाला डिंक येतो. फळांचा कातडीं कमावण्याकडे उपयोग होतो. [ सं. बिभीतक; प्रा. बहेडओ, बहेडय; हिं बहेडा ]

**वेहडा, वेहाडा**—वि. १ टणक; निबर. २ पक्व झालेलें. व्याहडा पहा.

**वेहंवी, वेहांवी**—स्त्री. आंब्याची खारवलेली किंवा खारांत ठेवलेली कोंवळी कैरी. [ वी+आंबा ]

**वेहबुदी, वेहबुदी-धी, वेहबूद**—स्त्री. १ सुस्थिति, भरभराट; मजबुती; सुव्यवस्था. 'दौलतीची वेहबूद कशांत हें पुरतें समजून आम्हाशीं बोलावें.' –रा ५.७५. २ जोपासना करणें, तरतूद पाळणें; चांगली निगा राखणें; संभाळणें; पालनपोषण करणें (मुलें, आश्रितवर्ग, गुरें इ० चें) (क्रि० करणें; राखणें; ठेवणें). [ फा. बिहबूद ]

**वेहरम**—क्रिवि. सारांक; रुष्ट, खट्टू; घाबरून गेलेला; गोंधळून गेलेला. [ फा. बर्हम् ]

**वेहलावा**—स्त्री (संगीत) आलापाच्या धर्तीची तान

**वेहळा**—पु १ सैल भारा, जुडी; पुंजका (काटेरी झुडपाचा, गवताचा). २ झुबका; घोंस, घड (कांदे, लसूण इ० चा). ३ भेळा; एक रानटी झाड.

**वेहाय**—क्रिवि. अतिशय; फार. 'तो माझ्या भाषणानें वेहाय खूप झाला' [ फा. ? ]

**वेहाल**—वि (बायकी) शिवराळ; अश्लील, अभद्र, बीभत्स.

**वेहुड**—स्त्री. (माण.) वेवड पहा

**वेहुदा**—वि. (ना) उद्धट, असभ्य. [ हिं. ]

**वेहेड**—स्त्रीन. पाण्याच्या प्रवाहानें पडलेली खळगी, दरी.

**वेहेदा**—पु वैदा पहा [ वैदा ]

**वेहेस्त**—पु. स्वर्ग. [ फा. विहिश्त ] ०मकान्–वि. स्वर्गस्थ; कैलासवासी.

**वेहा**—वि. (व) निलाजरा. [ बाह्यात ? ]

**वेळ**—न अर्धा आणा.

वेळ, पेळसा—न वादूची काढलेली पातळ चिरफळी (टोपल्या इतल्या इ० विणण्याची), वीळ

वेळ—स्री (कु) समुद्रकाठची रेताड जागा [स वला]

वेळ—न (व) १ दुवेळके, वेळें देडें २ दुवेळकें लावून फक्त मनुष्यें जाण्याजोगा केलेला कुपणातील रस्ता [वळक]

वेळ—न (गो) तरगाच्या (दवळातील देवतच्या चिन्हाच्या खाथा) पुढें शिपडण्यात येणारें अन्न तरग पहा

वेळकें—न १ दुवेळकें, दोन फाट फुटलेलें लाकूड, फायाचा चिमटा, वेफाटा २ (विणकाम) आरसड टेकण्याचें लाकडी साधन [का. वेळे] वेळफाटा-टी पुस्त्री (व) दुवेळकें

वेळशी(सौ)चें—कि (गो) आवणें, कुजण, वास यणें, वेळसरणें [वळस] वेळसुटाण-स्त्री (गो) शिजविलेला पदार्थ शिळा होऊन कुजल्याची—आंबल्याची घाण

वेळा—पु तांदुळाची एक जात

वेळा—पु (वे) लाकूड साफ अगर गुळगुळीत करण्याचा लहान रधा

वेळूस—वि (कु) वेचव ०हाणें—नासणें, आवणें

वेळें—न (गो) एक पक्वान्न

वेळें—न १ दुवेळकें, कुपणाचा आडा, फक्त माणसाना जाता येता यईल, अशा प्रकारची रस्त्याची अडवणूक, वेडें, डळकें 'मग तें वेद्दाचें वेळें। चोलाइनि एकचि वळे। सवुकी काटाळें। माझे जाले। -ज्ञा १४ ५१ २ काकपद पाथी, पत्र लिहित ना मध्यतरी सुटलेले शब्द वर किंवा अन्यत्र लिहिले आहेत हें दाखविणारें चिन्ह ३ हातमागाच्या ताण्याला खालीं आधारभूत असलेला जो आडसर तो ज्या दोन खुटयावर बसविलेला असतो त्यापैकीं प्रत्येक [का]

वेळेवोळें—न (लिंगाईत) गूळ व भात (हे दोन्ही जिनस मेजवानीच्या वेळीं प्रथम वाढण्याची चाल आहे) [का वेल्ल=गूळ]

वैकार—पु (महानु) वहिष्कार 'असख्यातु कवी वकार। वाणितातिं निरतर।'—दाव २८ [स बहिष्कार]

वैंगण-न—न वागें, वाग्याची भाजी [हिं] वैंगणी—ना—वि वाग्याच्या रगासारखें, सर्व वभार वाळें व आडवण सुपारी रगावर असलेलें (लुगडें)

वैंगुली—स्त्री एक फूलझाड

वैठक—स्त्री १ वसण्याची क्रिया. २ ढुगण टेकून बसणें ३ (चर्चा-विचार-करमणूक इ० करिता) जमलेली सभा ४ परिषद सभा इ०चे) काम करण्याचे दिवस ५ कार्ही काम सार्गी अन्य काम सोडून एके ठिकाणीं केलेली अवस्थिति एखद्या कामाचा कांहीं काळ वसून विचार करणें 'हे काम उभ्याउभ्यानीं होणार नाहीं तुमची आमची चार घटका बैठक झाली पाहिजे' ६ वसण्याची पद्धत, आसन ७ बसण्याच्या उपयोगाची कोणतीहि वस्तु वसण्याकरता पसरलेलें जाजम, सतरजी, बिछाईत, पाट, खुर्ची, खोगीर इ० ८ एखाद्या वस्तूचें बूड, तळ, खालचा भाग (ज्यावर ती वस्तु किंवा पात्र टेकतें तो) ९ बाजारांत बसणाऱ्या दुकानदारावरचा कर १० दमल्या-भागल्यामुळें, भीतीनें, निरुपायानें एकदम मारलेली थस्कल, बसकण (क्रि० मारणें) ११ व्यायाम करण्याचा एक प्रकार, उठण्याबसण्याचा व्यायाम, शाळेतील मुलाला सागितलेली शिक्षा, उठवशा १२ गाण्याची मजलस बसून गाणें १३ गमनामध्यें कांहीं कार्यानिमित्त झालेला मुक्काम, पडलेला खड १४ करमणुकीसाठीं अनकानीं जुळणें, जुळण्याची जागा १५ (व) दिवाणखाना १६ खेड्यावात एखाद्यादुकट्या इसमाला गावसभा भरविणें झाल्यास त्या गावच्या रिवाजाप्रमाणें त्यानें गावकऱ्याना द्यावी लागणारी रकम [स उपविश् प्रा बइट्ठ हिं. वैठना] ०मारणें-(ल) १ ठीया देणें, पुष्कळ वाळ वसून राहणें, आम मोडून काम करणें २ उठाबशाचा व्यायाम घणें, उठावशा काढणें एका बैठकीस—क्रिवि मध्यें न उठता, कांहीं कामासाठीं एका ठिकाणीं बसून (काम सपविणें) बैठणें—अक्रि. बसणें 'तैसीं नित्यनैमित्तिकें। कर्में जियें आवश्यकें। तयाच्या विर्षी न ठाव। वैठला उठू।' —माज्ञा १८ ५९७ [हिं वैठना]

वैठा—वि १ बसलेला, बसकट 'तू उभा ना बैठा।'—माज्ञा ११ २७७ २ बेकार, कामाशिवाय घरीं बसून राहिलेला [बैठणें] म्ह० (व.) बैठेसे बिगार भली=मगदींच रिकामे बसण्यापेक्षा थोडेंबहुत मिळेल तें काम चागलें ०गुणाकार-पु गुणाकाराचा एक प्रकार, गुणकातील प्रत्येक अकानें गुण्याला गुणून यणार गुणाकार एखाद्याखालीं एक असे माडून त्याची बेरीज न करता तोंडीच गुणून तोंडीच बेरीज धरून केलेला गुणाकार कोष्टकी गुणाकार, धावरा गुणाकार व कपाटसिंधु पहा ०ठेप-कैद-सजा-स्त्री साध्या कैदेची शिक्षा, नुसता तुरुगवास ०पगार-मुशारा-पु चाकरीशिवाय मिळणारा पगार, पेन्शन ०पहारा-पु फक्त बसून करण्याचा पहारा, दस्तरख याच्या उलट टहलता पहारा ०पहारकरी-पु बैठा पहारा करणारा शिपाई ०भागाकार-पु भागाकाराचा एक प्रकार भाजक व भाग कार याच गुणाकार न माडता मनातल्यामनात त भाज्यातून वजा करून फक्त बाकी तवढी माडून केलेला भागाकार ०भात-पु पज न काढता वेताचें पाणी घालून केलेला भात ०रोजगार, बैठी चाकरी-पुस्त्री घरदार किंवा गाव सोडावें लागणार नाहीं असा धदा, चाकरी बैठी नोंद—स्त्री मुदतीचा जमाखर्च लिहून शिल्लक काढतात ती नोंद ०वही—स्त्री जींत रोजच्या खर्चाची बाकी एकदम लिहून ठेवतात अशी रोजवही, हीं व्यवस्थित शिल्लकासाठीं काढीन नाहींत बैठें खातें-न एकदा दाखल करून विल्हाय लावलेलें खातें अगर

सदर **बैठे घडीचा**-वि बसल्या घडीचा; धरच दिवस दुकानात पडून राहिलेला

**बैठा**—पु लाकड साफ करण्याचा रंधा, बेळा.

**बैत**—स्त्री दोहरा सयमक दोन ओळी, फारशी भाषेंतील श्लोकासारखी कविता 'या ग्रंथाच्या बैता तीस हजार आहेत ' –ऐस्फुले २ ४५ [ अर बैत ]

**बैतण**—न ( रा ) जळाऊ लाकडें, सर्पण, सयनन पहा

**बैतल**—वि बेवारशी 'जयपुरासारखें राज्य बैतल होतीं लागलें '–होकै ११ [ फा बीतल् ] **॰मावाशी-माल बैत लमाल**–पु बेवारशी, सरकार जमा माल बेहतमावाशी, बेहतमाल पहा [ अर बैतुलमाल ]

**बैतें बैत्या**—वि ( कों ) बलुतें, बलुत्या पहा

**बैतेकरी-करू-दार**—बलुतेदार पहा

**बैद**—पु लुटारू [ स व्याधि म ब्याद¹ हिं ]

**बैदर**—स्त्री गोराड्याची एक जात –न गोराड्याचें फळ

**बैदा**—पु १ दगा, वडाळी फितुरी इ० राज्यांतील सामान्यत भानगड तटा गोंधळ; अदाधुदी, घोंटाळो २ ( खा ) अडगळ वैद्यात विंचुकाट्याचा हात नको घालजो '

**बैंदा**—पु १ कोंबडीचें अडें २ घोड्याचा एक रोग पुढील पायाचें मनगट सुजणें व गाठीप्रमाणें दिसणें [ हिं बैद ]

**बैदुल**—पु खेळण्याची गोटी [ स वर्तुल¹ ]

**बैरक-रख**—स्त्री १ निशाण बैरख २ एका निशाणाखालीं गोळा केलेलें सैन्य ( विशेषत अरबाचें ) अरबाची लष्करी तुकडी 'समागमें आपले वडील अरबाच्या बैरखा नहमीं दोन दिल्या आहेत –रा १० १७३ [ अर बैरक् ]

**बैरागा**—पु विरक्त पुरुष, गोसावी, ससार सोडून तपाचरण करणारा भक्त [ स वैरागी ] **बैरागडा**–पु तिरस्कार किंवा तुच्छता दाखविणारें बैरागी शब्दाचें रूप

**बैराट**—वि बहिरा; बहिरट नणद ते बैराट कानीं असे।' –अक्रू २ विठ्ठल रसमजरी ३० [ बहिरट ]

**बैल**—पु १ वृषभ बलीवर्द खोंड वसु बाल्यदशा ज्याची सपली आहे असा गाईच्या जातींतील नर २ ( ल ) निरक्षर, निर्बुद्ध मठ्ठ डोक्याचा मनुष्य ३ बैला अर्थ २ पहा [ सं बली वर्द वे प्रा वइल्ल ] **॰आनबाहेर घालणें** बैलाची अदलाबदल करणें **॰गाईस दाखविणें**–(माण ) बैलाकडून गाईला फळविणें **बैलास कुकडें होणें**–( माण ) बैलाच्या नरड्यांत व शिंगावर कांहीं येणें **बैलास फरदफोड उठणें**–बैलाचें पोट दुखण्यानें पाठ तणावणें **–स माजरी होणें**–(माण ) बैलाच्या गळ्याजवळ गांठी होणें म्ह॰ बैल गाभणा तर म्हणे नववा महिना (अतिशय खुशामत करणें याअर्थी वापरतात ) सामाशब्द–**॰का-क्या**–पु १ बैल हाकणारा, गाडीवान २ गुराखी, पशुपाल, गुरें राखणारा **॰खादा-खांदे**–पुन ( बैलाचा खांदा गाडीवाल्याच्या हातांतील कासरा जुपलेल्या दोन्ही बैलाच्या खांद्यावरून तिरका व सारख्या अंतरावर असा असतो त्यावरून) तिरकी दिशा, एखाद्या वस्तूपासून, इसमापासून किंवा स्थळापासून सारख्या अंतरावर व तिरक्या रेषेमध्यें असलेल्या वस्तूची किंवा दोन खड्याची स्थिति, अशा रीतीचें खडें, वस्तु **॰खाद्या**–वि बैलाच्या खांद्याप्रमाणें खाद व मान असलेला, बारीक व लहान खांद्याचा ( रेडा ) **॰घाट**–पु ज्यावरून ओझेंवाले बैल जाऊ-येऊ शकतात असा घाट डोंगरांतील चढण, साधारण चढणीचा रस्ता **॰घाटा**–स्त्री (वाई) एक वनस्पति **बैलट**–न बैल शब्दाचें तुच्छतादर्शक रूप **॰दाम**–पु बैलाच्या विक्रीवरील कर **॰पाडा**–पु (समुच्चार्थी) बैल व पाडे **॰पाळणा**–पु ( ल ) त्रासदायक, कंटाळवाणें, कष्टाचें काम दगदगीचें काम ( क्रि॰ घालणें लावण, मांडणें, करणें, पडणें होणें ) **॰वाडा**–पु गाईबैल गुरेंढोरें त्या रस्त्यानें बैलवाडा वाहू लागला [ बैल द्वि ] **॰बेगारी**–पु सार्वजनिक कामाकरितां वेठीला धरलेले बैल **॰भिस्ता**–पु बैलावरून पाणी वाहणारा पाणक्या, बैलाच्या पाठीवर पाकण घालून पाणी भरणारा मनुष्य **॰मळणी**–स्त्री धान्याच्या कणसांवरून बैल फिरवून केलेली मळणी **॰मार्ग-रस्ता वाट**–स्त्रीपु ओझ्याचे बैल जाण्यायेण्याजोगा रस्ता **॰मान्या**–पु (वाणी, कु ) आकाशांतील गुरु ग्रह(कारण या ग्रहाला शुक्र समजून व हा उगवलेला पाहून पहाट झाली असें वाटून प्रवासास निघतात पण पुष्कळ प्रवास केला तरी दिवस उगवत नाहीं आणि बैल वगैरेंना फार त्रास होतो यावरून) **॰रहाट**–पु बैलानें फिरविण्याचें रहाटगाडगें **ठेचलेला बैल**–पु षंढ केलेला बैल भाद्या बैल, खच्ची केलेला बैल

**बैल**—पु ( शेअर बाजार ) वायद्यानें रोखा विकत घेतल्यानंतर त्याबद्दल किंमत न देता नफ्यानें तोच रोखा पुन्हा विकू इच्छिणारा इसम –वा गो काळकृत व्यापारी उलाढाली [ इ बुल ]

**बैला बैली**—पुस्त्री १ डोकीवरून ओझें नेतांना तें समतोल राखण्याचें एक लाकडी साधन एक लांब दांड्याच्या मध्यभागीं एक खुंटी आणि जाळी असते जाळींत ओझें ठेवतात हा दांडा हातांत धरतां येतो व त्यामुळें ओझें डोक्यावरून उचलतां येतें व जमिनीवरहि सहज उतरितां येतें बेला पहा २ सुताच्या ताण्यास खाजण करतेवेळीं सुत खळ लावणाऱ्याच्या छातीइतक्या उंचीवर लांबवर ताणले जाण्यास सुताच्या दोन्ही बाजूस दोन उभ्या कर तात त्या चौकटी खळ लावतेवेळीं ताण्याचीं सुतें ताणलेल्या स्थितींत ठेवण्याचें ज दोन घोडे ते प्रत्येक, हे घोडे दोन काठ्या गुणिलें चिन्हाच्या (×) आकारात मध्यावर बांधून त्यांच्या वरच्या टोंकास एक आडवी काठी बांधून केलेले असतात ३ तिफणीची दोरी

**बैसक-का-कार**—स्त्री (काव्य) १ बैठक बसकर, गालिचा, सतरंजी, चटई इ० बसण्याकरितां पसरलेली वस्तु आसन 'बऱ्हाडा बैसका पाये प्रक्षाळुनी तळीया वचलुनी। पुस्पे फळें तात्काळें बीढोय।'—पवळे, उत्तरार्ध १७ २ बसण्याची तऱ्हा, पद्धत, बसणें 'बांधी पडती बहुत। परि बैसका न सोडी पर्वत।' ३ सत्कार, आदरानें बसवून घेणें, बसविणें 'भीमकें केला बैस कार।'—कृशा १८ १४८ [बैसणें] **बैसकासन**—न घोड्या वरील बैठक, जीन 'पृष्ठीं मिरवली बैसकासनें।' [बैसणें+आसन] **बैसणा**-वि बसणारा 'विजाती इसोनि नयना। सोहभावें शुक्र जाणा। भजन घरोळा बैसणा। गुरुदारीं सुणा मी होईन।' —एभा १२ ५८१ [बैसणें] **बैसणाइत**-पु (महानु) अधिपति, राजा 'तो रानूर रोहिणखेडिचा बैसणाइत।'—ऋ १३५ **बैसणी**-स्त्री बैठक आसन 'स्थावरां हि तळवटीं। बैसणी घे।' —माज्ञा १६ २६० **बैसणें**-अक्रि (काव्य) बसणें (व्यवहारात फक्त आज्ञार्थी एकवचनी प्रयोग) 'वाटेजचि मूर्त बैसलें। आसना वरी।'—ज्ञा ६.२५८ —नअव बैठक आसन 'व्यापकाचीं बैसणें। नियें स्थानीं।'—ऋ ७९ [स उपविश्] **बैसतखेंवो**-क्रिवि बसल्या बरोबर 'आधवें अभ्यासु सरे। बैसतखेंवो।'—माज्ञा ६ १९१ **बैसीनणें**-अक्रि (महानु) बसणें 'पाहुनेरु सा नि घो अनत्। बैसीनिलें विश्वशाळे आत्।'—शिशु १६७

**बैहवुदी**—स्त्री सामान्यत बेहुदी पहा

**बो**—अ (ना) बुवा 'का बो?'=का बुवा? [तुल० स. भो]

**बोई**—स्त्री १ (राजा कु) लसणाची पाकळी, त्याची पोह २ दह्याची कवडी

**बोईरूप**—पु (कु) तांपणीच्या मधल्या पाटयाच्या मध्य भागीं बांधलेल्या दोरखंडाच्या शेवटास जो नारळ बांधतात तो [इ बॉय् रोप]

**बोउला**—न बोहलें 'आता बोउला करावा।'—वसीस्व १० ८६

**बोकचा-चें, बोकसा, बोगसा**—बाचका व बाचकें यांचीं वर्णविपर्यासानें झालेलीं रूपें बोचका-कें पहा

**बोकड**—पु बकरा [स बुक, द प्रा बोकड] **०खाडी**-स्त्री अव्यवस्थित व बेशिस्त कारभार करणारी मंडळी सभा अगर असा कारभार करण्याची जागा, धिंगामस्ती टवाळकी इ० जेथें चालतात अशी जागा **०दाढी**-स्त्री १ (बोकडाची दाढी) फार वाढलेली दाढी (निंदार्थी) २ गालावर नसून फक्त हनवटीवर येणारी दाढी **०दाढ्या**-वि बोकडदाढी असलेला **०बीज**-पु आपल्या भावाबहिणींना आईवरून शिव्या देणारा **बोकडी**-स्त्री (गा) बकरी

**बोकडणें**—अक्रि १ (भाजी इ०ची) वाढ पूर्ण होऊन फळें मात्र कमी धरणें २ (मुलें) जोरानें वाढीस लागून सडपातळ व उंच बनणें

**बोकडणें**—अक्रि (ना) ओरबाडणें

**बोकडयॉ**—पु (गो) एक वृक्षविशेष

**बोकडे मारप**—क्रि (गो) थापा मारणें, बढाई मारणें

**बोकणा-ना, बोकणी**—पुस्त्री १ बकाणा, तोंडात घातलेला पोह, चुरमुरे इ० चा मोठा घास (क्रि० मारणें, घालणें, भरणें, गिळणें, खाणें, उगळणें) 'अवघा बोकणा भरिला। पुढें बैसे।' —दा १८ ५ ९ २ तोंड किंवा भोंक बंद करण्यासाठीं घातलेली किंवा भरलेली कोणतीहि वस्तु, बुट्टी (क्रि० घालणें, भरणें, धरणें) [धा बॉक्कण] **बोकणावणें**-उक्रि (कर) अधाशीपणानें खाणें

**बोकंदळ**—नपु धिंगाणा, धुडगूस, धुमश्चक्री, खिदळणें, धागडधिंगा —वि धष्टपुष्ट, अगडबंब, गलेलठ्ठ, राक्षसी (मनुष्य, पशु किंवा वस्तु)

**बोकमार**—न मोठें पिस्तुल, मोठ्या तोंडाची लहान बंदूक [पोर्तु]

**बोकल**—न (कों) विहिरीचें बांधकाम व वरील कलाकुसरी

**बोकलणें, बोक(का)ळणें**—अक्रि १ इकडेतिकडे भटकणें, आनंदानें उड्या मारणें, धिंगामस्ती करणें, खिदळणें, आनंदाच्या ओरडण्यानें गोंगाट करणें, नाचणें, बागडणें (गुरें, मुलें इ०) २ विशिष्ट पदार्थ, तऱ्हा, धर्म, सोंवळें इ० चा प्रसार सपाटून होणें, प्रस्थ माजणें, वाढणें

**बाकलणें बोक(का)ळणें**—अक्रि (रागाच्या बोलण्यात) सपाटून खाणें, खूप खाणें, ठासून खाणें बोकांदणें पहा [ध्व बक्बक?]

**बोकला**—पु (गो) एक जातीचा लहान मासा

**बोकशी**—स्त्री (कों) नदींतील मासे धरण्यासाठीं केलेली एक प्रकारची टोपली

**बोकसा-सें**—पुन बोचकें, गाठोडें

**बोक(कु)ळ**—स्त्री. बकुळीचें झाड —न बकुळीचें फूल

**बोका**—पु १ मांजरातील नर २ (ल) गलेलठ्ठ, खाऊन खाऊन माजलेला, धिप्पाड मनुष्य किंवा पशु (कोणताहि) राक्षसी पदार्थ म्ह० शिंक्याचें तुटलें, बोक्याचें पटलें किंवा शिंकें तुटलें आणि बोक्याचें फावलें=शिंकें तुटलें असता दूधदुभतें बोक्याला ज्याप्रमाणें आयतें खाण्यास मिळतें त्याप्रमाणें एखाद्याचा अकल्पित रीतीनें आयता फायदा होणें **बोकेझुंज-झुंज**—स्त्रीन मांजराचें भांडण, झुंज, झोंबी **बोकेसंन्यास**-पु संन्यासाचें ढोंग खोटा संन्यास, लोकांना फसविण्याकरता घेतलेला खोटा संन्यास **बोकेसंन्यासी**-पु दांभिक संन्यासी, ढोंगी साधु बोका ज्याप्रमाणें मोठा साधुत्वाचा डौल घालून मुकाट्यानें बसतो पण उंदीर नजरेस पडताच त्याचें साधुत्व लोपून तो त्याच्यावर

प्रगट करतो त्याप्रमाणे लभाची मधि येतोच आले खरें स्वरूप प्रगट करणारा, मर्मभेदितपणानें आपले कपटविचार झाकणारा

बोका—पु मूत्रपिंड [स वृक्क]

बोका—पु छाती ऊर बोके(का)फोड—स्त्री १ कांहींहि फायदा नसता जोरानें ओरडणें, रिकामी उरस्फोड करणें २(ल) निष्फळ शिकविणें, निष्फळ प्रयत्न [बोका+फोडणें]

बोका(कृ)ड—न (कु) बोकड, बकरा.

बोकांडी-डें—स्त्रीन मानगुटी, मान (वाघ, शत्रु, पिशाच्च इ०सवधींचा उपद्रव असता धरणें बसणें इ० क्रियापदांशीं जोडून प्रयोग) 'वाघानें बोकांडी-धरली-फोडली-सोडली' 'हा त्याचे बोकांडीं बसला' [बोका? मांजरें आपलीं पिलें नेताना त्याच्या मानगुटी धरून उचलून नेतात त्यावरून?] ०धरणें-एखाद्याला दुःखदायक रूचाटींत धरणें, एखाद्याचे हात जखडून टाकणें त्याला स्वच्छेनें वागू न देणें बोकांडीस बसणें-१ मानगुटीस बसणें २ पिच्छा पुरविणें, एखाद्यानें कांहींएक गोष्ट केल्याशिवाय त्याला न सोडणें

बोकाणा, बोकाडा—पु घोडे इ०चा तोंड भरून घेतलेला घास, मोठा घास, बोकणा (क्रि० मारणें) [का बोकण]

बोकाडणें-उक्रि १ (कों) बोकणे मारणें; मोठमोठे घास घेणें, अधाशीपणानें खाणें २ (रागाच्या भरांत) दडपून खाणें, बोकलणें ठासून भरणें बोकादळ-बोकदळ पहा

बोकू, बोकु—पु (गो) (बालभाषा) शेळीचें पोर, करडू [बोका]

बोकें—न (गो) बगळा [स बक]

बोकेडा—पु एक झाड

बोकर—न (कों) एका जातीचा मासा

बोक्चा—पु बोचकें गाठोडें 'बापूनें खुर्दखताचा बोक्चा आपल्या घरास नेला' -रा २० १३८ [तुल० बुक्चा]

बो(बो)खा—पु देठा डिरी, तुरा कोंब, अंकुर [स *अम्बकुर?*] *बोखरडणें*-अक्रि *अतिशय* खतामुळें झाड व पानें फुगून जाणें वाढ न होणें [बोखा] बोख(खा)डणें सक्रि झाडाचीं पानें व देठ तोडणें, ओरबाडणें, नखानीं किंवा इतर साधनानीं तोडून टाकणें बाखरी बोखी—स्त्री (कों) लहान कोंब, नवा अंकुर कोवळी डिरी [बोखा याचें लघुत्वदर्शक रूप]

बोखा(का)डा बोखे(के)डा—पु एक झाड, बोकाडा हीं झाडें बोरीचे मोठीं व खातरीच्या झाडाप्रमाणें असतात व फळेंहि तशीच असतात हीं कोंकणात फार आहेत याला काळा खैर सुरेदोडी सुईउवर गाडयाउवर अशीहि नांवें आहेत -वगु ४ ११०

बोखार र—पोकळी, पळ, खोदरा [स पुष्कर=आकाश]

बोखारणें—सक्रि १ (महानु) झारणें. 'बोडुनि बोलें चांवडें। बोखारिजे कनुकडे।' -माए ४०३ २ -अक्रि (व) रागावणें, चिडणें

बोखारा—पु १ डोक्यावरून व तोंडावरून घेता येईल असा तऱ्हेनें घडी घातलेलें वस्त्र (क्रि० घेणें, ओढणें) 'पासोडीचा-घोंगड्याचा-शालीचा-लुगड्याचा-वस्त्राचा-बोखारा' २ (सामान्यत बुरखा) आच्छादनाचें कापड, आवरणाचें वस्त्र (हत्ती, गाडी इ० वर घालण्याचें) ३ खोलींतील एका कोपऱ्यात दोन भिंती घालून त्यास दार लावून बनविलेलें कपाट, फडताळ

बोगडा—पु (राजा) पूर्णपणें न उमललेली फुलाची कळी, फुगीर झालेली लवकरच उमलणारी कळी

बोग(गा)ण-णी-णें, बोघ(घा)णी -णें—स्त्रीन ईद तोंडाचें भांडें बगुणी, पातेली-लें (लग्नाचे वधूमाय वधूच्या हातीं बोगण देऊन बहुगुणी ऐस असा आशीर्वाद देते) [स बहुगुणी]

बोगदा—पु १ डोंगराच्या पोटातून आरपार नेलेला रस्ता. २ भिंतीतील खिडार, भगदाड ३ पैशासाठीं केलेलें तळघर. ४ भिंत, जमीन यातील भुयार तळघर (दारू इ०जिन्नस ठेवण्याचें) [फा बुघाप्, तुर्की बोघोष्=चिंचोळी समुद्रपट्टी, पोहें आबोगदा]

बोगर—वि (व) अनभिज्ञ, अडाणी

बोगा—पु (कु) उघवट पापुद्र्याखालीं असणारें भोंक

बोंगा—पु १ अर्धवट फुललेली कळी, बोंगडा, फुगीर कळा २ नाळ गर्भनाडी (फुगलेली पुढें आलेली) ३ पोटाचा फुगीर भाग पोटाचें वळें; गर्भारपणांतील पोटाचा फुगीरपणा, गर्भिणीचें मोठें व अव्यवस्थित पोट (क्रि० वाढणें फुगणें) ४ धोतराच्या आगर लुगड्याच्या निऱ्यांचा फुगीरपणा ५ मोठें, बेढब गाठोडें ६ कापड विणताना दवडीं राहिलेले किंवा त्यातील खराब झालेले सुताचे तुकडे, गुता म्ह० आगापेक्षा बोंगा मोठा बोंगा.

बोंगाडा—वि १ धष्टपुष्ट मोठा स्थूल, गलेलठ्ठ २ मोठा, बोजड स्थूल, अवजड (माणूस, वस्तु) बोंगाड्या, बोंग्या-वि (व) मदबुद्धि वहसर मह, मूर्ख बावळट

बोगार—पु कातारांतील एक पोटजात व तींतील इसम [का]

बोगारणी—स्त्री पोहणी [ग्रा]

बोगाळा बोगाळणें—बोकाणा, बोकाडणें पहा

बोगोटी-टें—स्त्रीन बगोटी व बगोटें इ० पहा

बोघोणी बोघोणी, बोघोणें, बोघोणें—स्त्रीन बहुगुणी, बहुगुणें बोगण पहा

बोंच—न १ काटा इ० बोंचल्यामुळें पडलेलें भोंक किंवा झालेली इजा, जखम २ -स्त्री (राजा) काट्याचें भणकुचीदार

टोंक ३ (कु) पक्ष्याची चोंच [बोंचणें] बोचकडणें, बोच कणें, बोचकरणें बोचकुरणें, बोचकाडणें, बोचकारणें-सक्रि १ नखानें, पंजानें, ओरबाडणें, ओरखाडणें, फाडणें २ धरणें, पकडणें ३ पंजात धरून ओरबाडणें, (विशेषत ) हरयारानें खाइन टाकणें बोचकरणें-कारणें-कुरणें-(विशेषत राजा पुराकर ) गवत, टोपटी, मुळ्या इ० नखानीं ओरबाडणें, पंजात धरून एकदम उपटणें, तोडणें बोचकडा, बोचकरा, बोच काडा-रा, बोचकुरा-पु नखानें, पंजानें काढलेला ओरखाडा, ओरखाडा, पाची बोटांनीं एकदम धरलेला चिमटा ( क्रि० घेणें, काढणें, ओढणें) बोचकणें-सक्रि १ टोंचणें, बोचणें, खुपसणें २ बोचविणें, खुपसविणें, कोणतादि अणुकुचीदार पदार्थ भोसकणें [बोचणें] बोचका-पु हातानें, टोंकानें काढलेला लचका, तुकडा उदा० मासाचा इ० ( क्रि० घेणें, तोडणें, काढणें ) बोचलणें-सक्रि. १ हलकें टाचणें, बोचणें, बोचावणें, हलूच भोंक पाडणें २ चोंच मारणें, टाकरणें

बोचक—वि बडबड्या, वाचाळ, फार बोलका [स वाचाट]

बाचका-कं—पुन गाठोडें, चापचोप घड्या न घालता बांध लेलें गाठोडें [तुर्की बुक्चा] म्ह० बाचकें की बोचकें बोचक्या तरा उदार-वि (ल) एखाद्या कामाची, कारभाराची बाह रील व अंतस्थ सर्व परिस्थिति माहीत असलेला, गुप्त व बारीक सारीक गोष्टी सुद्धा जाणणारा

बोचकूल—न (गो) पजा [बचक]

बांचविड, बोंचरखंड-डा-डी, बांचरखिड(खंडें)-डा-डी—स्त्री बोचरखिड, दातातील खिंड, दोन दाताच्या ओळीमधील फट 'दतपाटी उपळली । तों बोंचरखिडी पाडली। -दा ३ २ ३९ बोचरखिड्या, बांचरखिड्या-वि दाताच्या ओळींत फट, खिंड असलेला [का बोच=दतविहीन माणूस]

बा(बो)चणी—स्त्री १ खुपसणें नोंचणें, हुसविणें २ टोंचून बोलणें जाचणी मनाला लागेल असें बोलणें

बोचणें—सक्रि १ (को) टोंचणें, भोंक पाडणें इजा करणें आत घुसणें २ (एखादें टोंकदार हत्यार) खुपसणें भोसकणें ३ (ल) टोमणा मारणें, टोमण्याचें बोलणें मनाला लागणें, मनाला लागेल असें बोलणें शब्दप्रहार करणें [स व्रश्च्=हिंसा करणें, तुल० इ प्रञ्च्]

बोचर—न १ (व) धार नमलेलें हत्यार २ दात पडलेला मनुष्य

बोचरडा, बोचरा बोथरा बोचिरें—वि (सर्व किंवा काही) दात पडलेला, दात नमलेला ज्यान दातांमध्यें फट राहिली आहे असा याह पा लोढाचे चणे। जे बाचरिया एकती खाणें। ते पोटभरणें की प्राणें। शुद्धी होय।' -ज्ञा १२ ५०

बोंचरडें-बोंचाडी—न (कु) एका पक्ष्याचें नाव

बोंचरणें—सक्रि १ नखानीं, पंजानीं धरून फाडणें, बोच कारणें २ ओरखडणें (कु) झाडाचे सर्व देठ तोडणें, झाडाचे बोंडें ओरबाडणें, पाला, डिंच्या इ० खुडून झाड बोडकें करणें

बो(बों)चा—पु (अशिष्ट) ढुंगण, गुदद्वार, अपानद्वार, गांड [?] बोचाळू-पु (अश्लील) गांडमराळ, गुदमैथुनार्थं बाळगलेला पोऱ्या, बाबू, लवडा बोचू-पु १ बोचाळू, हिजडा २ -वि मूर्ख, बेरमर नादान, घाणेरडा, यत्कचित (कारभार, काम, कारखाना, धंदा, उदीम इ० )

बोचा—पु (व) पोचा, भाडें पडल्यामुळें किंवा दुपटल्या मुळें भांड्याचा आंत गेलेला भाग

बोचाडणें—अक्रि (व) तृप्ति होणें, वासना शमणें, इच्छा तृप्त होणें [स वांछा ?]

बांचावर्चे—क्रि (गो) कुदळीनें जमीन टोंचणें वरवर खणणें, राखल्यासारखी करणें

बोंचावणी—स्त्री (गो) जमीन वरवर खणण्याची क्रिया

बोचें तुल्बुल—पु बुलबुलबोचा पक्षी

बोंचेरा—वि तीक्ष्ण अग्राचा, अणकुचीदार, टोंकदार, बोंचण्यासारखें टोंक असलेला

बोचो—पु १ (गो) बोंचडी पशूचें निमुळतें तोंड २ हनुवटी ०मडूप-(गो) मुरका मारणें

बोज—पु १ वजन, महत्त्व योग्यता, किंमत, मोठेपणा 'हातीं घेतलेल्या कामाचा बोज त्यास चांगला कळतो' -नि ९ २ मान, प्रतिष्ठा, लौकिक, कीर्ति वाखाणणी, पत बूज पद्धा (काम किंवा उद्योगधद्यातील) 'माझी कोण बोज जाला हा शब्द। दरो निया वाट आणिजे लागे।' -तुगा १९७० [हिं, म बूज]

बाजड—वि १ मोठें, अवजड, न पेलण्यासारखें (शरीर, अवयव) २ सैल व मोठें आटोपशीर नसलेलें (ओझें गाठोडें) ३ ओबडधोबड चांगलें, कलाकुसरीचें नसलेलें (खोदकाम इ०) ४ सामान्यत अवजड, बेतावाहेरचें अव्यवस्थित प्रमाणात नसलेलें आटोपशीर नसलेलें ५ फार जाडेभरडें अतिशय जाड (कापड साल, कातडी) बोजवारा-पु दुर्दशा, गोंधळ फजीती वजन नाहींसें होणें

बोजवार—पु भाजींत लोणच्यांत घालण्याचा हिंग, जिरें मिरीं, हळद इ० घालून केलेला मसाला [स वेसवार]

बोजा-झा—पु १ ओझें वजन 'मग काढिला बोजा। ओणिताचा। -भाए ७६१ २ कर्ज गहाणवट, दुकलबंध 'इतर मिळकतीवर त्यांना बोजा उत्पन्न करावा लागला -के२ ८ ३० [हिं का. ओज्झे]

**बोजा-झा**—पु मद्य एक अमली, मादक पदार्थ 'की बोजा काढिला जैसा। आनंदरतीचा।' -माए ७९७ [फा बोज़ाह्]

**बोजार**—न (राजा) भाऱ्याचें मोहराचें लोणचें

**बोट**—स्त्री १ वाफेच्या किंवा तलाच्या यंत्रानें चालणारी मोठी होडी २ लहान गलबत नौका [इं] ०लागणें बोटीच्या प्रवासामुळें भोंवळ इ० येऊन ओकारी वगैरे येणें त्रास होणें

**बोट**—न १ हाताची किंवा पायाची अंगुलि किंवा आंगठा २ बोटाच्या रुंदी, जाडी किंवा लांबीइतकें परिमाण ३ बोटभर, अगदीं थोडें, बोटाला चिकटेल इतकें परिमाण उदा० मधाचें बोट तुपाचें बोट ४ (ल) डाग काळिमा अपकीर्ति; बोटाचा ठिपका बटाटे एवढा डाग उदा० गालबोट 'रूपसा उदयलें कुट। सभा विता कुळींचें बोट। तया लाजा प्राणसंकट। होय जैसें।' -ज्ञा १६ १७८ [का बोट्टु स पुट?] म्ह० पाच बोटें कोठें सारखीं असतात काय? किंवा पाची बोटें सारखीं नसतात=एक वस्तू दुसरीसारखी कधीं नसते (वाप्र) ०करणें दाखविणें-बोटानें एखाद्या वस्तूचा निर्देश करणें, सुचविणें (०एखाद्याकडे) दाखविणें-भलत्यालाच दोषी ठरविणें ०शिरकणें-एखाद्या कामांत प्रवेश मिळणें चंचुप्रवेश होणें (पुढील मोठ्या फायद्याच्या दृष्टीनें) ०लावल्यानें पोट येणें (व)(ल) थोडक्या बोल ण्याचा राग येणें **बोटावर नाचविणें**-आपणाला पाहिजे त्या प्रमाणें एखाद्याकडून सर्व गोष्टी करून घेणें एखाद्यास पूर्णपणें ताब्यांत ठेवणें हवें तसें खेळविणें **बोटें मोडणें**-१ बोटाचीं पेरें किंवा सांधे मोडून त्याचा आवाज काढणें करणें २ (ल) जागच्या जागीं चरफडणें निर्भर्त्सना करणें शापणें टपका ठेवणें 'विधिवरि बोटें मोडुनि कांपें खातात दांत वाहर।' -मोसी ४ २६ **दोन बोटें स्वर्ग उरणें**-अभिमानानें फुगून जाणें गर्वानें ताठून जाणें अतिशय श्रीमंत असणें **त्याचीं बोटें त्याच्याच डोळ्यांत घालणें**-त्याच्याच मापल्यांत त्याला पकडणें, त्याच्याच युक्तीनें त्याला धरणें **या बोटाची थुंकी त्या बोटावर करणें**-लटपटपंचीन एखाद्या वस्तूचें स्वरूप निराळें भासविणें फसविणें, बोलण्यांत किंवा कृतींत मेळ नसणें (मुलें पालथा हात करून मध या बोटाला थुंकी लावतात व मग अलीकडचें एक बोट एकदा व पलीकडचें एक बोट एकदां अशीं बोटें त्या मधल्या थुंकी लाव लेल्या बोटास जुळवून दाखवितात या योगानें जी थुंकी एकदां अलीकडील बोटावर दिसते तीच दुसऱ्यादा पलीकडील बोटावर दिसल्याचा भास होतो यावरून) सामाशब्द- ०का-वि १ बोथट खुटका ठेंगणा २ बोट्क आखूड व सरळ चिंच वगैरे (झाड) ०काम-न घरातील किंवा संसाराचें अगदीं बारीकसें काम उद्योग ०खत-न हिशोबाच्या निरनिराळ्या बाबींचें किंवा खात्याचें केलेलें पत्रक किंवा टाचण या बाबी लिहिण्या करतां आखलेला कागद ०घेवडा-डी-पुस्त्री एक प्रकारचा घेवडा आणि त्याचा वेल ०चेपा-वि १ बोटानें दबला किंवा चपला जाणारा, चपला जाईल इतका शिजलेला किंवा पिक लेला (भात, फळ आंबा इ०) २ (ल) थोड्याशा प्रयत्नानें साध्य होण्याच्या स्थितीस आलेलें (काम) [बोट+चेपणें] ०धरणी माप-न धान्य मोजतांना मापाच्या वर डाव्या हाताचें बोट धरून भरलेलें माप अशा रीतीनें अधिक माप भरून घेणें हा एक हक्क असे; वरीलप्रमाणेंच पण बोटाऐवजीं आडवा हात धरणें या दोन्ही मापाच्या उलट रास्ती माप ०धारा वि बोटाच्या रुंदीइतका रुंद व ज्यांत कांहीं नक्षी नाहीं असा काठ किंवा किनार असलेलें (धोतर) 'कास कसिला पीतांवर। बोट धारी।' -कथा २ ११९० **बोटधा**-पु १ गव्हाच्या पिठाचा तांदुळाच्या आकाराचा खिरीकरितां केलेला गव्हला २ सुमारें करंगळीच्या टोंकाइतके लांब व रुंद असें कपाळास लावलेलें कुंकू **बोटचात**-स्त्री बोटावर पीळ देऊन एक प्रकारची वळलेली दबापुडें आळण्याची कापसाची वात **बोट(टा)ळ(ल)णें**-उक्रि फळें इ० बोटांनीं दाबून टणक किंवा मऊ आहेत हें पाहणें, चिवडणें, दाबलीं गल्यानें बिघडणें चिवडल्यानें खराब होणें **बोटावरील जोर**-पु फक्त बोटें टेंकून काढण्याचा दंडाचा एक प्रकार **बोटांचे ठसे**-पुअव वहिमी गुन्हेगाराच्या हाताच्या बोटांचे छाप घेण्याची सरकारी रीत यावरून गुन्हेगारांचा शोध लावता येतो **बोटा एवढें पोर**-न अगदीं लहान वयाचें मूल **बोटी**-स्त्री १ बोटव किंवा शेवया करण्याकरतां गव्हाच्या पिठाची केलेली गोळी लाटी २ सूत काढण्यासाठीं घेतलेली कापसाची लडी ३ सुकवून खारवलेला मासा ४ (बोंबड्यांचें इ०) शिजविलेलें मांस [हिं; फा] **बोट्क**-न १ आखूड व सरळ चिंच कोंगाळ्याच्या उलट २ एक चिंचोका असलेला एकच पेऱ्याचा चिंचेचा तुकडा ३ थोटक थुटण थोटण झुटण (वात दोरी इ०चें) [का बोट्ग]

**बोटक**—पु एक मुलींचा खेळ -मराठी खेळाचें पुस्तक पृ ३३४

**बोटाळणी**—स्त्री खारवट जमिनींतील वणणी -कृषि २३१

**बोटी**—स्त्रीअव (छाप) छापील कागद दाबांत ठेवतांना त्यास मृदुता येण्यासाठीं त्यांत कांहीं जाड गुळगुळीत असे कोरे कागद मधून मधून घालतात त्या [?]

**बोटण बोटूक**—न झुटण थोटूक थोंगण खुंटारा खत पूस [का बोट्ग] **बोंठा**-वि थोटूक झालेला थोंग (झुधा)

**बोड बोडस**—न (कुत्सितार्थी) डोकें टक्कल टाळकें डोचकें डोसकें टकुरें बोडकें [स मुण्ड; का बो तलगु बोळी बोडी-हजामत केलेलें डोकें] **बोड करणें** १ हजामत करणें २ खोड मोडणें नरम करणें **बोडका**-वि १ डोईवर काहीं एक

४ चूक; चुकीची कल्पना, मत, गैरसमज; विपरीत ज्ञान. ५ डोक्यांत होतो तो विचारांचा घोटाळा; संदेह; विचारांचा विसंगतपणा; मनाचा गोंधळ. ६ (ल.) योग्य मार्गापासुन च्युत होणें; सत्पथभ्रंश; बहकणी. ७ वहीम; भ्रांति; अनुमान; आंदेशा. 'ज्याच। आम्ही भ्रम धरला होता तोच शेवटीं चोर ठरला.' ८ संशय; शंका; साशंक वृत्ति. 'हा ब्राह्मण किंवा शूद्र ह्याविषयीं आम्हाला भ्रम आहे.' [सं.] **भ्रमाचा भोपळा, भ्रमाची मोट-पुडी-पुत्री** जें खरोखर चांगलें नाहीं तें चांगलें आहे असा एखाद्याचा झालेला चुकीचा ग्रह; पोकळ वस्तु. **भ्रमाचा भोपळा फुटणें**-एखाद्याच्या खोट्या कल्पनेचें निरसन होणें. समासशब्द- ०रस-पु १ दारू; सुरा, मद्य. २ (ल.) मोह. 'तेथ मद्यरस आणि भ्रमरम। इहीं युक्त अमृतकलश।' -एभा १४.११. ०हत-वि. भ्रमलेला; भ्रमिष्ट; भ्रांत. 'आतां जाहालिया भ्रमहत। जैसें पिशाचाचें चित्त।' -ज्ञा ५.५७. ०ज्ञान-न चुकीचें ज्ञान, चूक, गैरसमज. [सं.] **भ्रमलेपण**-न. भ्रांति; मोहावस्था. 'तूं भ्रमलेपणें अंहकृति। यासि घातु न धरिसी चित्तीं।' -ज्ञा २.९८. **भ्रमिष्ट-स्त-त**-वि. १ कैफ इ०नीं भ्रम झालेला. 'परि भ्रमिष्ट झाला द्विपंचवदन।' २ वेडसर; खुळा. ३ ज्याचे विचार सदा घोटाळलेले असतात असा; सदा साशंक; गोंधळलेला. ४ खोटें, न चालणारें. 'कीं भ्रमित नाणें असेल पोटीं। मुलास टोचितो निजबळें।' -भवि ५.९४. [सं. भ्रमिष्ट] **भ्रमी**-वि. १ भटकणारा; भटक्या. २ बहकणारा; चुकीच्या मार्गानें जाणारा. ३ सदा गोंधळलेला; शंकित. [सं.] **भ्रामक**-पु. लोहचुंबक. 'भ्रामकाचेनि संगें। जैसें लोहो वेडा रिगे।' -ज्ञा १८.१३११. [सं.] -वि. घोटाळ्यात पाडणारा; संशय उत्पन्न करणारा; भ्रमोत्पादक.

**भ्रमण**—न. १ मंडलाकार फिरणें; गरगर फिरणें २ (शब्दश व ल.). भटकणें; फिरणें; हिंडणें. 'नाहीं केलें तीर्थाचें भ्रमण। पाळिला पिंड करचरण।' -तुगा ६९२. ३ (ल) भ्रांति पडणें; बहकणें, कुमार्गास लागणें. ४ एक अशुभ मुहूर्त. अशुभ वेळ. [सं.] ०चक्र-न. १ (काव्य) इहलोक सत्यस्वरूप आहे असा मनाचा खोटा ग्रह. 'जेणें ब्रह्मादि देवगण। भ्रमणचक्रीं पाडिले।' २ गति असणाऱ्या ग्रहाचें चक्र 'भ्रमणचक्रीं न भवे। ध्रुव जैसा।' -ज्ञा १३.४८८. [सं.] ०प्रवाह-पु प्रावणप्रवाह (इं) कन्व्हेक्शन करंट ०शील, **भ्रमणीय**-वि. भटकणारा; भटक्या. **भ्रमणें**-अक्रि. १ चक्राकार फिरणें; गिरकी मारणें. २ भटकणें, हिंडणें ३ (मनानें) धाव घेत सुटणें; भटकणें ४ भलत्याच मार्गानें जाणें; चुकणें. ५ घाबरणें. 'भ्रमता सहस्रनयनहि परि धैर्यजलधि नदीज न भ्रमला।' -मोभीष्म ११.९९. ६ भुलणें; भुरळणें. 'नातरी महासिद्धिसंभ्रमें। जितला तापसु भ्रमे।' -ज्ञा १ २७१. ७ पाठ दाखविणें; माघार घेणें. 'वत्सा ! जरि तूं युद्धीं न भ्रमसिल पावसील सुगतीतें।' -मोद्री ४.१९. **भ्रमता**-वि. भटकणारा. 'ऐसेनि न राहतया राहवी। भ्रमतयातें वैसवी।' -ज्ञा ६.१९९. **भ्रमंती**-स्त्री. भ्रमण [सं.]

**भ्रमर**—पु. १ भुंगा. २ केसांची मंडलाकृति; भोंवरा. भोंवरा. [सं.] ०कीट-पु. कुंभारीण माशी. ०गुंफा-स्त्री. (योग गोल्हाटावरील योगशास्त्रोक्त स्थान. गोल्हाट अर्थ २ पहा. 'तेथ औटपीठ गोल्हाट। सांडूनि भ्रमरगुंफा कपाट।' -एभा ११ ३५२. ०पटळ-ळी-स्त्री. (काव्य) भ्रमरांचा समुदाय. 'भ्रमर पटळी रोमावळी। श्रीवत्स नव्हाळी तेचि पैं।' [भ्रमर+पटल]

**भ्रमर(हस्त)**—पु. (नृत्य) हाताचा आंगठा व मधलें बोट यांचीं अग्रें एकमेकांस लावणें, तर्जनी वाकडी करणें, करंगळी आणि अनामिका उभ्या ठेवणें.

**भ्रमी**—स्त्री. विशिष्ट सैन्यसंख्याव्यूह एक भ्रमी=दहा हजार हत्ती, एक लाख रथ, एक कोटी घोडे, एक अब्ज पदाति. 'हयीं हयीं शतपदाती जाण। इतके मिळोनि एक भ्रमीप्रमाण।' -जै ३३.३०.

**भ्रंश**—पु. १ पतन; पडणें; गळणें. २ (ल) अपकर्ष; ऱ्हास; नाश; च्युत होणें (महत्त्व, दर्जा, जात, सत्ता इ० पासुन) चळ; वेड; खुळ. जसें-बुद्धि-ज्ञान-वैराग्य-शांति-भ्रंश. [सं.] **भ्रंशणें**-सक्रि. १ (काव्य) घोटाळ्यांत पाडणें; गोंधळविणें, चुकविणें. २ एखाद्यास त्यांच्या स्थानावरून च्युत करणें. -अक्रि. १ गोंधळणें; घुचमळ्यांत पडणें. २ स्थानावरून च्युत होणें; भ्रष्ट होणें; चुकणें; भ्रम पावणें. 'कीं तपोबळें ऋद्धी। पातल्या भ्रंशे बुद्धी।' -ज्ञा १.१८८. ३ नष्ट होणें; नाहींसें होणें. 'तिमिरावरुद्ध जैसें। दृष्टीचें तेज भ्रंशे।' -ज्ञा २.५६. **भ्रंशित**-वि. (विरू.) भ्रष्ट पहा. [सं.]

**भ्रष्ट**—वि. १भाजलेला, शेकलेला. २ शिजविलेला. [सं. भ्रस्ज्]

**भ्रष्ट**—वि १ पडलेला; सुटलेला; पतन पावलेला (सद्गुण, आचार, विचार, दर्जा, सत्ता, महत्त्व, योग्यता, पावित्र्य इ० पासुन) २ घोटाळ्यात पडलेला; गोंधळलेला; बुचकळ्यात पडलेला [सं] ०**मार्गस्थापक**-वि. (काव्य) धर्मासंबंधीं चुकीचा मार्ग स्थापन करणारा; धर्मबाह्य आचरणाचा संस्थापक. [सं.] ०**संकल्प**-वि १ ज्याचा हेतु निष्फळ झाला आहे असा. २ स्वतःचा व्यवसाय, धंदा इ०त अयशस्वी झालेला. [सं.] **भ्रष्टाकार**-पु. सोवळें ओवळें, अस्वच्छता, व्यभिचारादि दोष इ० न पाळल्यामुळें उत्पन्न झालेली अपवित्रता, अमंगलपणा. [भ्रष्ट+आकार] **भ्रष्टाचार**-पु १ शास्त्रविहित आचारास सोडून असलेलें वर्तन, अनाचार. २ भ्रष्टाकार पहा. [भ्रष्ट+आचार] **भ्रष्टाचारी**-वि. शास्त्रबाह्य आचरण करणारा; अनाचार करणारा. [सं.] **भ्रष्टाभ्रष्ट**-स्त्री. सर्वसाधारण भ्रष्टाकार; अपवित्रता. [भ्रष्ट द्वि.] **भ्रष्णें**-अक्रि. १ (काव्य) पतित होणें, खालीं येणें; च्युत होणें

सद्गुण, योग्यता, पदवी इ० पासून ) २ गोंधळणें; घुचकळ्यांत पडणें. ' होणाराची विचित्र गति। भ्रष्टली मति तयाची।' **भ्रष्ट-विणें**–सक्रि. (काव्य) अपवित्र करणें; विधिपूर्वक बाटविणें. **भ्रष्टया**–वि. धार्मिक आचारविचारांप्रमाणें न वागल्यामुळें पूर्ण भ्रष्ट झालेला (मनुष्य).

**भ्रांत**—स्त्री. भ्रांति पहा. ' ज्याला पडली भाऊची भ्रांत। ते राहिले रणांत।' –ऐपो १३०. –वि. १ चुकलेला; घोटाळ्यांत पडलेला; घडकलेला; गोंधळलेला, साशंक झालेला. ' जयाचेनि संगें भ्रमभावो। भ्रांता सही।' –ज्ञा ६.१०२. २ परिभ्रमण केलेला; गिरकी, वळसा घेतलेला ३ भ्रांतिष्ट पहा. [ सं. ] **०खोर-घट**–वि. भ्रांतिखोर, भ्रांतिवट पहा. **०हृदय**–वि. संशयी; शंका-कुशंकांनीं युक्त, शंकेखोर. [ सं. ] **भ्रांति-ती**–स्त्री. १ चूक, भूल; चुकीचा समज; मिथ्याज्ञान, भ्रम. ' देखे विवेकी जे होती। ते दोहींतेंही न शोचिती। जे होय जाय हे भ्रांती। म्हणऊनियां। –ज्ञा २.१०२. २ गोंधळ; घोंटाळा. ' दुर्जना घालूनि अनिवार भ्रांति। भक्ता छळविसी तया हातीं।' ३ संशय; शंका; साशंकवृत्ति. [ सं. ] **०कट-कर-घट, भ्रांतवट**–वि. संशयास्पद; घोंटाळ्याचा; संशयित. ' आलों तर येईन असें भ्रांतिकर सांगूं नका. काय तें स्पष्ट सांगा. ' **०खोर**–वि. शंकेखोर; संशयी. **०पटल**–न. (काव्य) भ्रम, मोह याचें आवरण, आच्छादन, पडदा. **भ्रांतिष्ट, भ्रांत्या**–वि. १ संशयित वृत्तीचा; संशयी; डळमळीत मनाचा; अनिश्चित विचारांचा. २ गोंधळलेल्या मनाचा; घोंटाळलेला; भ्रमिष्ट. ३ ज्या त्या गोष्टीविषयीं शंका घेणारा; शंकेखोर. ४ नेहमीं चुकणारा. [ सं. ]

**भ्राता**—पु. भाऊ; बंधु. (सामासिक शब्दांत भ्रातृ असें रूप होतें ). [ सं. भ्रातृ ] **भ्रातृजाया**–स्त्री. भावाची बायको; भावजय. [ सं. ] **०त्व**–न. बंधुत्व; भावाचें नातें; भाऊपणा. [सं.] **०हत्या**–स्त्री. भावाचा खून. [ सं. ] **०हत्यारा**–पु. भावाचा खून करणारा. **भ्रातृव्य**–पु. भावाचा मुलगा; पुतण्या. [सं.] **भ्रात्रीय**–वि. भावासंबंधाचें. [ सं. ]

**भ्रुकुटी**—स्त्री. १ भुंवईचें आकुंचन. २ (सामा.) भुंवई ३ (नृत्य) भुंवईचा एखादा भाग न उचलतां सबंध भुंवई एकदम उचलणें. [ सं. ] **०चढविणें**–उग्र मुद्रा धारण करणें. **०भंग**–पु. रागानें भिवया चढविणें; कपाळास आठ्या घालणें. [ सं. ]

**भ्रू**—स्त्री. भुंवई. [ सं. ] **०पल्लव**–पु. भुंवई. ' सहजें तिहीं संधी भेटी। जेथ भ्रूपल्लवां पडे गांठी।' –ज्ञा ५.१५२. [ सं. ] **०भंग**–पु. भ्रुकुटीभंग पहा. [ सं. ] **०मध्य**–पु. दोन भुंवयांमधील जागा. [सं.] **०लता**–स्त्री. (काव्य) भुंवई. 'भ्रूलता आठी घालून। नेत्रयुगुल वटारले।' [ सं. ] **०संकेत**–पु. भुंवई वांकडी करून केलेली इशारत, सूचना; नेत्रसंकेत (क्रि० दाखविणें; दावणें). ' अंगदादि भ्रूसंकेत। दाविता जाला ताराकांत।' [ सं ]

**भ्रूण**—पु. गर्भ; गर्भावस्थेंतील बालक. [ सं. ] **०हत्या**–स्त्री. गर्भस्थ प्राण्याची हिंसा; गर्भपात. [सं.] **०हत्यारा**–वि गर्भपात करणारा.